# हरिवंशाची बखर

अथवा

## पटवर्धन सरदारांच्या हकीकती.

---

कै० बाळकृष्णराव हरिहर पटवर्धन आंबेकर यांनीं लिहिलेली

ही बखर

अर्थनिर्णायक व अवांतर माहितीच्या विपुल टीपा देऊन


## वासुदेव वामनशास्त्री खरे

मिरज हायस्कुलांतील संस्कृत शिक्षक.


यांनीं संपादिली.

---


पुणें येथें

आर्यभूषण छापखान्यांत छापिलें.

---

शके १८३१ सन १९०९.

---

किंमत दहा आणे.

# अर्पणपत्रिका.

हें पुस्तक

श्रीमंत राजश्री सर गंगाधरराव बाळासाहेब पटवर्धन

के. सी. आय्. ई.

मिरज संस्थानचे अधिपति

यांस

स्वामिभक्तिपूर्वक

अर्पण केलें असे.

संपादक.

# प्रस्तावना.

चौदा वर्षांपूर्वी मिरज येथें एका गृहस्थाच्या घरची जुन्या रद्दीचीं पोतीं चाळीत असतां आह्मास प्रस्तुत बखरीचे दहा बारा फुटकळ वद मिळाले. ते वाचून पहातां त्यांत बऱ्याच चुका दिसून आल्यावरून एकदर बखरीविषयी आमचा ग्रह प्रतिकूल झाला व ऐतिहासिक–लेखसंग्रहांत एका स्थळीं आह्मी तो तसा नमूदही करून ठेविला आहे. तथापि ही सबंध बखर मिळविण्याविषयी आमचा उद्योग चालूच होता. तो उद्योग सफल होऊन तिगस्ता ही सबंध बखर आमच्या हातीं लागली. ती वाचून पाहिल्यावर आमचा पूर्वीचा ग्रह बदलला व असे दिसून आले कीं, यद्यपि या बखरीत चुक्या पुष्कळ आहेत तरी हीतली प्रत्येक आख्यायिका अगदी सोळा आणे नसली तरी बहुतेक अशीं तात्पर्यतः खरी आहे व पुरंदरप्रकरणींच्या वगैरे आख्यायिका तर अक्षरशः खऱ्या आहेत. त्यावरून पेशवाईच्या इतिहासाचे यथार्थ ज्ञान होण्यास या बखरीचा काही उपयोग होईल असें मनांत आणून ही बखर आह्मी वाचकांच्या सेवेस सादर करीत आहो.

बखरीतल्या स्थल, काल व व्यक्तीसंबधाच्या चुका आम्ही जागोजाग टीपा देऊन दुरुस्त केल्या आहेत आमच्या नजरेतून क्वचित क्वचित एखादी क्षुल्लक चूक राहून गेली असली तर असेल. परन्तु एकंदरीत हे पुस्तक आता निर्दोष व प्रमाणभूत धरण्यास हरकत नाही. ग्रंथकाराच्या हातून संभाषणरसात कोठे तिखटमीठ अधिक पडले असल्यास ते वजा घालण्याच्या भरीस आह्मी पडून पुरवणार नाही. ते काम वाचकानीच तारतम्यानें केलें पाहिजे.

ग्रंथकाराची लेखनशैली व्याकरणदृष्ट्या चागली नाही. कर्तरि प्रयोगांत प्रथमान्त कर्ता असावा लागतो, व एकाच वाक्यात पूर्वकालवाचक धातुसाधित अव्यय व क्रियापद आल्यास ती समानकर्तृक असलींच पाहिजेत, हे व्याकरणाचे सामान्य सिद्धांत ग्रंथकाराच्या गावींही नाहीत ' ' तो ' या अव्ययाचा त्याने वारवार अपप्रयोग केला आहे व दोन ठिकाणी पूर्णभूत काळाच्या जागी रीतिभूतकाळ घातला आहे! हे सर्व दोष काढून टाकावे तर बखरीचे पुष्कळ ठिकाणी रूपातर होणार, सबब मूल ग्रंथ आह्मी जशाचा तसाच ठेविला आहे अर्थाचा अगदीच विपर्यास करणारी दोन तीन वाक्ये मात्र आह्मी फिरविली आहेत व अर्थाची स्पष्टता करण्यासाठी क्वचित् क्वचित पदरचा एखाददुसरा शब्द घातला आहे. आणि मूलग्रंथात पटवर्धनांची विस्तीर्ण वंशावळ दिली आहे तिचा वाचकांस उपयोग नसल्यामुळे छाटाछाट करून तीतला इतिहासोपयोगी भाग मात्र ठेविला आहे आमच्या हातचे फेरफार एवढेच.

वीररसाचे अनेक उदात्त प्रसग या बखरींत आले आहेत, ते हुबेहुब वर्णन करण्याची प्रतिभा ग्रथकाराच्या अगी नसल्यामुळे रसिक वाचकाच्या अपेक्षेप्रमाणें ते ते प्रसंग उत्तमोत्तम वठलेले नाहीत हें खरं आहे; पण हा विचार कर्मणुकीच्या दृष्टीनें झाला. बखरीतल्या माहितीच्या योग्यतेचा विचार केल्यास ही बखर लिहिण्यास हाच ग्रंथकार योग्य होता अशी खात्री पटते. कारण कीं, तो पेशवाईच्या इतिहासाचा हौशी असून जुन्या चालीरीतीचा उत्तम माहीतगार होता आणि पेशवाईतले नानाविध प्रसंग ज्यांनीं डोळ्यानीं पाहिले होते अशा माणसाचा सहवास त्यास रात्रदिवस लाभलेला होता शिवाय वर्ण्यविषय जो पटवर्धन कुलाचा वृत्तांत, त्याचें त्याने आस्थापूर्वक आकलन केलें होतें. वर्णनाचा

सरळपणा हा त्याच्या लिहिण्यांत मोठा गुण आहे. गोष्ट जशी जशी मनांत येते तशी तशी तो अलंकारांची वगैरे कांहीं एक पर्वा न धरितां भराभर लिहीत सुटतो. गोष्ट वाचकांच्या मनांत भरविण्यास हें एक चांगलें साधन आहे.

हरिवंशाची बखर ह्मणजे हरभट पटवर्धनाच्या वंशजांची हकीकत. ही त्याच वंशांत जन्म पावलेले बाळकृष्णराव हरिहर यानीं सामान्यतः पटवर्धनांचे व विशेषतः आपले आजे पुरुषोत्तमराव कृष्ण उर्फ दाजी याचे पराक्रम वर्णन करण्याकरितां लिहिली. असल्या बखरी एकतर्फी असल्या तरी सुद्धा त्या माहितगार माणसांनीं लिहिल्या असतील, तर इतिहासाच्या फार उपयोगीं असतात. कारण कीं, ज्याची महती बखर लिहिणाऱ्यांस वर्णावयाची असते त्यास त्यांनीं यद्यपि मुख्यस्थानीं स्थापिलें तरी त्या त्या महापुरुषाभोंवतीं त्या काळच्या प्रसिद्ध व्यक्तींचीं व प्रसगांचीं मांडणावळ त्यांस करावी लागतेच लागते. आणि या मांडणावळींतूनच इतिहासजिज्ञासूंचे केव्हां केव्हां उत्तम रीतीनें कार्य होऊन जातें ! ही एकतर्फी बखरींची गोष्ट झाली पण प्रस्तुतची बखर केवळ एकतर्फी नसल्यामुळे तिची योग्यता अधिकच आहे. कारण की, हींत पटवर्धनांच्याच गोष्टी नसून पेशवे, घोरपडे, प्रतिनिधि इत्यादिकांच्याही गोष्टी आहेत. आणि पटवर्धनाच्या किंवा इतरांच्या प्रत्येक गोष्टींत तात्पर्यतः सत्यास सोडून मजकूर लिहिलेला नाहीं, हें ऐतिहासिक लेखसंग्रहांतून अवांतर पुरावे देऊन आह्मी जागोजाग सिद्ध केलें आहे

पुरुषोत्तमरावदाजीविषयीं ऐ. ले. संग्रहांत जे उल्लेख आले आहेत, त्यांवरून ते पराक्रमी, विनोदी, वाडवडिलांशीं वागण्यांत नम्र, मर्यादशील व आज्ञाधारक आणि प्रतिपक्षाशीं समेट व तडजोड घडवून आणण्यांत तरबेज होते इतकेंच वाचकांस माहीत होतें. हल्लींच्या बखरीवरून ते निस्सीम स्वामिभक्त, उत्साही, उद्योगी, मानी, सावध, धूर्त, उदारमनाचे, मोकळ्या दिलाचे, थट्टेखोर, प्रसंगविशेषीं निर्भीड व मर्मभेदक भाषण करणारे, लहर लागल्यास आर्जवही करणारे होते, ही माहिती अधिक कळते. यांत कांहीं गुण परस्परविरोधी असले तरी एकत्र असणें अशक्य नाहीं दाजीचा दोष ह्मटले तर ते कारकुनी कसबांत कच्चे होते, इतर सामान्य थट्टेखोरांप्रमाणें यांचीही थट्टा केव्हां केव्हां मर्यादेबाहेर जात असे, व यांच्या जिभेंत शिवराळपणा होता, हे होत शिपाईगिरीच्या बाण्यानें वागणाऱ्या मनुष्यांत हे मुळीं दोषच नव्हत, असें म्हणणारे जे असतील त्याशीं आह्मी वाद करीत नाही. आमचें मन आह्मी सांगून ठेविलें. एकंदरीत सर्व गोष्टींचा विचार करतां हीच गोष्ट निर्विवाद ठरते कीं, कोणत्याही कुळास व देशास ललामभूत होण्याजोगा अनेक सद्गुणांनीं मंडित असा हा पुरुषोत्तमराव मोहरा होता !

पुरुषोत्तमरावासारखे मोहरे पूर्वीच्या काळीं महाराष्ट्राच्या इतिहासप्रसिद्ध शेंकडों शिलेदार घराण्यांत निर्माण झाले होते व त्यांच्याच पराक्रमावर रामेश्वरापासून दिल्ली अटकेपर्यंत विस्तार पावलेलें मराठी साम्राज्य चालत होतें ! आणि ह्मणूनच हिंदुस्थानाच्या इतर भागांत या महाराष्ट्रदेशास ‘ शिपाई लोकांची विलायत ’ हें नांव प्राप्त झालें होतें ! अशा मोहऱ्यांच्या बखरी लिहून ठेविलेल्या नाहींत किंवा लिहून ठेविलेल्या असल्यास त्या छापून प्रसिद्ध होत नाहींत ही मराठी इतिहासाची फार मोठी हानि होय !

मिरज, ता० १३ जून स० १९०९. **वासुदेव वामनशास्त्री खरे.**

# शुद्धिपत्र

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ८ | ३० | तलब | तकूब |
| १५ | ३२ | एप्रिलमध्ये | जूनमध्यें |
| २१ | २९ | १० आगस्ट | १० आगस्ट स. १७६३ |
| ६२ | ९ | शिस्तँ | शिस्त |
| ६९ | ३२ | तेव्हा | तेव्हांपासून |
| ७० | ३१ | फुररदगी | फुरसदगी |
| ७३ | ७ | पांची | पांची |
| ७४ | २० | नान | नाना |
| ७९ | १९ | पत्र | पत्रें |
| ८० | २१ | बोलंत | बोलत |
| ८५* | ६ | घेता | घेतां |
| ९० | ३० | १५२ | १५३ |
| ९३ | ३५ | शुद्धपक्षात | आषाढशुद्धपक्षांत |
| ९४ | १ | हिपरगीरकर | हिपरगीकर |

* पृष्ठाच्या ओळीच्या मोजदादींत टिपेच्याही ओळी येतात.

# हरिवंशाची बखर

## अथवा

## पटवर्धन सरदारांच्या हकीकती.

---

१. श्रीगणेशाय नमः श्रीकरजेश्वर्यै नमः कोतवडेकर पटवर्धन यांचे कुळात पुण्यवान् व कीर्तिवान् पुरुष जे जाहले त्यांचे वंशाचा विस्तार लिहितों. मूळपुरुष हरभट. त्यांस वडील पुत्र बाळभट त्यास तीन पुत्र जाहले. वडील हरिभट. दुसरे पुत्र केशवभट. तिसरे विठ्ठलभट. त्यांत वडील हरिभट यांनी पुळ्याच्या श्रीगणपतीजवळ अनुष्ठान द्वादश वर्षे दूर्वारस प्राशन करून केले. त्यांस सहा पुत्र जाहले वडील कृष्णभट बापाजी. दुसरे बाळंभट. तिसरे त्रिंबकपंत. चौथे गोविंदपंत नाना. पाचवे महादेव ह्मणून होते, त्यास संतति नाही; ते मुंज होऊन वारले सहावे रामचंद्रपंत आप्पा सातवे भास्करपंत आप्पा. आठवी ताराबाई कन्या, वैशंपायन यांचे घरी दिली

२ त्यात वडील कृष्णभट बापाजी यांचे वंशाचा व कीर्तीचा विस्तार लिहितों. त्यास प्रथम दोन कन्या जाहल्या. वडील वेणूबाई जोशी. दुसरी भिमाबाई काळी. व पुत्र सहा जाहले त्यांची नावे— वडील पुत्र नारायणराव नाना. दुसरे पुरुषोत्तमराव दाजी. तिसरे मेघःश्यामराव बापू. चवथे जनार्दन ह्मणून होते त्यांस संतति नाहीं; ते मुंज होतांच वारले. पाचवे महादेवराव अण्णा. सहावे लक्ष्मणराव, त्यांस बळवंतराव दादा ह्मणत होते. असे पाच पुत्र. त्याणी श्रीमंत पेशवे यांची सेवा एकनिष्ठपणें करून तैनाता व जहागिरी संपादन केल्या. त्या कसकशा केल्या, पेशवे यांची सेवा कशी केली, व पराक्रम कसे केले, ते वर्णन करितो।

३. प्रथम सारी मंडळी कुरुंदवाडास होती नंतर श्रीमंतांची सेवा करून सरंजाम गोविंद हरि याणीं संपादन केला ते मिरजेस जाऊन राहिले. तेथें बाळंभट अण्णा व भास्कर हरि हेही मिरज मुक्कामी राहिले. रामचंद्र हरि हे पुण्यास श्रीमंतांसन्निध होते. त्रिंबक हरि याणीं कुरुंदवाड, घोरपडे याजकडून रदकर्जास घेतलें ते कुरुंदवाडासच राहिले. कृष्णंभट बापाजी तेथें कुरुंदवाडास संसार प्रपंच पहात होते. नंतर घरांत पटेनासे जाहलें,

---

१. पटवर्धनाचे उपास्य दैवत गणपति व कुलस्वामिनी देवता करजेश्वरी ही आहेत करजेश्वरीचे देवस्थान चिपळूणनजीक गोवळकोट येथे आहे २. कोतवडें गाव रत्नागिरी तालुक्यांत आहे. ३ हरिभट यांसच हरभट ह्मणतात. हरिहरांत भेद नाहीं। ४ एकंदर सात पैकी अल्पवयात वारलेला वजा ५. इ. स १७६२च्या प्रारंभी. ६ त्याचे चिरंजीव परशुरामभाऊ हे पुढे तासगावास राहू लागले ७. इ. स. १७३६ साली.

सबब गोविंदराव नाना यांणीं मंगळवेढेची मामलत सरकारांतून मेघःश्यामराव कृष्ण यांचे नांवें करून घेतली तेथें कृष्णभट बापाजी येऊन राहिले नाना हे बापाजींची मर्जी बहुत रक्षण करीत.

४. बापाजींचे वडील पुत्र नारायणराव हे गोपाळराव दादा यांजजवळ जाऊन राहिले त्या उभयतांचा बहुत लोभ. दरोबस्त दौलतीचा कारभार नारायणराव नाना करीत. गोपाळराव यांची सरदारी व नारायणराव हे कारभारी याप्रमाणें चालले. नारायणराव नाना याणीं प्रपंचाचा बंदोबस्त बहुत केला. प्रथम कुरुंदवाडाहून मगळवेढ्यास आले ते समयी त्रिंबकपंत आपा याणीं नऊ घोडी मात्र दिलीं वाटखर्चास तांदूळ देखील दिले नाहींत व यांजवळही खर्चास अगदी नाही. ही कथा विष्णुपंत भाऊ यादवाडकर याणीं सांगितली. नारायणराव नाना नऊ घोडीं घेऊन बाहेर पेठेत येऊन राहिले नंतर हरभटबावा यांचा स्नेही कोणी शूद्र होता त्याची गाठ पडली. तो बोलला जे, नारायणा, तू असा दिलगीर कां जाहलास ? याणीं सांगितलें जे. खर्चास अगदी नाही. घोड्यांस दाणावैरणीची वाट काय ? मग त्या शूद्रानें राग भरून यांचे दाणावैरणीचा बंदोबस्त करून खर्चास मंगळवेढेपावेतों त्यानें दिलें. याप्रमाणें विष्णुपंत भाऊ यादवाडकर यांचे मुखें वर्तमान ऐकिलें तें लिहिलें.

५. असें असतां नारायणराव नाना याणीं प्रपंच बहुत थाटला. घरात कोणे गोष्टीची न्यूनता नाहीं श्रीमंतांकडून तैनात चार हजार रुपये व पालखी जाहली. खेरीज मंगळवेढस दीडशे रुपयेची जमीन सन सब्बा खमसैनांत इनाम जाहली. नारायणराव नाना याणीं सरकारांत कामकाजही केलें. घोडनदीचे लढाईत मानेवर तलवारीची जखम लागली. बाळंभट अण्णा यांस एक पुत्र मोरो बल्लाळ जाहले. ते भावाबंदाचा बहुत द्वेष करीत. त्यांस कारभार सांगावा ह्मणून सत्यभामाबाई ताई यांचे ह्मणणे होतें, परतु गोपाळराव दादा यांचा लोभ नारायणराव नाना याजवर फार; याजमुळे चाललें नाहीं. नाना हेच मिरजकर यांचे घरीं कारभार करीत होते. याप्रमाणे नारायणराव नाना पराक्रमी जाहले.

६. त्याचे दुसरे बंधु पुरुषोत्तमराव दाजी. याणीं बहुत पराक्रम केले. हे सहा वर्षांचे होते ते समयी केशवभट यांचे पुत्र शिवाजी केशव, —त्यांस शिऊबा आप्पा ह्मणत,— त्याणीं

१ मंगळवेढे, करकंब, पंढरपुर, विजापूर हा सर्व मुलूख पूर्वी शाहूमहाराजानीं प्रतिनिधीस जहागीर दिला होता. तो १७५० त पेशव्यानीं घेतला त्या किंवा त्या पुढच्या सालीं पेशव्यानीं ही मंगळवेढची मामलत पटवर्धनाकडे दिली असावी. २ पूर्वी हुजरातींत इंद्राजी कदम ह्मणून सरदार होते ते दिल्लीच्या एका स्वारीत पडले. त्यानंतर गोविंद हरि पटवर्धन हे कदमाच्या पथकाचे फडणीस होते त्यासच बाजीराव बल्लाळ पेशव्यानीं त्या पथकाची सरदारी दिली पुढे गोविंद हरि वृद्ध झाल्यामुळे गोपाळराव गोविंद सरदारी करूं लागले. ३ नव्हतें. ४. मिळाली. ५. इ. स. १७५६।५७ सालीं. ६. ऐतिहासिक–लेखसंग्रह नंबर ११६ पहा. ७ हे गोपाळरावाच्या आईचे नाव.

यांस घेऊन साताऱ्यास गेले. नंतर माहुलीस श्रीकृष्णातीरी आले. नंतर . तेथें वाळवंटीत दाजी खेळत होते. शिऊबा आप्पा यांचीं धोतरें वाळत घातलीं होतीं तेथेंच खेळत होते. तों अकस्मात् त्या मार्गानें छत्रपति शाहूमहाराज यांची स्वारी आली ते एकटे, पायात विजार व हातात छडी याप्रमाणें आले मस्तकास काही अगदी नाही तों दाजी बोलले जे, अरे गोसाव्या, आमचे धोतरास शिवशील. याप्रमाणे म्हणताच महाराज म्हणाले जे, अरे मुला, तुझ्या धोतरांस आम्ही काही शिवत नाहीं ! असे म्हणून तेथून जाऊन अबराईंत आंब्याचे वृक्षाखाली बसले तों मागून फौज व हत्ती, घोडीं, पालखी, चोपदार, भालदार, हुजरे, जासूद, व लोक, लोकपाळ, वगैरे सरजाम आला ते महाराज जेथें बसले होते तेथें जमा जाहले नंतर महाराज याणी शोधास जासूद पाठविला. त्याणी शोध घेऊन सांगितले जे, शिऊबा आप्पा पटवर्धन आहेत असें समजलेवर महाराज याणीं बोलावणें पाठविले शिऊबा आप्पा यास दाजी याणी हे वर्तमान सागितले जे, मी महाराजास 'गोसावी' असे म्हटले, म्हणोन सागितलेवर त्यास काही महाराजाचे दर्शनास घेऊन गेले नाहींत. आपण एकटेच गेले जाऊन ग्वरनिसी करून बसले. तो महाराज याणीं आज्ञा केली जे, तुमचे मुलास का आणिले नाही ? याणी विनंति केली जे, 'महाराज, तो मूल लहान आहे !' नतर आज्ञा जाहली जे, 'त्यास आणिवणे.' मग यास घेऊन गेलेवर 'पायावर डोई ठेव' ह्मणोन आप्पानी सागितलेवर दाजीनी महाराजाच्या पायांवर मस्तक ठेविले. महाराज बोलले जे, 'अहो शिऊबा, हा मूल मोठा धीट आहे ! आह्मांस 'गोसाव्या, धोतरांस शिवशील,' असे बोलला !' याणी उत्तर केले, 'महाराज, तो अज्ञान आहे.' महाराज बोलले जे, हा मोठा पराक्रमी होईल. असे बोलून शेला व पागोटे आणोन वस्त्रें दिलीं. याणी चरणीं मस्तक ठविलें. महाराज याणी मस्तकीं हात ठेविला. याप्रमाणें सहा वर्षाचे वयांत महाराज यांची कृपा संपादून त्याणीं वरदहस्त याच्या मस्तकीं ठेविला. हे पुढें महापराक्रमी जाहले.

७. पुढें रामचंद्र हरि यांस पुत्र नव्हता, सबब त्यांनी यास बापाजी यांजपासोन मागून घेऊन आपले समागमें लष्करांत हिंडवीत होते. हे दहा अकरा वर्षाचे वयात आले.

---

१. एका वेळीं शाहूमहाराजाच्या मनास किंचित् भ्रम उत्पन्न झाला होता त्या भ्रमानते एकदा शिकारीस गेले असता त्यास वाघाने गाठले. त्या वेळी बरोबर एक आवडता शिकारी कुत्रा होता त्याने वाघास मारून महाराजाचा जीव वाचविला तेव्हा महाराज प्रसन्न होऊन त्याणी कुत्र्यास पाच हजाराची जहागीर व पालखी दिली। इतकेंच नव्हे तर भरदरबारात आपल्या डोक्याचे पागोटे काढून महाराजानी कुत्र्याच्या डोक्यास घातले. पुढे मनाचा भ्रम नाहीसा झाल्यावर महाराजास स्वतःचे पागोटें कुत्र्याच्या डोईस घातल्याबद्दल फार खंती वाटून त्यानी डोक्यास कांहीच न घालण्याचा निश्चय केला व तो आमरणात् चालविला. शेवाय पोटी पुत्रसतान नसल्यामुळे त्याची वागणूक कांहीशी विदेही, उदासीन अशा प्रकारची झाली होती. २. मुजरा. ३. हा राजदर्शनाचा प्रसग सन १७३५।३६ साली घडला असावा.

मुंज रामचंद्र पंत आप्पा याणीच केली, लग्नहीं केलें. पुढे आप्पांस पुत्र परशुरामपंतभाऊ जाहले. ते साक्षात् परशुराम अवतार जाहला.

८ रामचंद्रपंतआप्पा याणीं स्वाऱ्या शिकाऱ्या वगैरे बहुत केल्या. ते श्रीमंत चिमाजीआप्पासाहेब पेशवे याजपाशीं जाऊन राहिले ते एक्या घोड्यानिशी जाऊन राहिले. त्यांचा किंचित् पराक्रम वर्णन करितो. त्यास श्रीमंत चिमाजीआप्पा खडी ताजीम देत होते. श्रीमंत बाजीरावसाहेब याणी कोणे एके समयी रामचंद्रपंतआप्पास ताजीम दिली नाहीं; तो हे कचेरींतून उठून गेले. श्रीमंतांनी चिमाजीआप्पा यास विचारिलें जे, रामचंद्र हरि पटवर्धन मोठा रागीट आहे, कचेरीतून उठून गेला. असे ह्मणताच श्रीमंत चिमाजीआप्पा बोलले जे, 'तो शिपाई आहे. आपण ताजीम दिली नाही ह्मणोन उठून गेला.' ते मनात धरून पुढे हिंदुस्थानचे स्वारीस सवाई जयसिंग यांचे लढाईत त्याणी सांगितले जे, 'आह्माकडील एक भालेकरी व तुह्माकडील एक भालेकरी अशी लढाई व्हावी. तुह्माकडील भालेकरी यानें आमचे भालेकरी यास मारल्यास आह्मी चवथाई राज्य तुह्मास देतों.' असें ठरून त्याणीं एक रजपूत भालेकरी तिकडून पाठवून दिला नंतर श्रीमंत बाजीरावसाहेब अंबारींत होते तेथून रामचंद्र हरि यांस बोलावून सांगितले जे, 'तुह्मी पुढे व्हावें.' नंतर श्रीगजाननाचें व हरभटजीबावांचे स्मरण करून आप्पानी घोडा पुढे टाकला. नंतर तिकडून भालेकरी आला, त्यानें विचारलें जे, तुह्मी कोण आहां? आप्पानी उत्तर केले जे, आह्मी शिपाई आहोंत. याप्रमाणे बोलले. तो श्रीमंत चिमाजीआप्पासाहेब श्रीमंत बाजीरावसाहेब यांस बोलले जे, 'आपण ही गोष्ट नीट केली नाही. आमची ब्राह्मणाची शिपाईगिरी मुसलमान रजपूत यांजपुढे नाही! आतां तो अब्रूचा ब्राह्मण फुकट मरून जाईल!' याप्रमाणें बोलले, नंतर उभयताची भाल्याची लढाई लागली दैवयोग व श्रीगजाननाची कृपा व श्रीमंताचा होता काळ, त्यामुळे अकस्मात् भाला रजपूत याचे भ्रूमध्यभागी लागून ठार जाहला. तो श्रीमंतांकडील शहाजाने नौबती वाजून श्रीमतांनीं आपले लष्करांत रामचंद्र हरि यांस बहुत सरंजामाने आणिले, आणि अडीच हजार रावतांचा सरंजाम देऊन वस्त्र दिली पुढें वसईस श्रीमंत चिमाजीआप्पासाहेब यांजसमागमे हल्ल्याचे वेळेस निशाण आप्पांनी चढविलें. नंतर तेथील फडणिसी त्यांस सांगितली ती अद्याप चालत आहे. पुढे शिवराजपुरास भागीरथीतीरी आप्पांचा काळ जाहला. याप्रमाणें त्यांनीं सरकारसेवा एकनिष्ठपणें केली.

९. जे समयी शिवराजपुरास आप्पांचे प्राणोत्क्रमणाचे वेळेस प्राण घोटाळूं लागले,

---

१. राजे सवाई जयसिंग, माळव्याचे सुभेदार यांनी बाजीराव बल्लाळ पेशव्यास माळव्याची चौथ व सरदेशमुखी देण्याचें कबूल केलें ते स० १७३५ चा वर्षी. २ उदयोन्मुख. ३ जयवाद्ये ४. सरजामाचा मुलूख त्या वेळी दिला नाही पुढे पुष्कळ वर्षांनी दिला. ५. सन १७३९ त. ६. स. १७४३ त.

तेव्हा पुरुषोत्तमराव दाजी यांचे वय बारा वर्षांचे त्याणी विचारलें जे, आप्पा, आपले मनांत काय आहे ? आप्पा बोलले जे, भाऊस मी शल्य करून ठेविले ! तूं भाऊबरोबर भांडून वांटणी घेशील. नंतर दाजी याणी उत्तर केलें कीं, माझे तळहातास केस काहीं आले नाहींत ! वांटणी मागणें हे काम निराळाचें ! मी काही वाटणी मागणार नाहीं, असें बोलले. नंतर आप्पानी आज्ञा केली की, बोलल्याप्रमाणें माझे गळ्यावर हात ठेवणें. असें ह्मणतांच दाजी याणी गळ्यावर हात ठेविला. मग आप्पांनी आज्ञा केली की, भाऊ लहान आहे तोंपर्यंत ही पागा संभाळून लौकिक रक्षण करून माझे नाव रक्षण करावे, याप्रमाणें मला वचन देणे असे ह्मणताच पुनः शपथ केली. पुढे आप्पांचा काळ जाहला व शेवटील कार्य सर्व दाजी यानीच केले ते समयी अंताजीपंत तात्या यादवाडकर हे तेथेच होते. परशुरामभाऊ यांची मुंज मात्र जाहली होती किंवा नाही हा मजकूर पक्का माहीत नाहीं. परतु वय फार लहान. कशावरून ह्मणाल, तर रामचद्रपंत आप्पा श्रीमंत नानासाहेब यांचे कारकीर्दीत वारले. पुढें श्रीमंत नानासाहेब यांचे पत्र पुरुषोत्तमराव दाजीस आले. त्यांत लिहिले आहे की, "गोपाळराव यांचा बहुमान जाहल्यास गोविंदपंताचा जाहला; तुमचा जाहल्यास रामचंद्रपंताचे लेकाचा जाहला" त्याजवरून पाहता मुंज कांहीं जाहली नाही असें वाटतें.

१०. पुढें श्रीमंत नानासाहेब यांचे कारकीर्दीत साताऱ्यास दमाजी गाईकवाड याचें खूळ उभें राहिलं ते समयी त्याच्या बंदोबस्ताकरिता रास्ते यास जरीपटका देऊन रवाना केलें. बरोबर पटवर्धन यासही रवाना केलें. ते समयीं पुण्यांत कोणी सरदारमंडळींपैकीं बोलला जे, रामचंद्र हरि यांचे पथक बाळपरवेशी. रांडरोटी चालवावयाची; गोपाळरावामुळे चालवावें, असें कोणी बोलला. ते समयीं पुण्यांत परशुरामभाऊ यांची मातुश्री होती. त्यांनी ऐकिलेवरून पुरुषोत्तमराव दाजीस बोलावून नेऊन मातुश्री फार श्रमी जाहली आणि बोलली जे, वडील गेले, मूल लहान, आपलें कोणी कर्ते नाही, याजमुळें अशी उणी उत्तरें ऐकणें प्राप्त जाहली ! तुझेही वय लहान तुला वडिलानी सांगितले तो कांहीं अभिमान धरून कामकाज करून दाखवीत ! असें ह्मणून बहुत श्रमी होऊं लागली. नंतर दाजी बोलले जे, बाई, तुला एक ठाऊक असा दे. या स्वारीत निराळी

१. अंताजी विठ्ठल यादवाडकर हे रामचंद्रपंत आप्पाचे चुलत चुलत होते २. रामचंद्रपंत आप्पाचे मरणसमयी परशुरामभाऊस चवथें वर्ष लागले होते. ३ परशुरामभाऊंची मुंज झालेली असती तर दुखवट्याचे पत्र पुरुषोत्तमराव यास न येता भाऊसच आले असते असा लिहिणाराचा अभिप्राय ४ म १७५१ त. ५. ही माहिती चुकली आहे. रास्त्याच्या जागी नाना पुरंदऱ्यांचें नाव पाहिजे. पुरंदरे पेशव्याकडून साताऱ्यास ताराबाईच्या बंदोबस्ताकरिता होते. तिने दमाजी गायकवाड यास गुजराथेंतून साताऱ्यास बोलावून आणिलें. मग प्रथम गायकवाडांनी पुरंदऱ्याचा व मागून पुरंदऱ्यानी गायकवाडाचा पराजय केला. ६. गोपाळरावाच्या थोर सरदारीवर लक्ष्य देऊन हे त्याच्या चुलत्याचे पथक सांभाळून घ्याव लागते

चाकरी करून दाखवीन तरच तुला तोंड दाखवीन नाहीपेक्षां पांढरे कावळे असतील तिकडे जाईन ! असें ह्मणून आपले पागेतील नानकरी शिपाई बोलावून आणून सर्वास ही गोष्ट सांगून त्यास विचारिलें की, मराठी चाकरी करून दाखविता, किंवा राडरोटी खातां ? असें विचारिलें तेव्हा सर्वांनी सांगितले की, आह्मांस अभिमान नाही की काय ? प्रसंग मात्र पडावा ! दाजी बोलले की याप्रमाणे बाईच्या पायावर हात ठेवावा की प्रसंगास आह्मी माघारे सरणार नाहीं. असे सांगून सर्वांनी बाईचे पायांवर हात ठेविला. मग स्वारीस निघाले ते साताऱ्यास गेले. नंतर लढाईचा मोकदमा सुरू जाहला. रास्ते जरीपटका घेऊन आले सबब पटवर्धन गोपाळराव दादा निराळे फुटून एकीकडे उभे राहिले. पुरुषोत्तमराव दाजी आपले पथक घेऊन निराळेच उभे राहिले. रास्ते यांसी व गाईकवाड यांसींच तोंड लागलें. तों रास्ते यांच्या फौजेचा मोड जाहला. गाईकवाड यांची फौज पाठीस लागली ते माहुलीपर्यंत मारीत गेले. तों मध्येंच रामचंद्र हरि यांचें पथक घेऊन पुरुषोत्तमराव दाजी उठले ते ख्वासा दमाजी गायकवाड याचीच गाठ पडून लढाई मातबर जाहली. दमाजी गायकवाड याची फौज मोडून किल्ल्याचे माचीपर्यंत मारीत गेले. याप्रमाणें बिघडलेली लढाई सुधरली ते समयी पुण्यास अकबार गेली जे, आज रामचंद्र हरि यांचे पथकांत पुरुषोत्तमराव दाजी याणी कामकाज चांगले केलें. त्या वेळेपासोन श्रीमंत नानासाहेब याची पूर्ण कृपा जाहली

११. पुढे साताऱ्याचा बंदोबस्त करून दमाजी गाईकवाड यांचे तहाचें बोलणे ठरोन गाईकवाड याणीं आपले देशास जावे असे ठरलें त्यास भेटीस बोलाविलें. भेटीस येण्याचे ठरलें. तिसरे प्रहरी भेटीस यावे असें सांगून पाठविलें तों ते अकस्मात् दोन प्रहरींच भेटीस आले. तों बिचोऱ्यांत श्रीमंत नानासाहेब बसले होते, जवळ पुरुषोत्तमराव दाजी बसले होते. तों गाईकवाड आले ह्मणोन समजलें त्यास सामोरे जावें लागतें अशी चाल आहे. तों गडबडीने श्रीमंत उठले. खिजमतगार वगैरे येतात तों इतक्यात दाजी याणी जोडा श्रीमंतांपुढे ठेविला ! श्रीमंत ह्मणाले अरे पुरुषोत्तमराव, हें काय करितोस ? यांनीं उत्तर केलें की, ' महाराज, आह्मी आपले चाकर, जे काम पडेल तें आह्मी करावयाचें. प्रसंगास आह्मी जोडाही उचलणार व लढाईत मरोनही जाणार ! त्यांत ते बाडानजीक आले आणि आतां खिजमतगारास हांक मारिली असता त्यास बेतरतूद अशी समजेल.' असें ह्मणतां श्रीमतास ती गोष्ट बहुत लीनतेची वाटली. मग दाजी यांचा हात धरून बाडापर्यंत सामोरे गेले. नंतर गाईकवाड याची भेट घेतली. अगोदर बोलले जे, दमाजी-

१. ह्मणजे देशांतर करीन । २ या लढाईत गोपाळराव होते की नव्हते ही वानवा आहे. पुढें लवकरच पेशव्यांनी साताऱ्यास येऊन दमाजीस कैद केले त्या वेळी मात्र गोपाळरावांनी कामकाज चांगले केलें. ३. लहान राहुटीत. ४. पेशव्याच्या खास व्यवस्थेची ही दशा असें वाटेल.

बावा, पुरुषोत्तमराव यास भेटावे. नंतर त्याणी भेट घेऊन विचारले की, नाना, हे कोण ? मग श्रीमंत बोलले जे, दमाजीबावा, पुरुषोत्तमराव आपणास ठाहीत नाहीत की काय ? जे समयीं सातान्यास आपले फौजेची व आमचे फौजेची लढाई जाहली ते समयी आमचे फौजेचा मोड जाहला, ते वेळेस रामचंद्र हरीचे पथकांत पुरुषोत्तमराव याणी उठोन लढाई करून कामकाज केलें, ते हे पुरुषोत्तमराव. असे म्हणतांच दमाजी गाईकवाड यांस ती गोष्ट लागली आणि उगाच राहिले नंतर डेन्यास येऊन पानसुपारी गुलाब अत्तर होऊन गाईकवाड यांस व त्याचे मानकरी वगैरे सर्वास वस्त्रे दिली नंतर गाईकवाड बोलले जे, नाना, उदईक आमचे डेन्यास यावे. श्रीमंतानी बरे म्हणून सांगितले मग गाईकवाड यांस निरोप दिला.

१२. नंतर पुरुषोत्तमराव दाजी बोलले की, माझे पराक्रमाची गोष्ट त्यांजपाशी कशास सांगितली ? सर्व प्रताप स्वामीचा. श्रीमंत बोलले की, तुम्ही पराक्रम केला म्हणून सांगितलें ! आता उदईक त्यानें आम्हास बोलाविले त्यास तुम्हास घेऊन जाऊन अगोदर वस्त्रें तुम्हांस देववून नंतर आम्ही घेऊ असे बोलले दुसरे दिवशी श्रीमंताकडे पुरुषोत्तमराव दाजी गेले नाहीत. तो गाईकवाड यांची सूचना आली. तो त्याचे डेन्यास जाण्याची श्रीमंतांची तयारी झाली आणि यास बोलावणे पाठविले याणी दडून निराळे एक्या पालांत जाऊन निजले तो श्रीमंतांची दोन चार बोलावणी आली. तो गोपाळराव दादा याणीं लष्करांत शोध करून बोलावून आणिले आणि बोलले की, 'अरे दाजी, तूं कोठें होतास ? श्रीमंतांची दोन चार बोलावणी आली मग हे तयार होऊन गेले. श्रीमंतांची सारी तयारी होऊन यांची वाट पहात बसले तो जाताच बोलले की, अहो पुरुषोत्तमराव, तुम्ही कोठें होतां ? काल तुम्हास सांगितलें होते असे म्हणून बरोबर घेऊन त्यांचे डेन्यास गेले. गाईकवाड यांची भेट जाहली गाईकवाड व दाजी यास भेटले. ओळख पक्की जाहली ! नंतर गुलाब अत्तर. पानसुपारी होऊन वस्त्रे सोडेतीन आणिली. तीं वस्त्रे गाईकवाड आपले हातात घेऊन श्रीमंतास जो देतात तो गाईकवाड यांचा हात धरून श्रीमंत बोलले जे, दमाजीबावा, पुरुषोत्तमराव यांस वस्त्रें द्यावी, असें म्हणून आपणास जी वस्त्रे द्यावयास आणिली तीच यास देवविलीं. नंतर आपण दुसरीं घेतली आणि निरोप घेऊन आपले डेन्यास आले. एकांती यास विचारिले कीं 'अरे पुरुषोत्तमराव, तुला समजलें की नाहीं ' मला जी वस्त्रे द्यावयास आणिली तींच तुला दिलीं. मी घेऊन तुला दुसरीं देवविली असती तर उणांख देता, याजमुळे असें केलें !'

---

१. विजार, झगा, शिरपाव व अंग किनखाबाचे ठाण मिळून वस्त्रे साडेतीन. २ उणा + आंख = उणाख. उणे आंखाची, कमी किमतीची पेशवाईत हिशेबाच्या सोइकरिता कापडाची मोडणी आंखावरच करीत. अमुक इसमास पधरा आंख कापड द्यावे म्हणजे पधरा आंख वरजेचे ( अर्थात् रिवाज असेल त्याप्रमाणे पाच, दहा किंवा बारा रुपये किमतीचे ) कापड द्यावे असा अर्थ पेशव्यांच्या म्हणण्याचा अभिप्राय असा की आज तुम्हाला उणाख वस्त्रे घेऊ दिली असती तर गाईकवाडाच्या दरबारी तोच दाखला पडून पुढे कोणा काळी प्रसंग येईल तेव्हा तुम्हास उणाख वस्त्रेच मिळावयाची. आता आमच्या युक्तीमुळे त्या दरबारात तुमचा दर्जा पहिल्या प्रतीचा झाला त्यामुळे त्याच दर्जाची वस्त्रे मिळत जातील !

यांनीं हात जोडून विनंति केली की, सर्व अभिमान स्वामींस आह्मास वाढवावें असें स्वामींचे मनांत आहे त्यापेक्षां आह्मास काय फर्मी ! याप्रमाणे श्रीमंतांचा पूर्ण लोभ संपादन केला.

१३. नंतर सावनूरचे स्वारीस श्रीमंत नानासाहेब व भाऊसाहेब निघाले.[1] बरोबर दरोबस्त पागेपथके[2] निघाले ते समयीं पुरुषोत्तमराव दाजी यांची प्रकृति नीट नव्हती, सबब मंगळवेढ्यास घरीं होते. तो श्रीमंत सावनुरास गेलेवर गोपाळराव दादा यांस विचारले जे, पुरुषोत्तमराव का आले नाहीत ? त्यांस लौकर आणवणे. त्याजवरून गोपाळराव दादा याणी पत्र पाठविलें त्यात लिहिले जे, ' श्रीमंतानी चिरंजीव भाऊजवळ तुमचे स्मरण पांचसात वेळ केले जे, बरे जाहले असलिया आणवावें, त्यावरून लिहिले आहे, तर तुह्मी लौकर येणे.' असे पत्र देऊन दोन असामी स्वार तेथून पाठविले. ते मंगळवेढ्यास आले. त्यांनी पत्र देतांच दिनशुद्धि पाहून नतर पुरुषोत्तमराव दाजी निघाले ते टाकोटाक सावनुरास आले गोपाळराव दादा याणीं स्वारांस सांगितले होतें की दाजीस अगोदर आह्मांकडे घेऊन येणें. परभारां श्रीमंतांकडे जाऊं देऊ नये. तो हे गेले ते दिवशी श्रीमंताजवळच कचेरीस गोपाळराव दादा होते, तेथच गेले. श्रीमतांस नमस्कार करून सर्वांस नमस्कार जाहला आणि कचेरीस बसले श्रीमंतानी प्रकृतीचे वगैरे विचारिलेनतर आणखी किल्ल्याप्रकरणी गोष्टी श्रीमंतांनी काढिल्या जे, आमचे मोर्चे बसून आठ पंधरा दिवस जाहले, अद्याप बातमी आंतील लागत नाही. काय करावे ? असे श्रीमंत भाऊसाहेब यांस विचारिले, तो पुरुषोत्तमराव दाजी बोलले की, मला आज्ञा जाहलियास मी बातमी

---

१ सावनूरची स्वारी स. १७५५।५६ साली. २. पागेतली घोडी सरकारचे मालकीची असून त्यावर बसण्यास सरकारातून दरमहा देऊन शिपाई ठेवलेले असत त्यास बारगीर म्हणत बारगिरास पगार चार पाच रुपयापासून आठ दहापर्यंत माणूस पाहून असे अशा पागेवरच्या सरदारास पागा म्हणत दहा घोड्यापासून पाचशे सातशे हजारपर्यंत सुद्धा घोड्याच्या पागा असत पागेकडे नौबत, निशाण, पालख्या, फडणीस, पोतनीस वगैरे दरकदार, मशालजी, शिग्ये, पखाली, खासदार, नालबंद, दाणेकरी, जासूद, गारदी, फरास, डेरे, राहुट्या, कारखाने, ओझ्याची व वैरण आणण्याची तट्टे, बैल, उंट, हत्ती इत्यादि सरंजाम असे. त्याचा सर्व कच्चा खर्च सरकारातून चाले एक पागा म्हणजे हजारो लोकांचे पोट भरण्याचे साधन ! घरची घोडी घेऊन सैन्यात चाकरी करणारे ते शिलेदार. त्याच्या समुदायास नाव पथक त्यावरचे सरदार ते पथके पथकाचे सर्व खर्च पागेचे खर्च वर सांगितले आहेत त्याचप्रमाणे असत. पथकाच्या खर्चास सरकारातून नक्त पैका मिळत असेल तर त्यास इतलाखी पथक म्हणत सरंजाम म्हणजे खर्चाकरितां मुलूख तोडून दिला असेल तर त्यास सरंजामी पथक म्हणत शिलेदाराचा पगार घोडे माणस हत्यार पाहून दरमहा वीस रुपयापासून तीस पन्नासपर्यंत असे. हे स्थूलमान सांगितले आहे पगारच्या चढवढ्याची सदरे नालबंदा, रोजमुरा, तलब वगैरे आहेत तो तपशील येथे देत नाही. सर्व पथक्याच्या सामर्थ्या पागाही लहान मोठ्या असत. हुजूर म्हणजे मुख्य धनी, त्याबरोबर स्वारीस निघणारी फौज ती हुजरात. महाराजांबरोबर असणारी ती राजहुजरात. अर्थात् पथक्यास येथे पथकी व राजपथकी असे दोन भेद होते. पथक्यांत वरिष्ठ शिंदे होळकर. राजपथक्यात वरिष्ठ पेशवे, भोसले व गाईकवाड राजपथकी दहा स्वाराचा धनी असला तरी त्याचे हक्क, मानपान इतर पथक्यांपेक्षा जास्त होते. ३. परशुरामभाऊजवळ.

आणीन. श्रीमतांनीं आज्ञा केली की, बातमी आणावी असे ह्मणून गोपाळराव यांस आज्ञा केली जे, पुरुषोत्तमराव याजसमागमे स्वार द्यावेत. नंतर दाजी दोनशे स्वार घेऊन किल्ल्याचे भोंवते तलाव्यास गेले. तो आतील कांहीसे तट्टे पांच पन्नास किल्ल्याचे लगत कुरण होते त्यांत गवत कापावयास आली होती. त्यांत काही स्वारही होते. त्यांची याची लढाई थोडीशी जाहली ती सारी तट्टे व माणसे धरून दरोबस्त एक्या चार घटकेत घेऊन आले. तो श्रीमंत कचेरीसच बसले होते येऊन श्रीमंतास नमस्कार करून विनंति केली की, स्वामींची आज्ञा जाहली त्यावरून तलाव्यास गेलो होतो, तो गवत कापावयास तट्टे आली होती त्यांची गाठ पडली ती तट्टे व माणसे धरून आणिली. ती तट्टे पागेस लावावयाची आज्ञा व्हावी, व माणसे आणिली आहेत त्यास बातमी विचारावी असे म्हणताच श्रीमंतांस बहुत संतोष वाटून श्रीमंत भाऊसाहेब यास बोलले की, अरे भाऊ, पुरुषोत्तमराव नुकते आले, अद्यापि कबर देखील सोडिली नाही, तो आह्मास आठ पधरा दिवस जाहले, किल्ल्यातील बातमी अगदी नव्हती, ती बातमीही आह्मास लागली व घोडीही पागेस लागली! गोपाळराव याणी असले मनुष्य घरी ठेविले होते! असे किंचित रागाने बोलले.

१४. पुढे दुसरे दिवशी श्रीमंतानी स्नानसंध्या आटपून लढाईस सिद्ध जाहले. स्वारीत उभयता बंधु अंबारीत बसले. सर्व फौज तयार होऊन आपलाले बिल्हेवार उभी राहिली. तोफखाना वगैरे मारगिरी आतून बाहेरून चालली. सावनूरकर नबाब याजकडील पठाण किल्ल्याचे रेवणींवर सतरज्या हातरून वर बसून तिरंदाजी करीत. याप्रमाणे तिराचा मार व बंदुकीचा मार चालला तो श्रीमंतांनी गोपाळराव दादास हाक मारिली. तों भालदार बोलवावयास आले तो गोपाळराव दादा खांद्यावर भाला घेऊन तसाच घोडा पुढे ढकलला आणि अंबारीचे हत्ती जवळ आले. श्रीमंतानी आज्ञा केली की, पुढे जावे असे ह्मणतांच तसेच पुढे जाहले तो जेथे तिराचा व गोळ्याचा पाऊस पडत होता त्या जागयावर जाऊन उभे राहिले आणि आपले जागा ह्मणाले जे, आज माझे पंगतीस भाऊबंद मंडळीची ताटे पंचवीस जेवितात, परंतु आज मरावयास मी मात्र एकटा! याप्रमाणे बोलले. तो शब्द पुरुषोत्तमराव दाजी यानी ऐकिला. ते लगतच पाठीमागे होते त्याणी घोडा आपला पुढे ढकलला आणि बोलले कीं, अरे दादा, तुला कळले का? जे तुझ्या पंगतीस

१ टेहाळणीस. २ दाणावैरण आणावयास. ३ सरकारी पागेस जमा करावयाची. ४ नानासाहेब व भाऊसाहेब. ५ तटाखाली खंदकाचे पुढे मोकळी जागा थोडीशी असते तिला रेवणी म्हणतात. किल्ल्याच्या रक्षणार्थ बाहेरच्या चौक्या असतात त्या येथेच राहतात. ६ येथेच मरू पण जागा कधी सोडणार नाही, असा आपला निश्चय शत्रूस कळावा म्हणून. ७ गोपाळरावाचा भाला अद्यापि मिरजेच्या वाड्यांत आहे. बुडी व शेवटचे फळ सुद्धा त्याची लांबी सुमारे आठ हात असून काठी जाड, भक्कम व भरीव आहे. तो नाठ माणसास सुद्धा दोनी हात लाविल्यावाचून उचलत नाही. तसबिरीवरून पाहिले तर गोपाळराव हा मध्यम उंचीचा सडपातळ मनुष्य असावा असे वाटते आणि असला मनुष्य हा भाला सहज लीलेने एका हातात वागवून पंचवीस पंचवीस कोसाची दौड कशी करीत असेल हे मनात येऊन फार अचंबा वाटतो!

जेवतील ते मरतील, पण मागे सरणार नाहीत असे ह्मणून खंदकाचे रेवणीपर्यंत जाऊन एक पठाण ठार मारिला नारायणराव नाना हेही पुढे जाहले, तो दाजीस तिराची जखम लागतांच जिनावर डोचके ठेविले, तो श्रीमंतानी अंबारीतून पाहिले आणि बोलले की, अरे भाऊ, पुरुषोत्तमराव यास जखम लागली, त्यास पालखी पाठवावी नतर श्रीमंतांनी पालखी पाठविली तो इकडे नारायणराव नाना याचे खासगीचे स्वार होते त्याणी भाल्याची झोळी करून झोळीत यास घातले, तो सरकारची पालखी आली नतर दाजी बोलले की, आह्मी असले पालखीत बसत नाही ! आमची शिलेदारांची झोळी हीच पालखी ! असे ह्मणतांच बातमी श्रीमंतास समजली श्रीमतांनी आज्ञा केली की, पुरुषोत्तमराव यास सागावे की, आजपासून तुह्मांस पालखी दिली[1]. तुह्मी पालखीत बसावे नतर पालखीत बसून गोटास आले मग सरकारचे कमानदार वगैरे जखमा शिवणार श्रीमतांनी पाठवून दिले. तो त्याणी येऊन पाहिले आणि ह्मणाले जे, यांचा तीर काढताच तिराबरोबर प्राण जाईल ! हे लोडास टेकून बसले होते त्याणी ऐकिले, आणि आपले हाताने तीर उपसून टाकिला ! याप्रमाणे धैर्य असे पाहून सर्वांस आश्चर्य जाहले पुढे काही दिवसांनी जखमही बरी जाहली. नंतर श्रीमतानी सावनूरचा बदोबस्त करून स्वारी पुन्हा पुण्यास आली. आलेवर तनात पालखीसुद्धा पसतीसशे रुपये तैनातजाबत्यास करून दिली याप्रमाणे श्रीमताची कृपा व सेवाही याप्रमाणे केली

१५. पुढे काही दिवसांनी श्रीमताची स्वारी खासा श्रीमंत नानासाहेब व भाऊसाहेब व दादासाहेब हे त्रिवर्ग बधु कर्नाटकचे स्वारीस जाते समयी पुरुषोत्तमराव दाजी यांनी सक्त रदबदली करून परगणे मगळवेढेवरून स्वारी येण्याचे ठरविले त्याप्रमाणे स्वारी मंगळवेढ्यास दाखल जाहली[2]. नतर श्रीमत नानासाहेब व दादासाहेब उभयतां बधु किल्ल्यांत येऊन उतरले. श्रीमत भाऊसाहेब लष्करात उतरले. ते समयी मजवानीस श्रीमतांची स्वारी आली समागमे मल्हारजी होळकर आदि मानकरी होते श्रीकाशीविश्वेश्वराचे दर्शन घेऊन आर्क[3] किल्ल्यांत आले. तो कृष्णभट बापाजी यानी चौकात सामोरे येऊन आशीर्वाद करून नारळ हातांत दिला. श्रीमतानी नमस्कार केला. नतर कचेरीस स्वारी येऊन बसली

---

१ ह्मणजे पालखी दिली एवढेच नाही. तर तिचा इतमाम साभाळण्याकरिता दरसाल बाराशे रुपयाची तैनात अथवा नगजामही दिला २ ह्मणजे बखर लिहिणाराचे मते पेशवे स. १७५७ त श्रीरंगपट्टणचे स्वारीस जाताना मगळवेढ्यास आले होते. पण ही समजूत चुकीची आहे स. १७५५ च्या अखेरीस सावनूरचे स्वारीस जाताना पेशवे मगळवेढ्यास आले होते हेच खरे. त्या वर्षी मात्र त्याबरोबर भाऊसाहेब, दादासाहेब व मल्हारजी होळकर हे तिघेही होते. त्याच वर्षी रघुनाथराव दादासाहेबांचे दुसरे लग्न गलगले येथे झाले त्या स्त्रीचे नाव आनदीबाई. ती रत्नागिरी जिल्ह्यात गुहागराजवळ मळण ह्मणून गाव आहे तेथचे राहणार रघोपत ओक यांची कन्या. ३ आर्क किल्ला = किल्ल्यातली गढी. बालेकिल्ला.

१६ नंतर आज्ञा जाहली जे, नारायणराव, पुरुषोत्तमराव, आमचे दादाचे दुसरे लग्न करावयाचे आहे. समागमें नवरी आहे त्यास आज केळवण करावयाचें ते कृष्णंभट यांचे घरीं करून त्यास अभ्यंगाची वगैरे तरतूद करणें असें सांगून मग मंडळीस आमंत्रण करविलीं. नंतर नारायणराव, पुरुषोत्तमराव उभयतां बंधुनी तेल उटणे श्रीमंत दादासाहेब यास लावून मग पाणी घालावयास लागले. तो तेथें श्रीमंत नानासाहेब बसून आपण पाणी अधिक घाला ह्मणून सांगितलें. श्रीमंत दादासाहेब वरचेवर पुरे ह्मणत. श्रीमंत खुणावीत जे, पाणी अधिक घालणें ! याप्रमाणें नाहण्याचा समारंभ जाहला.

१७ पुढें श्रीमंतानीं आज्ञा केली कीं, मल्हारजी होळकर यास आमंत्रण केले, परंतु ते माजघरांत भोजनास नमनील त्यांची कत्री जवळ असतात, ते कृष्णभटजी यास सोसणार नाहीं, त्यास तुह्मीं युक्तीनें सांगावें आणि सदरेवर बसावयाचें करावें. नंतर पुरुषोत्तमराव दाजी होळकर याजपाशीं येऊन म्हणाले जे सुभेदार ! श्रीमंताची स्वारी भोजनास येती. आपणही येतां त्यास आपण सदरेवर भोजनास बसावें. हें आमचें भिक्षुकाचें घर, सोवळें फार, यास्तव सांगतो. असें ह्मणताच होळकर श्रीमंतास म्हणाले जे, ' नाना, नाना, हा बामण मोठा बाटगा आहे ! आह्मास काय, कोठेंही तुकडा खातां येईल ! ' याप्रमाणें विनोदाचें भाषण करून नंतर भोजनास बसले.

१८ श्रीमंत भाऊसाहेब कांहीं भोजनास आले नाहीत. श्रीमंत भोजनास बसलेवर श्रीमंत भाऊसाहेब लष्करांत भोजन करून तेथें आले. मंगळवेढेकर कोरवूचे कांहीं खटलें होतें त्यांची फिर्याद देशपांडे याणीं श्रीमंत भाऊसाहेब याजजवळ केली. त्याची चवकशी करून त्याचा हात तोडावा याप्रमाणें ठरवून श्रीमंत भाऊसाहेब श्रीमंताची परवानगी घ्यावी असें म्हणून ती गोष्ट पंगतींत काढिली, आणि बोलले जे, त्याचा हात तोडावयाची आज्ञा व्हावी. तो श्रीमंतानीं कांहीं उत्तर केलें नाहीं. पुनः विचारलें जे, त्याचें बोट तोडावयाची तरी आज्ञा व्हावीं. नंतर श्रीमंत बोलले की 'अरे भाऊ, आह्मी कृष्णभटजी यांचे घरीं जेवावयास आलों. लोकाचे हातपाय तोडावयास काहीं आलों नाहीं ! ' असें म्हणून नारायणराव नाना यास सांगितलें जे, याची चौकशी पाहून वाजवी असेल ते करावें. असें सांगताच श्रीमंत भाऊसाहेब उगेच राहिले. नंतर भोजनें जाहलीं आणखी भोजन करतांना बापाजी बोलले जे,

---

१ आपण पानांत कत्री घेऊन जेवतो यांत ओवळें कांहीच नाहीं, आणि हा भिक्षुक माजघरांत जेऊं नको ह्मणतो. सोवळें मिरवितो. तेव्हां हाच बाटगा, असें विनोदाचें तात्पर्य. २ कानडी देशांत कोरवू हा गावकीकडे नोकरी करणारा धनगर जातीचा एक बलुतेदार असतो. ३ भाऊसाहेब सार्‍या पेशवाईचा कारभार करीत होते, पण स्वराज्यांत अपराध्याचें बोट सुद्धा तोडण्यास त्यास पेशव्यांची परवानगी लागत होती हें आश्चर्य करण्याजोगें आहे. गंगाधरराव गोविंद हे मिरजेच्या सुभ्यावर मामलेदार होते. मुलकी किंवा फौजदारी गुन्हा करणारास मार देणें योग्य वाटलें तर ते ती शिक्षा फक्त आपले समक्ष मात्र अमलांत आणीत हें त्या वेळच्या सरकारी कागदावरून स्पष्ट होतें.

'भाऊ, आपण आजच श्मश्रु करविली व नानांनीही आजच करविली, त्यास उभयतां बंधूंनीं एके दिवशीं करू नये.' असें ह्मणतांच श्रीमंत भाऊसाहेब बोलले जे, नानासाहेब यांनीं करविली हें मला समजलें नाही. याप्रमाणें बोलले. नंतर जेवणे जाहलियावर कचेरीस येऊन बसले. त्रिवर्ग बंधूस वस्त्रे दिली

१९ नंतर श्रीमंत नानासाहेब बोलले कीं, अरे भाऊ, कृष्णंभटजींनीं आह्मांस आशीर्वाद केला, यास काय द्यावें ? यांचे कुटुंब मोठें. पांच पुत्र, सुना, नातू. याप्रमाणें बोललेवर नारायणराव नाना बोलले कीं, स्वामींनीं आह्मांस कमी काय केले आहे ! मग श्रीमंत बोलले कीं, तुह्मी चाकऱ्या करून तैनाता खातां, परंतु कृष्णंभटजीनीं आशीर्वाद केला यांस काय द्यावे ? असे ह्मणून कलमदान आणविले आणि स्वदस्तूरची भोजनखर्चाबद्दल दरमहा दीडशें रुपयेप्रमाणें अठराशे अर्काटी[1] रुपयांची यादी करून कृष्णंभटजी याचे हवाली करून नमस्कार करून स्वारी चालती झाली. याप्रमाणे श्रीमंत दयाळू कृपावंत. पुढे श्रीमंत दादासाहेब यांचें दुसरें लग्न गलगल्याचे मुक्कामी जाहलें. याप्रमाणे ही गोष्ट वडिलांनीं सांगितलेवरून लिहिली असे.[2]

२०. श्रीमंत वारंवार कृपा करीतच गेले. कोणे एके दिवशीं श्रीमंतांनी विचारिलें अरे पुरुषोत्तमराव, नारायणराव, तुम्हांला कांही द्यावेंसे वाटते यांनी विनति केली की महाराज, आह्मास काय कमी आहे ? पालखी, तैनाता सर्व बंदोबस्त स्वामीनीं करून दिला आहे. असें बोलताच श्रीमंत बोलले की, तुम्हास मंगळवेढेनजीक एक स्थळ तुमची मुलें माणसें रहाण्यास द्यावें असें मनांत आहे. नंतर यांनी विनति केली की, आह्मी आपले सोईचे जाग्याची योजना करून स्वामीस विदित करू, असें ह्मणाले, आणि मौजे आंबें

१ मद्रास इलाख्यातील अर्काट या राजधानीतल्या टकसाळेत पाडलेले मंगळवेढे परगण्याची जमाबंदी अर्काटी नाण्यांत होती. २ इंग्रजी कारकीर्द सुरू झाल्यावर गरीबी आली, पुन्हा नावारूपास येण्याची आशा राहिली नाही, अशा स्थितींत पूर्वी कोणा एका काळी पेशव्याची स्वारी आपल्या घरी आली होती तेव्हा काय काय घडले हे वडील माणसें घरात बोलत ते आठवून आठवून बखर लिहिणाराने प्रेमपूर्वक तपशीलवार लिहून ठेविले आहे प्रत्येक गोष्ट त्यास महत्त्वाची वाटावी हे ठीकच आहे. वाचकास जर ती भाकडकथा वाटेल तर त्याची मोठीच चूक होईल. या गोष्टी क्षुल्लक असल्या तरी त्या क्षुल्लक आहेत हाच त्यांच्या सत्यतेचा उत्कृष्ट पुरावा होय अशा सप्रमाण क्षुल्लक गोष्टींनीच प्रसिद्ध व्यक्तींच्या स्वभावाची खरी ओळख पटत असते बॉसवेलचा समग्र ग्रंथ अशा क्षुल्लक तपशिलानेच भरलेला आहे । उदाहरणार्थ वर बखरीत वर्णिलेला मेजवानीचा प्रसंग घेऊ यांतून होळकराचा मनमिळाऊपणा, वडिलांच्या अधिकाराची मर्यादा रक्षण करण्याविषयीं भाऊसाहेबाची तत्परता, तसेंच राजकार्यात मन सर्वथा व्यग्र झाल्यामुळे कोठें कोणती गोष्ट काढावी याविषयीं अनवधान, प्रसंगोचित वागण्याविषयीं पेशव्याचा सावधपणा, प्रत्यक्ष बंधूनें केलेली चवकशी रद्द करून नारायणरावासारख्या कमी दर्जाच्या मनुष्यास पुनः ती करण्यास हुकूम देण्यात दिसून येणारी निष्पक्षपात बुद्धि, पदरच्या लोकांविषयीं त्याचें औदार्य, कृष्णभटजीसारख्या धार्मिक व कर्मठ ब्राह्मणानें पर्वा न धरिता आचाराविषयीं श्रीमंत भाऊसाहेबास दोष दाखवून देणें, व तो कबूल करण्यांत श्रीमंताचा विनय, या गोष्टी वरील आख्यायिकेवरून ध्यानात येतात !

हा गांव पंढरपूरनजीक, भीमातीर, मंगळवेढेंही सन्निध, असा पाहून जाऊन विनंति केली, त्याजवरून त्या वेळेसच चिठ्ठी स्वदस्तूरची गोविंद हरि यांचे नांवची दिली जे, "मौजे आंबे परगणे मंगळवेढे हा गांव दरोबस्त नारायणराव कृष्ण व पुरुषोत्तमराव कृष्ण या उभयतांस इनाम दिला असे. तरी साल दरसाल उभयताचे नांवें पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनामखर्च लिहीत जाणे." याप्रमाणे श्रीमंतांची चिठ्ठी होऊन त्यापासून आजपर्यंत गाव चालत आहे. त्या गांवास किल्ला चौबुर्जी बाधला. मळे तळे भीमातीरास कोठे नाहींत, परंतु तेथें केले याप्रमाणें पुण्यप्रतापी पुरुष! श्रीमंतांची कृपा या प्रकारची! श्रीमंतांच्या कीर्ति बहुत. त्या वर्णन करावयास कोण शक्त आहे?

२१. पुढे पानिपत जाहलेवर श्रीमत नानासाहेब यांची स्वारी नर्मदेपर्यंत गेली[1]. तिकडून पळ आला. श्रीमंत भाऊसाहेब गर्दीत मिसळले फौज, दौलत, गारद जाहली हे वर्तमान श्रीमत नानासाहेब याणी ऐकलेवर किंचित् भ्रम जाहला ते समयी पटवर्धन समागमेच होते पटवर्धनाची फौज काही पानिपतचे स्वारीस गेली नाही हे हुजूर पुण्यास होते. श्रीमंत भाऊसाहेब याचा किंचित् रोष होता; सबब त्यानीं समागमे नेले नाहीत श्रीमंत सौभाग्यवती गोपिकाबाईसाहेब यांचे लक्षाने वागत होते. त्यां[2] उभयतांचे ठीक नव्हतें असें ऐकीव. यांत गोपाळराव दादा याणीं पानिपतचे स्वारीची तयारी जाहली ह्मणोन ऐकिले. त्यांत पटवर्धन समागमे नेण्याची योजना झाली नाहीं असें ऐकिले, त्यावरून गोपाळरावदादा याणी श्रीमंत भाऊसाहेब यांस विनंतिपत्र लिहिलें कीं, सरकारस्वारीची जाण्याची तयारी जाहली त्यात आमची फौज नेण्याची मर्जी नसल्यास वडील गोविंदपंत नाना येथें चाकरीस आहेत. मी एकट्या घोड्यानिशी सडा स्वामीचे बरोबर येतो. त्याचें उत्तर श्रीमंत भाऊसाहेब याणी पाठविले की सरकारातून श्रीमत विश्वासरावसाहेब यास स्वारीस जाण्याची आज्ञा जाहली आहे. समागमे मलाही जाण्यास सांगितलें. त्यास आपली जाण्याची मर्जी असल्यास मी राहीन! याप्रमाणे उत्तर पाठविलेवरून पटवर्धन कोणी मंडळी गेली नाहीत. ते श्रीमंत नानासाहेब यांसमागमे नर्मदेपर्यंत गेले

---

१ खरे ह्मटले तर नर्मदेपलीकडे माळव्यात सिरोंज भेलशापर्यंत पेशवे गेले होते. त्यांनी समागमें पन्नास हजार फौज जमविली होती. आता आपण होऊन अबदालीवर चालून जावयाचे नाही, पण तो दक्षिणेकडे येऊ लागेल तर त्याशी निकराने लढावयाचें, असा त्याचा निश्चय होता. अबदाली दिल्लीच्या आसपास पावसाळ्याकरिता राहील तर मराठी राज्याची उत्तर सरहद्द जी चमेली नदी तिच्या तीरावर आपणही छावणी करून रहावें अशी त्याची योजना होती. पण पानपतच्या लढायात गिलचे लोक फार मेले, राहिले त्यात फटकी उठली, रोहिले, पठाण व सुजाउद्दौला हे आपसात भांडू लागले, जाट, रजपूत व मराठे एक होण्याचा रंग दिसूं लागला पेशव्याचें लष्कर माळव्यात आले, यामुळे दक्षिणेवर स्वारी करण्याचा नाद सोडून अबदाली काबुलास परत गेला. तेव्हा पेशवेही परत फिरले. नादिरशहानें दिल्ली लुटली तेव्हा त्याने दक्षिणेकडे न यावे ह्मणून ज्याप्रमाणें बाजीराव फौज जमा करीत त्वरेनें माळव्यात गेले, त्याचप्रमाणे पानपत झाल्यावर नानासाहेबासही तिकडे राज्यरक्षणार्थ जावे लागले. २ भाऊसाहेब व पेशव्याची स्त्री गोपिकाबाई यात.

२२. श्रीमंतास किंचित् श्रम जाहलाच होता त्याजमुळे मर्जी फार कठिण. परंतु पुरुषोत्तमराव यावर पूर्ण कृपा याविशी काही कथा लिहितो. नर्मदेपर्यंत स्वारी गेली तेथून माघारे फिरले. श्रीमंत रागानें लोकांस थोरमोरास कमचीनें मारूं लागले, यामुळे मंडळी फारशी जवळ जाईनाशी जाहली परंतु पुरुषोत्तमराव यास वरचेवर जवळ बोलावीत. कोणी एके दिवशी नर्मदातीरास संध्या करीत होते मंडळी सारी शेलपागोटी, ढालतलवार याप्रमाणें तयारीनें होती श्रीमंत मात्र प्रातःसंध्या करीत होते तो उपस्थान करीत असतां अकस्मात् झोक गेला. तो नारायणराव नाना हे तसेच उठोन श्रीमंतांस धरिलें. श्रीमंतानी मागे पाहिले आणि बोलले जे, दुसरा कोणी असता तर कमच्यांनीं मारिले असते ! असे म्हणताच पुरुषोत्तमराव बोलले की महाराज, नारायणराव याचा अपराध कमच्यांनी मारावयाचा जाहला ! आपण पडता आणि सर्व लोक हसते आणि म्हणते की जवळ होते ते आंधळे होते की काय ? असे म्हणताच श्रीमंत म्हणाले, मला विटाळ जाहला. हे बोलले की पुन्हा स्नान करावे ! असे म्हणतांच श्रीमंत हसूं लागले आणि बोलले, अरे पुरुषोत्तमराव, तूं बोललास म्हणजे माझा राग कोणीकडे जातो नकळे ! याप्रमाणे श्रीमंतांची कृपा पूर्ण होती.

२३. पुढें पुण्यास आलेवर वरचेवर बोलावणे पाठवीत. ते समयीं गोविंदपंत नाना म्हणाले की तूं घरास जा तूं वरचेवर श्रीमंतांकडे जातोस एखादे वेळेस कमच्यांनीं मारितील, मग आम्हास तोंड दाखवावयास जागा नाहींशी होईल ! हे बोलले की मला निरोप देववून घरास पाठवावे. श्रीमंत निरोपच देणार नाहींत, त्यापेक्षा आपले पुण्यानें काय पार पडेल ते खरे !

२४ कोणी एके दिवशी दहा बारा घटका रात्रीं श्रीमंतांचे बोलावणे आले. तो गोविंदपंत नाना म्हणाले की लौकर जाऊन ये मग नानाची आज्ञा घेऊन दाजी श्रीमंतांकडेस गेले श्रीमंत दिवाणखान्यात होते श्रीमंत बाईसाहेबही तेथे होत्या तो हे गेले आणि हुजऱ्यास विचारिले, श्रीमंत कोठे आहेत ? तो याचा शब्द ऐकून श्रीमंतांनीं विचारिले की, पुरुषोत्तमराव की काय ? हे बोलले की, मी आहे श्रीमंतांनी आज्ञा केली कीं, आत येणें. तो हे पडदे उघडून आत जातात तो उभयता पलंगावर बसली होती ते पाहिले. मग विनंति केली कीं, महाराज, आतां रात्र फार जाहली. मी उदईक येईन. श्रीमंत म्हणाले आत ये. असे म्हणताच आत गेले हे आत जाताच श्रीमंत बाईसाहेब पलंगावरून उठून एकीकडे उभ्या राहिल्या श्रीमंतांनी यांस जवळ बोलाविले. हे जवळ जातांच हात धरला. हे मनांत म्हणाले की, आता तोंडात मारितात ! असे मनात आणिले तो श्रीमंतांनीं ओढून आपले पलंगावर बसविले. हे बोलले की, महाराज, बाईसाहेब उभ्या आहेत. मी खालीं उभा राहतो. असे म्हणतांच श्रीमंत म्हणाले, तिला बसावयास सांगावे. नंतर

बाईसाहेब खालीं बसल्या मग पूर्वीच्या गोष्टी काढिल्या तो मध्यानरात्र जाहली वरचे-वर दाजी म्हणत, आतां रात्र जाहली, उद्ईक उजाडावयाचे नाही की काय ? श्रीमंत म्हणत, तुझ्या गोष्टी एकिल्या म्हणजे मला किंचित स्वस्थ वाटते याप्रमाणे बोलत असता रात्र दोनप्रहर अखेर जाहली मग श्रीमंत म्हणाले, तुला काही यावेस वाटते, परंतु आतां जामदार पोतनीस सारे घरास गेले असतील मग दाजी म्हणाले की, महाराज, आम्हांस काय कमी आहे ! असे म्हणाले. तो श्रीमंतानी आपले अंगाकडे अवलोकन करून पांढरी शालजोडी पांघरले होते ती शालजोडी काढून पुरुषोत्तमराव यांचे अंगा-वर घातली याणी पायावर डोई ठेऊन निघाले तो श्रीमंतानी बाईसाहेब यास सांगितले जे, पुरुषोत्तमराव यास विडे द्यावे तेव्हां यानी आपले हातानेच विडे घेऊन बाईसाहेब याचे पायावर मस्तक ठेऊन निघाले ते आपले वाड्यात आले तो गोविंदपंतनाना हे सद-रेवर वाट पहातच बसले होते. तो याची मशाल दृष्टीस पडली तो याणी येऊन नानाचे पायांवर मस्तक ठेऊन शालजोडी पुढे ठेविली मग नानास संतोष जाहला, आणि बोलले की तुझे दैव चांगले ! याप्रमाणे श्रीमंतांची पूर्ण कृपा संपादिली पुढे श्रीमंत दादासाहेब यांचे कारकीर्दीतही याजवर मर्जी होती

२५ श्रीमंत नानासाहेब यांचे पुत्र माधवरावसाहेब व नारायणरावसाहेब उभयता बंधु श्रीमंत दादासाहेब यांचे अज्ञानवासात होते सर्व दौलतीचा कारभार श्रीमंत दादासा-हेब करीत. राज्याधिकारी श्रीमंत माधवरावसाहेब, सबब त्यांचे लक्षाने पटवर्धन वागत. याजमुळे श्रीमंत दादासाहेब यांचा राग जाहला आणि यानी पुण्यात राहू नये असें सांगितले नंतर एकांतीं गोपाळरावदादा व नारायणरावनाना व पुरुषोत्तमराव दाजी याणी श्रीमंत माधवरावसाहेब यांची गाठ घेतली आणि विचारिले की, पुढे आमची वाट काय ? ते समयी श्रीमंतानी आज्ञा केली की तूर्त तुह्मास जिकडे वाट फुटेल तिकडे जाऊन जीव रक्षण करणे जे दिवशी माझा हात चालेल ते दिवशी तुम्ही जेथे असाल तेथून आणवून तुमचे चालवीन यानीं विनंति केली की, याप्रमाणे आम्हास वचन द्यावे नंतर श्रीमंतानी वचन दिले मग पुण्याहून निघाले ते टाकोटाक मिरजेस आले

१. जवाहीर जामदाराच्या ताब्यात, रोकड पोतनिसाच्या ताब्यात. २. अंगावरचे महावस्त्र, अलंकार, दागिने उतरून देणे ही प्रेमयुक्त आदराची मामा शिवाय हिंदूस पारशी व मुसलमानास हिरवी शालजोडी देणे ह्मणजे त्याचा फार मोठा बहुमान करणे होय ३ विडे देणे ही निरोपाची खूण ४. मशालीचा बहुमान सरकारी आहे मशाल कोणी घरी बाळगावयाची नाही. ती सरकारातून मिळावयाची अथात मशालीचे पोत, तेल, मशालजीचा पगार हा सारा खर्च सरकारी असे मोठमोठे दरकदार, सरदार, सरकारकून याच्या दिमतीस मशाली असत त्या फक्त सरकारी कामाकरिताच असत. पण सामान्य रयतेपैकींसुद्धा ज्याची विद्या, पराक्रम, कौशल्य, हुन्नर, सरकारी कामाचा उपयोग ही फार असतील त्यास मशालीचा बहुमान मिळत असे. ५ सन १७६१ च्या एप्रिलमध्ये ही गोष्ट घडली आहे त्या वर्षी जूनच्या तेविसाव्या तारखेस नानासाहेब पेशवे वारले.

२६. तो श्रीमंतांनीं यांस धरावयास मागून फौजा रवाना केल्या[1]. मिरजेस आलेवर गोपाळराव दादा यांनी सांगितलें की, मिरज लढविल्याखेरीज सरकारात देऊं नये. मला मोगलाईत जावयाचे आहे, त्यास दाजीस म्हणाले की, तूं येथे राहिल्याखेरीज मिरज लढविणार कोणी नाहीत. मी अथवा नारायणराव अथवा तू. त्यांतून नारायणराव माझ्या समागमें पाहिजे. त्यास तूं येथे रहा. वडील व भास्करपंत आप्पा येथे आहेतच. हजार गोष्टीतून एक गोष्ट सागतो, मिरज लढविलेखेरीज मात्र देऊं नये. असा बंदोबस्त करून नाना[2] आदि सर्व वडिलांस पुसोन नमस्कार करून मिरजेतून नारायणराव नानास घेऊन निघाले तो पुण्याकडील फौजा आल्या. त्याची यांची गांठ जमखंडीवर पडली. तेथें एक लढाई मातबर जाहली. दैवयोगेंकरून गोपाळराव यांचा मोड जाहला. ते तेथून निघाले तो फौजा पाठीशीं लागल्या. परंतु गोपाळराव दादा यांचेसमोर उभे राहण्यास त्यांत कोणासही अवसान नव्हते ! तसेच फिरत फिरत तीन चार दिवशी मंगळवेढे परगण्यात नंदेश्वर गाव आहे, तेथे आले गांवकरी यांनी गोळ्या मारिल्या ! तेथून निघून मंगळवेढ्यास आले. पाच दिवस घोड्यावरून उतरले नाहीत, पाय सुजले. त्याने रिकिबीतून पाय निघेनात ! तव्हां रिकिब्या तोडून पाय काढिले. दोन चार दिवस गुप्तरूपें मगळवेढ्यास राहून तेथून निघाले ते मोगलाईत गेले. हैदराबादेस जाऊन मोगल याचे कारभारी विठ्ठल सुदर याची भेट घेऊन नबाब निजामउलमुल्ख[4] यांची भेट घेतली आणि तेथे राहिले.

२७. इकडील वर्तमान, सर्व पटवर्धन मडळी मिरजेच्या किल्ल्यात राहिले बायका वगैरे कांहीं कोंकणांत गुप्तरूपे राहिल्या. पुरुषोत्तमराव यांची स्त्री दुसरी. त्यास प्रथम पुत्र हरिहरराव जाहले होत. त्यांचा जन्म शके १६८४ चित्रभानु संवत्सर. त्याचे वय एक[5] वर्षाचे ती बाई कोकणांत आपले आजोळीं कोतवड्यास, मुलास घेऊन गुप्तरूपे राहिली. बाकी सारी मंडळी मिरजेच्या किल्ल्यांत राहिली. पुरुषोत्तमराव दाजी याची प्रथम स्त्री गोपिकाबाई. त्यास एक कन्या मात्र जाहली. तिचे नांव जिऊआक्का. ती काकाजी रास्ते वाईकर यास दिली. गोपिकाबाई बाळंतरोग लागून वारली. नंतर दुसरे लग्न पुरुषोत्तमराव यांचे केले. चिंचणेरकर कानिटकर यांची कन्या केली त्यास पुढे संतति जाहली ती कथा पुढे येईल.[6]

२८. हल्लीं मिरज लढविली हा कथाविस्तार लिहितों. श्रीमंत दादासाहेब यास गोपाळराव

---

१. वस्तुतः खुद्द दादासाहेबच फौजानिशीं पटवर्धनाचें पारिपत्य करण्याकरिता व त्यापासून मिरजेचा किल्ला घेण्याकरिता स. १७६२ च्या डिसेंबरात आले. २ गोविंद हरि ३. गोपाळरावास धरण्याकरिता दादासाहेबानी आबा पुरंदरे यास बरोबर फौज देऊन पाठविले होते. त्याची व गोपाळरावाची ही लढाई. ( पहा, ऐतिहासिक–लेखसंग्रह नं. १४१ ) ४. हे नाव चुकले. येथें निजामअल्ली हे नाव पाहिजे. ५ वस्तुतः चार सहा महिन्याचे असेल. कारण याच संवत्सराच्या पौषात मिरजेस वेढा पडला. ६ हीच बाई कोकणात जाऊन राहिल्याबद्दल वर उल्लेख आला आहे.

मोगलाईत गेले ह्मणोन समजलेवर बहुत रोष आला. मग खासा श्रीमंत फौजसुद्धा निघाले. कारभारी सखारामपंतबापू याचा व गोपाळरावदादा यांचा अत्यंत द्वेष. याजमुळे पटवर्धन यांचे पाय भुईस न लागावे येविशीं कारभारी यांचा प्रयत्न मोठा! श्रीमंत दादासाहेब ह्मणों लागले जे, पटवर्धन यांजकडील कुत्रे देखील सांपडले असतां जिवें मारावें! असें म्हणून मिरजेवर स्वारी केली. ते मिरजेस आले. तो इकडे दारूगोळीची तयारी जाहली. पुरुषोत्तमराव दाजी यांनी साऱ्या बायकांस देखील गोळ्या घडावयास लाविलें. ही कथा साळूआक्का[1] यानी वडिलांजवळ सांगितली ती लिहितो स्वारी श्रीमंतांची येतांच किल्ल्यांतून तोफखाना सुरू जाहला श्रीमंतानी मोर्चे बसविले तीन हल्ला मातबर जाहल्या. एक हल्ला केली तेव्हां, दारूचे बुधले पुरून बुरूज उडविला तो पुन्हां तसाच त्या ठिकाणीं बसला त्यातील एक ढेकूळ देखील एकीकडे गेलें नाही! श्रीमतांचे मोर्चे खदकास येऊन लागले. याप्रमाणे एक महिना किल्ला लढविला. भास्करपंत आपा व पुरुषोत्तमराव दाजी या उभयतास महिनाभर अहोरात्र निद्रा नाही. ढाल तलवार बाधून महिनाभर फिरत होते. दुसरी हल्ला केली ती लोक दरवाजास येऊन लागले. लाकडे घालून दरवाजा जाळितात असे पाहून पुरुषोत्तमराव दाजीनी किल्ल्याचे पानावर पडून शंख केला जे, अरे किल्ला गेला! किल्ला गेला! असे म्हणाले. तों किल्ल्यातील जमातदार—त्याचे पांचशें लोक—त्या जमातदाराने दाजीचे कंबरेस धरून एक शिवी देऊन माघारे ओढिले आणि बोलिला जे, 'अरे बामणा, आरडतोस कां? आम्ही इतके मरूं तेव्हा किल्ला जाईल. आतां आमचा तमाशा पहा!' असे म्हणून पांचशे असामी यांनी कबरा बांधून ढाल तलवारी घेऊन हल्ल्याचे लोक यांचे डोकीवर किल्ल्यावरून उड्या टाकिल्या; आणि पांच हजार गाडदी चालोन आले त्यात मारामारी करून हल्ला माघारी फिरविली!!! ही लढाई श्रीमंतांनीं दृष्टीने पाहून ह्मणाले जे, वाहवा गोपाळराव! काय माणूस पदरी बाळगिलें आहे! किल्ल्यावरून उड्या टाकून हल्ला माघारी फिरविली ही गोष्ट परम कठिण; तेव्हां श्रीमंतांस पुरतें समजले की, किल्ला कांही लढोन येत नाही. श्रीमंत माधवरावसाहेब यांचें सूत्र आंतून होतेंच. श्रीमंत रावसाहेब पेठेत येऊन बसत हें किल्ल्यांत यांस समजले. यांनीं सांगून पाठविलें की, आपण येता, वरून तोफा सुटतात, एखादा घात होईल. श्रीमंतांनीं सांगितलें जे, मी जेथें बसेन तेथें अबदागिरी वर धरवीत जाईन. त्या सुमारास गोळे मारूं नयेत. याप्रमाणें सूचना केली त्याप्रमाणे करीत.

---

१ साळूआक्का ही गोपाळरावाची बहीण. ही ह्या प्रसंगी वेढ्यात सापडली होती. तिने सांगितलेली हकीकत. २ ऐति० ले० स० न० १६३ सदर पुस्तकातील मिरजेच्या वेढ्यासबंधाच्या पत्राशी वर आलेला मजकूर ताडून पहातां काही तफावत दिसून येईल. प्रत्यक्ष अनुभवलेल्या व परपरेने ऐकिलेल्या हकीकतीत फरक दिसून आला तर नवल नाही

२९. पुढें आंत फितूर होऊं लागला. नंतर सल्लाचें बोलणें लागलें. तेव्हां बोलण्यास कोणी पाठवून द्यावें ह्मणून गोविंदपंतनानांस श्रीमंत दादासाहेबांनीं सांगून पाठवीलें. तेव्हां बोलण्यास कोणी जाईनात. तेव्हां नानांनीं सांगितले कीं, अरे दाजीं, तूं जा. हे कोणी जावयाचे नाहींत. असें सांगितलें. नंतर पुरुषोत्तमराव दाजी बोलावयास बाहेर पडले ते ढाल, तलवार, चोळणा, कांच्या असे बाहेर पडले ते श्रीमंतांचे लष्करांत आले. तों लष्करचे लोक मुसलमान ह्मणाले कीं, 'लढणेवाला जो बामण तो हा,' असें ह्मणों लागले. हे श्रीमंतांचे डेऱ्यासन्निध गेले तों श्रीमंत दादासाहेब स्नान करून पूजा करीत बसले होते. तों नीट श्रीमंतांजवळ गेले. जाऊन श्रीमंतांस नमस्कार केला. श्रीमतांनीं 'या, पुरुषोत्तमराव,' ह्मणून बोलाविलें. याणीं तलवार जी होती ती श्रीमंतांपुढें ठेविली. तों श्रीमंतांनी दाजीच्या शालजोडीच्या[1] पदरास धरून बोलले जे, पुरुषोत्तमराव, मी येथे आलों. मला यश द्यावें. असें म्हणतांच यांनी विनंति केली कीं, आह्मी स्वामीचे चाकर. किल्ला स्वामींचा. आम्हीं सेवा करून दाखविली. लोक म्हणतील जे, ब्राम्हणाकडे किल्ला, आणि श्रीमंतांची स्वारी येतांच लढविलेखेरीज दिला ! याजमुळें स्वामींची चाकरी केली. आतां स्वामीचे पायांपाशीं ढाल तलवार ठेविलीच आहे, आह्मांस निरोप द्यावा. तों श्रीमंत ह्मणाले कीं, तुम्हांस दाली जी बांधली ती घ्यावयास कांहीं बांधिली नाहीं. तुह्मी ढाल तलवार घेणें, अशी आज्ञा जाहली. तों इतक्यांत सखारामबापू याणीं शागीर्दाकडून ढाल तलवार उचलविली. तों पुरुषोत्तमराव बोलले जे, मी स्वामींस विनंति करितों. स्वामींनी आज्ञा केली कीं ढाल तलवार घ्यावी. परंतु इतक्यांत कोणी लुच्च्यानें ढाल तलवार उचलविली ! नंतर श्रीमंत रागें भरले जे, पुरुषोत्तमराव याची ढाल तलवार आणोन देणें. तों दुसरी ढाल तलवार आणून ठेविली. याणीं विनंति केली कीं, ही माझी ढाल तलवार नव्हे. कोणी ती ×××××नें बदलली ! स्वामींनीं माझी मला दिल्यास मी घेईन. नाहींपेक्षां श्रीमंतांचे पंगतीस भोजन करून राहीन. याप्रमाणें बोलतांच श्रीमंत फारच रागें भरले. नंतर यांची ढाल तलवार यांस आणून दिली. मग पुरुषोत्तमराव याणीं विनंति केली कीं आम्हांस तीन रोजांची मुदत द्यावी, म्हणजे लोकांनीं किल्ल्यांत कांहीं[2] ठेविलें आहे तें अवघें उतरून किल्ला स्वामींचे स्वाधीन करूं. आम्ही शिलेदार. आम्हाजवळ कांहीं नाहीं. परंतु लोकांनीं ठेविलें आहे, त्यास पार करून द्यावें आणि बाहेदारीस[3] कोणी मातबर गृहस्थ द्यावा याप्रमाणें ठरविलें. नंतर नरसिंगरावबाबा धायगुडे[4] यांस बाहेदारीस देऊन तीन रोजांची मुदत दिली. आणि जरा[5] बाजरा श्रीकृष्णा-

१ यावरून पुरुषोत्तमराव शालजोडी पांघरले होते असें दिसतें. चोळणा, कांच्या आणि शालजोडी हा वेष आतांच्या काळात चमत्कारिक दिसतो ! २ काही द्रव्य. ३ जामिनकीस. ४ मध्यस्थीस विचूरकर व नारो शंकर होते असे ऐ. ले. संग्रहात आहे. येथे धायगुड्याची मध्यस्थी लिहिली आहे ती कुरुंदवाडास खटलें व वित्तविषय पोचविण्यापुरती असावी. ५ सर्व. एकूण एक.

पार कुरुंदवाडास न्यावें असें ठरविलें. नंतर नरसिंगरावबाबा धायगुडे यांस पुरुषोत्तमराव दाजी यांनीं बजाविलें की, माझा एक सुतळीचा तोडा तजावजा जाहल्यास पुरुषोत्तमराव यांसीं गांठ आहे, याचा पुरता विचार करून आपण बाहेदारीस असावें ! त्याणीं सांगितलें कीं, पुरुषोत्तमराव, मी मध्यस्थ आहें त्यापेक्षां कोणे गोष्टीची फिकीर न करणे. याप्रमाणें बोलणें अंताजीपंत बापू लिमये यांचे विद्यमानें जाहलें. नंतर जरा बाजरा उतरून पटवर्धन यांचीं मुलेंमाणसें बाहेर येऊन राहिलीं. किल्ला सरकारचे हवालीं केला.

३०. नंतर ते दिवशीं रात्रीं धायगुडे यांचे मुलास श्रीमंतांनीं फितविलें आणि फौज तयार करून पटवर्धन ह्यांचीं मुलेमाणसें लुटावीं असा बेत केला. ती बातमी पुरुषोत्तमराव दाजी यांस समजली. तों प्रहर रात्र जाहलेवर धायगुडे यांचे फौजेंत तयारी झाली व सरकारचे पागेंतही तयारी जाहली. हें पाहून रात्रीं बापू लिमये यांचे राहुटीस पुरुषोत्तमराव दाजी एकटे गेले. त्यास जागे करून सांगितलें की, घर बुडालें. आम्हांस लुटतात. असें ह्मणतां लिमये म्हणाले, अशी गोष्ट व्हावयाची नाही, आपण नरसिंगरावबाबांकडे यावें. असें ह्मणून उभयतां नरसिंगरावबाबा यांचे लष्करांत आले. ते आपले डेऱ्यांत निजले होते, तों हे तसेंच आंत गेले. ते पलंगावर निजले होते. त्यांचें पांघरूण ओढून जागें केलें, आणि बोलले की, तुह्मीं आमचें घर बुडविलें ! तेव्हां ते बोलले कीं असें आपण कां ह्मणतां ? माझी खातरजमा आहे त्यापेक्षां आपण कांहीं फिकीर करूं नये. असें म्हणतांच पुरुषोत्तमराव यांस राग आला आणि बोलले की, गाढवाच्या धसा ! तुझे फौजेंत तयारी जाहली ही तुला कशी समजली नाहीं ? बरें ! पटवर्धनांशीं गांठ आहे ! आमचा एक पुरुष जिवंत राहिला तत्रापि तुझी मुळी खांदून टाकील ! असें म्हणतांच त्यांनीं आपल्या लष्करांत शोध केला तों वर्तमान खरें. मूल फितला. मुलाचा शोध केला तों श्रीमंतांचे डेऱ्यास गेला असें कळलें ! नंतर नरसिंगरावबाबा यांनीं सांगितलें कीं, पुरुषोत्तमराव, आपण येथें बसावें. मी श्रीमंतांकडे जातो. असें म्हणून पालखींत बसोन श्रीमंतांकडे गेले. तों श्रीमंतांपाशीं आपला मूल पाहिला. त्यास एक दोन शिव्या देऊन श्रीमंतांस साफ सांगितलें कीं, आपण ही गोष्ट योजिली आहे, परंतु मजकडून घडावयाची नाहीं. पटवर्धन माझीं रांडापोरें ढाणकास[1] वांटतील. असें म्हणून आपले लेंकास घेऊन आपले लष्करांत आले. आणि पुरुषोत्तमराव यांचे गळ्यावर हात ठेऊन सांगितलें कीं, आपण स्वस्थ असावें. यांनीं उत्तर केलें कीं, उद्ईक तुम्हीं फौजसुद्धां लढाईस तयार होऊन उभें रहावें. नंतर माझीं मुलेंमाणसें चालतीं होतील. याप्रमाणें बोलणें जाहलें. दुसरे दिवशीं धायगुडे आपले पतकानिशीं तयार होऊन यांचीं ( पटवर्धनांचीं ) मुलेंमाणसें कृष्णेपलीकडे कुरुंदवाडास पोंहचतीं केलीं.

३१. याप्रमाणें मिरज लढविली. पुढें एक वर्षाचे आंतच श्रीमंत दादासाहेब यांची

---

१ मारून वेशीच्या दारास बांधितील.

मर्जी संपादून दाजींनीं मिरज सोडविली. येविशीं पत्र गोपाळरावदादा यांस लिहिलें आहे जे, ' वडिलीं आज्ञा केली होती त्याप्रमाणें मिरज लढविली. हल्लीं श्रीमंतांची कृपा संपादून मिरजेचा किल्ला मुलें माणसें राहण्यास सोडवून घेतला. तुमची चाकरी केली ही लक्षांत असावी, ' असें लिहिलें आहे. जे समयीं मिरजेच्या सनदा जाहल्या ते समयीं श्रीमंत दादासाहेब ह्मणाले कीं, पुरुषोत्तमराव, तुझे नांवच्या सनदा लिहीन, असें ह्मणून सनदा पुरुषोत्तमराव याच्या नांवाच्या लिहिल्या. असे असतां गोविंदपंतनाना वडील, त्यापेक्षां आपले नांवच्या सनदा कशा घेऊन जावें, अशी वडीलपणाची मर्यादा रक्षण करून गोविंद हरि यांचे नांवची सनद घेऊन आले. तें साल सन अर्बा सीतैन. याप्रमाणेंच मंगळवेढेचे किल्ल्याची सनद. मुलेमाणसें रहाण्यास श्रीमंतांचे अस्सल पत्र आहे तेही गोविंद हरि यांचे नांवचें. याप्रमाणें निरपेक्षतः वागून भावाबंदांवर उपकार केले तें सर्व पूर्वींची मंडळी होती त्यांस जाहीर होतें व हल्ली पत्रे आहेत तीं पहावीं, त्यांवरून कळेल

३२. इकडे गोपाळरावदादा मोगलाईत गेले तेथे राहिले. तों मोगलांचें ह्मणणें, तुह्मीं आमच्या चाकरीस रहावे. तेव्हां यांनी सांगितले कीं, आह्मी आपले यजमानावर रुसून आलों. आमची समजूत करून नेतील तोंपर्यंत तुह्मांजवळ आहों. तूर्त आम्हांस कर्ज ह्मणून लक्ष रुपये द्यावेत असें ह्मणून लाख रुपयेचे खत लिहून देऊन खर्चास लाख रुपये घेतले. नंतर मोगलांस घेऊन देशीं आले. मोगलांची स्वारी पुण्यास आली. पुण्यांत मोगलाचे लष्कर शिरलें. पुण्यास आगी लाविल्या. त्याजमुळे नबाबाचें व गोपाळराव यांचें कांहीं बिघडलें. श्रीमंत रावसाहेब यांची वरचेवर सूचना होतीच. सर्व कृत्य त्यांचे आज्ञेवरूनच केले होते. मोगलाईत लाख रुपयेचें खत गुंतलें, परंतु आम्हांस कांहीं यांजपाशी रहावयाचें नाहीं; खत गुंतलें तें हरतऱ्हेनें हातास येई अशी युक्ति करावी असें म्हणोन पागेकडील एक कारकून होता त्याची चर्या वेड्याप्रमाणे होती त्यास नारायणरावनाना यांनीं सांगितले जे, मी खत हिशेबाकरितां कचेरींत मागून घेतों. तूं माझे हातचें हिसकावून घेऊन मला शिव्या दोन चार व मोगलांच्या दिवाणजीसही दोन चार देऊन खत फाडून टाकावें, आणि आपले शेलापागोटें फाडून शंख करीत कचेरींतून उठून जावें. पुढें प्रसंग पडेल तो सांभाळतां येईल ! याप्रमाणें सांगून त्याप्रमाणें केलें. याणीं कचेरीस जाऊन विठ्ठल सुंदर दिवाण याजपाशीं खत पहाण्यास मागून घेतलें. तों त्यानें त्याप्रमाणे खत हिसकावून घेऊन फाडून टाकले. आणि शिव्या देऊन आपलें अंगरखा पागोटे वगैरे फाडून शंख करीत बाहेर निघून गेला ! याप्रमाणें करतांच विठ्ठल सुंदर हंसों लागले. सर्व मंडळी

१ मोगलानी आपली रदबदली न जुमानता पुणे जाळिले, आपणास जहागीर देऊ केली होती ती दिली नाही, फौजेच्या खर्चास कांही पैकाही दिला नाही, हे पाहून पटवर्धनानी खत फाडण्याची ही अश्लाघ्य युक्ति योजिली ! ! ! पहा ऐ. ले. स. न. ३२२ वगैरे.

हंसली. तेव्हां नारायणरावनाना ह्मणों लागले, त्यानें आपलीं पांघरुणें फाडलीं तीं असो. परंतु खत फाडलें, आतां काय करावें ? तेव्हां विठ्ठल सुंदर म्हणाले कीं, खताचें असो, परंतु ज्यापेक्षां आपलीं पांघरुणें देखील यानें फाडली तेव्हां असा हा कोण आहे ? यांनीं सांगितलें कीं, वडिलोपार्जित कारकून आहे, त्यास आठ पंधरा दिवशीं असा विक्षेप होतो. त्यास बहुत जपत असतो. नजर चुकावून केव्हां आमचे पाठीमागे येऊन बसला नकळे ! असें परस्परें विनोदें बोलून निघून आले. आणि गोपाळरावदादा यांस सांगितलें. त्यांनी ठीक आहे म्हणाले. पुढे राजकारण दाजीनीं श्रीमंतांकडे रक्षिले; येविशीं गोपाळरावदादा यांचें पत्र स्वदस्तुरचें दाजीस आहे ते पहातां कळेल. नतर एके दिवशीं नबाबाचें कूच जाहलें तेव्हां गोपाळरावदादा याणीं श्राद्ध आहे असा लटका बहाणा करून मागें राहिले आणि मजल दरमजल करून माघारे श्रीमंतांकडे आले.

३३. तेव्हां श्रीमंत रावसाहेब यांचा अमल बसोन उलट श्रीमंत दादासाहेबच कैदेंत होते. येविशीं कथा सांगतों. ती कथा दिनकरपंत आठवले वांईकर याणीं सांगितली ती सांगतों. राक्षसभुवनचे[1] लढाईत मोगल यांची फौज, खासा मोगल, विठ्ठल सुंदर कारभारी व इकडून सरकारची फौज, श्रीमंत दादासाहेब व श्रीमंत माधवरावसाहेब व श्रीमंत नारायणरावसाहेब[2], याप्रमाणें जे समयी लढाईस प्रारंभ जाहला ते समयीं तोफखाना इकडील व तिकडील सुरू जाहला. याप्रमाणें लढाई चालली. तिकडून मोगलांचे कारभारी विठ्ठल सुंदर यांनी साडेतीनशें हौदे तिरंदाजीचे रिकामे केले ! याप्रमाणें तिरांचा मार ! खासा निजामअल्ली जनानखान्यासुद्धां लढाईपासोन एका कोशावर होते. अशी लढाई होत असतां विठ्ठल सुंदर यांनीं तिरंदाजीचे हौद्याचे हत्ती आपले तोफखान्यापुढें घातले. तें मोगल यांनीं दुर्बिणींतून पाहिलें आणि बोलले जे, लढाई बिघडली. आतां मोड होतो ! असे ह्मणोन ते जनानखाना संभाळून मागें सरूं लागले. तों विठ्ठल सुंदर याणीं यवनी भाषेनें ह्मणों लागले, काय पहातां ! पेशवे यांचा हत्ती असाच वळवा ! असें ह्मणून श्रीमंतांचे अंबारीवरच गर्दी केली. ते समयीं श्रीमंतांचे खवासखान्यांतील चवरीबारदार उभा होता तो गोळी लागून उडाला. हें पहातांच श्रीमंतांस धीर धरवेनासा जाहला आणि बावा महात[3] यास बोलले कीं, हत्ती बसव. त्यानें उत्तर केलें जे, महाराज, हत्ती बसवावयाची ही वेळ नव्हे. जर हत्ती बसविला तर आतां लढाई बिघडेल. याप्रमाणें बोलतांच पुढें सरोन त्याचे गळ्यास धरून बोलले जे, अरे मला मारतोस कीं काय ? मी घोड्यावर बसणार. याप्रमाणें बोलतांच फौजदार यांनीं हत्ती बसविला. तों गनीम यांनीं येऊन

---

१ ही लढाई तारीख १० ऑगस्ट रोजी झाली. २ श्रीमत नारायणरावसाहेब लढाईत होते ही माहिती चुकली आहे. त्याचें वय त्या वेळी सात आठ वर्षांचें असून ते आपल्या आईजवळ पुरंदरास होते. ३ महातास 'फौजदार' हा शब्द बहुमानार्थी लावितात.

हत्ती वेढिला. इकडील फौज हत्ती बसवितांच बेदिल जाहली. तों श्रीमंतांचा हत्ती मोगलांनीं तसाच वळविला.

३४. हें श्रीमंत माधवरावसाहेब यांनीं पाहिलें. ते कैदेंत होते. रखवालीस हुजरातचे मानकरी खासे पांचशें असामी होते ते सारे घोड्यावर बसोन तयार होते. तेव्हां श्रीमंत रावसाहेब बोलले कीं, अहो, दादासाहेब यांचा हत्ती वळला हें तुह्मी काय पहातां ? तेव्हां मानकरी बोलले कीं, आमची चाकरी पहाणार धनी कोण आहे ? श्रीमंतांनीं विचारिलें कीं, मी धनी नव्हें कीं काय ? तेव्हां मानकरी बोलले कीं, आपण ज्यास हटकून मारावयास सांगाल त्यास मारूं, परंतु जें मागूं तें बक्षीस स्वामींनीं द्यावें लागेल. ते समयीं श्रीमंतांनीं आज्ञा केली की, विठल सुंदर यांचे हत्तीवरील महात भाल्यानें जाऊन मारावा. तेव्हां महादजी शितोळे बोलले की, दहा हजारांचा गांव इनाम व बसता हत्ती घेईन. ते समयीं श्रीमंतांनीं कबूल केलें. नंतर महादजी शितोळे याणीं घोड्यास येडं केली आणि आंत शिरले. जाऊन विठल सुंदर यांचा महात भाल्यानें ठार मारिला आणि येऊन श्रीमंतांस मुजरा केला. नंतर अंकली, मांजरी हे गांव दहा हजारांचे इनाम दिले ते अद्यापि शितोळे यांजकडे चालले आहेत. याप्रमाणें मानकरी यांनीं कामकाज केलें. त्या लढाईत विठल सुंदर ठार झाले. त्यांचे चिरंजीवही ठार जाहले. मोगलांकडील निशाणें, तोफा, हत्ती वगैरे पाडाव आले. मोगलांकडील फौज सारी लुटून टाकिली. खासा मोगल मात्र जनानखाना बचावून दौलताबादेस गेले[६]. श्रीमंतांस यश आलें. श्रीमंत माधवरावसाहेब यांचें तेज फौजेवर पडलें. तेच दिवशीं साऱ्या फौजेत हुकूम श्रीमंत रावसाहेब यांचा बसला. सर्वांचें चित्त श्रीमंत रावसाहेब यांचे पायांशीं लागलें. याप्रमाणें जाहलें.

३५. श्रीमंत दादासाहेब यांचा हत्ती माघारा आणिला तेव्हां अंबारींत श्रीमंत रावसाहेब यांसीं बोलाविलें. तेव्हां घोड्यावरून श्रीमंत रावसाहेब उतरले तों तेच वेळेस गोपाळराव येऊन श्रीमंत रावसाहेब यांस भेटले. तेव्हां श्रीमंत दादासाहेब यांचे अंबारींत बसते वेळेस श्रीमंत रावसाहेब यांनीं गोपाळरावदादा यांचा हात धरून तसेंच अंबारींत चढले. श्रीमंत दादासाहेब यांजवळ श्रीमंत रावसाहेब बसले. गोपाळरावदादा मागें खवासखान्यांत बसले. तेव्हां श्रीमंत दादासाहेब यांचे मांडीखालीं तलवार होती ती गोपाळरावदादा याणीं हळूच काढून घेतली. तेव्हां श्रीमंत दादासाहेब यांनीं पाठीमागें पाहिलें,

---

१ दादासाहेबाचा हत्ती खाली बसल्यामुळे ते सर्व सैन्यास दिसेनासे झाले, तेव्हा ते मारले गेले असें समजून सैन्य निरुत्साह झाले २ ज्यावर आपण नेहमी बसता तो. ३ प्रेरणा. ४ शत्रूच्या व्यूहात. ५ दोन्ही गांव मिरजेनजीक आहेत. ६ वस्तुतः दौलताबादेस न जाता औरंगाबादेस गेले. त्या वेळीं दौलताबाद पेशव्यांकडे होती. दोन्ही स्थलांत अतर अगदी थोडें आहे. पहा ऐ. ले. सं. न. ३३५ वगैरे.

आणि बोलले कीं तुह्मी आलां काय ? नंतर गोपाळरावदादा उगेच राहिले. तों श्रीमंत शहाजानें वाजवीत डेऱ्यास आले[1].

३६. तों अस्तमान जाहला. श्रीमंत दादासाहेब पूजेस बसले. त्या लढाईत श्रीमंत दादासाहेब यांस थोडीशी जखम लागली होती. परंतु त्यांचा नेम, सबब पूजेस बसले. तों नैवेद्याची साखर सरली सबब शागीर्द कोठींत साखर मागावयास गेला. तेव्हां वाकनीस बोलले कीं, श्रीमंत रावसाहेबांची परवानगी पाहिजे ! असें ह्मणतांच शागीर्द फिरोन आला. जेव्हां नैवेद्याचा समय आला ते समयीं खुणेनें श्रीमंतांनीं विचारिलें. तेव्हां शागीर्द बोलला कीं वाकनीस परवानगी मागेतो. श्रीमतांनीं कोणाची ह्मणोन हस्तसंकेतानें विचारिलें. शिष्या बोलला कीं, रावसाहेबांची. तेव्हां ऐकून घेऊन तसेंच रागानें नैवेद्याशिवाय, पूजा समाप्त करून भोजन न करतां जाऊन निजले. तों इकडे श्रीमंत रावसाहेब यांचे आज्ञेप्रमाणें सरकारची भोजनाची तयारी जाहलीच होती. तों श्रीमंत दादासाहेब चार घटकानी विचार करून मुदबकाचे राहुटीकडे आले, आणि पानें मांडावीं ह्मणोन हुकूम केला. तों लागलींच पांच चार पानें मांडिलीं. श्रीमंत दादासाहेब पानावर बसले आणि बोलले कीं, अरे, बाळास बोलवा. असें म्हणतांच श्रीमंत उभयतां येऊन पानावर बसले. तों अर्धी भोजनें जाहलेनंतर श्रीमंत दादासाहेब बोलले कीं, बाळा, आतां हें सारें तूं पहात जा. याप्रमाणें जिकडील तिकडे शहाणपणानेंच ओपून दिलें.

३७. त्या दिवसापासोन श्रीमंत माधवरावसाहेब यांचा अंमल जाहला. त्याणीं बारा वर्षें राज्य केलें, त्यांत पराक्रम, कीर्ति बहुत केल्या. तो विस्तार लिहितां कोणासही शक्त होणार नाहीं. त्यांतून शक्तिनुसार वर्णन करितों. श्रीमंत रावसाहेब याणीं पटवर्धन यांचा बंदोबस्त बोलल्याप्रमाणें केला. सर्वांवर कृपा केली. पुरुषोत्तमराव दाजी यांजवर पूर्ण कृपा. जशी श्रीमंत नानासाहेब यांनीं कृपा केली त्याप्रमाणेंच श्रीमंत रावसाहेब यांची जाहली. त्याच प्रकरणीं कांहीं कथा वर्णन करितों.

३८. कोणी एके समयीं श्रीमंतांची स्वारी श्रीपंढरी क्षेत्रास आली. आल्यावर मंगळवेढ्यास पुरुषोत्तमराव दाजी यांस येणेविशी चिठी पाठविली. चिठी येतांच मेघश्यामरावबापू व दाजी उभयतां निघाले. समागमे कुसाजी गोविंद व आप्पाजीपंत मामा लेले हे उभयतां होते. ही कथा सदर लेले ह्यानीं सांगितली. पंढरीस गोविंदपंतनाना यांचे वाड्यांत

१. राक्षसभुवनाच्या लढाईच्या दिवशीं गोपाळराव येऊन भेटल्याचे लिहिले आहे हे चुकले आहे. गोपाळरावाची भेट लढाईनंतर बारावे दिवशी झाली अर्थात् अबारीत बसण्याचा प्रसग लढाईच्या दिवशीचा नव्हे. पहा ऐ. ले. सं. न. ३४६. २. परवानगी पाहिजे असें ह्मणतो. जुन्या लेखात परवानगी रसानगी असे शब्द येतात ते एकाच अर्थाचे आहेत असें मोलस्वर्थ लिहितो, पण माहीतगार वृद्धांचे मतें स्वतः सागितलेली ती परवानगी. दुसऱ्याच्या मुखे अगर चिठ्ठीने कळविलेली रसानगी. ३. पढरपुरास स. १७६९ च्या डिसेंबरांत श्रीमतांचा मुक्काम होता. स्वारीबरोबर बंधु नारायणरावही होते (ऐ. ले. सं. न. ८४५.)

उतरले. दुसरे दिवशीं स्नानसंध्या आटोपून श्रीमंतांकडे निघाले. तों श्रीमंत देवदर्शन घेऊन खासगीवाले याचे वाड्याचे पाठीमागें पूर्वेस नदीकडे धक्का आहे तेथें बसले होते. झाडून तमाम मानकरी मंडळी कारभारी वगैरे बसले. श्रीमंत गाशा घालून त्याजवर बसले. वर अबदागिरी धरिली आहे. बाकी सारी मंडळी जमिनीवर कोणी अंगवस्त्रे टोप्या खालीं घेऊन बसले. इतक्यांत दाजी व बापू निघाले तो तेथें आले. तों हजारों लोक बसलेले पाहिले. तेव्हां आप्पाजीपंत मामा बोलले कीं, दाजी, वाट व्हावयाची कठिण दिसती. तेव्हां दाजी बोलले कीं, पहा आम्हांस वाट होती कीं नाहीं ! असें ह्मणोन अंमळ मोठ्यानें बोलले कीं, अहो, आह्मांस वाट सोडा, श्रीमंतांकडे जावयाचें आहे. असें म्हणतांच श्रीमतांनीं ऐकिलें, तेव्हां श्रीमंत बोलले कीं, कोण, पुरुषोत्तमराव की काय? इकडे या. असें म्हणतांच गर्दीचे दोन भाग जाहले. नंतर श्रीमंतांजवळ जाऊन नमस्कार केला पुरुषोत्तमराव व मेघश्यामराव उभयतां भेटले तों श्रीमंतांनीं पुरुषोत्तमराव यांचा हात धरून ओढून आपले गाशावर बसविले. मेघश्यामराव मागें बसले नतर श्रीमंत बोलले की, तुम्हास उशीर जाहला. यांनीं उत्तर केलें कीं, मेघश्यामराव यांचे स्नानसंध्येमुळें थोडासा उशीर जाहला. नंतर श्रीमंतांनीं विचारिलें की, येथें वाळवंटीत हत्तींची लढाई लावावयाची आहे, त्यास तुमचे विचारास आल्यास लावावयाची. असे म्हणतांच पुरुषोत्तमराव दाजी म्हणाले कीं, आपलेपेक्षां मला कांहीं अधिक समजतें कीं काय ? तेव्हां श्रीमंत बोलले कीं, तुमचा मनसुबा जो आहे तोच करावयाचा. नंतर यांनीं सांगितलें की, येथें वाळवंटींत लढाई लावावयाची, त्यास आपली स्वारी येथें आली याजमुळे लोक पहावयास हजारों मनुष्यें बायकामुले वृद्ध आदि सर्व आले आहेत. त्यास लढाई लागून एखादें मनुष्य जायां जाहल्यास नीट दिसणार नाहीं. त्यास अगोदर गाडदी उभे करून सारे घांट बंद करावे. नंतर लढाई लावावी. असे म्हणतांच श्रीमतांस संतोष जाहला. नंतर गाडदी उभे करून वाळवंटींत मनुष्य नाहीं असे करून नंतर हत्तींची लढाई चार घटका जाहली. श्रीमंत उठोन अंबारींत बसोन नदीपलीकडे डेऱ्यास गेले. पुरुषोत्तमराव यास आज्ञा जाहली कीं, दोन प्रहरीं यावें. तुह्माशी कांहीं बोलावयाचे आहे, त्यास यावे. त्याप्रमाणें दाजी दोन प्रहरीं गेले होते.

२९. दुसरे दिवशीं जनोबा भाऊ व हरिहरराव तात्या व दामोदर बाबा या त्रिवर्गास श्रीमंतांचे भेटीस मंगळवेढ्याहून आणविलें, आणि प्रातःकाळीं घेऊन गेले. तों श्रीमंत स्नान करून पाटावर बसून भस्म लावीत होते, तों हे गेले. यांस कोठेंही श्रीमंतांचे घरीं आडकाठी नाहीं. जेथें श्रीमंत असतील तेथें जावयाचें याप्रमाणें श्रीमंत नानासाहेबांपासून सांप्रदाय. त्याप्रमाणें गेले. जाऊन श्रीमंतांस नमस्कार केला. या पुरुषोत्तमराव, ह्मणून बसावयास पाट दिला. नंतर त्रिवर्ग मुलांकडून नमस्कार करविला; आणि सांगितलें जे, हा मेघश्यामरायाचा, हा माझा व हा

१ हरिहरराव पुरुषोत्तम, जनार्दन मेघश्याम व दामोदर महादेव असे त्रिवर्ग मुलगे.

महादेवरायाचा. याप्रमाणें सांगितलें. नंतर वडिलांनीं सांगितले कीं, आह्मी पाठीमागे बसलों. तों श्रीमंत नारायणरावसाहेब स्नान करून त्या राहुटीत येऊन धोत्रें नेसावयास लागले. धोत्रें नेसून लागलेंच सोंवळे आणविलें आणि सोवळें नेसले. तें श्रीमंत रावसाहेब याणीं पाहून रागें भरले जे, तुला इतक्यांत विटाळ कशाचा जाहला ? तों पुरुषोत्तमराव दाजी यांनीं श्रीमंत नारायणरावसाहेब यांस विचारिलें की, रावसाहेब, आपणास विटाळ जाहला कीं काय ? तों श्रीमंत बोलले कीं, त्याचा स्वभावच तसला आहे. फार छांदस आहे ! येथें विटाळ व्हावयास राहुटीच्या कनाथा लहान आहेत कीं काय ? याप्रमाणें बोलतांच पुरुषोत्तमराव दाजी म्हणाले कीं, महाराज, श्रीमंत नानासाहेब यांचे पाठीमागें आपणच वडील. आपण सांभाळून घ्यावें. तेव्हां श्रीमंत बोलले कीं, पुरुषोत्तमराव, याचे कपाळीं राज्य नाहीं ! याप्रमाणे बोलणें जाहले. नंतर निरोप घेऊन माघारे आले. याप्रमाणें कथा वडिलांनीं सांगितली ती लिहिली असे.

४०. आणखी एक श्रीमंत माधवरावसाहेब यांची कथा लिहितों. कोणे एके दिवशीं श्रीमंतांची स्वारी मोरेश्वरास आली. तेथें दर्शन घेऊन कऱ्हेचे तीरी हत्तींची लढाई लाविली. श्रीमंत एका टेंकडीवर खुली चांदणी देऊन बसले तमाम मानकरी भोंवताली बसले. तों मस्त हत्तीस पक्के चार चार शेर दारू पाजोन नंतर लढाई लाविली. तों हत्ती लढत असतां अकस्मात् ज्या टेंकडिवर श्रीमंत बसले होते त्या टेंकडीवर एक हत्ती चढला. तेव्हां सारे मानकरी तमाम पळाले. तों हत्ती येऊन त्यानें चांदणीचे काढण्यांवर पाय दिला. परंतु श्रीमंतांचें आसन चळलें नाही तों खंडेराव दरेकर यांनीं हत्तीस भाला लाविला. श्रीमंतांचें तेज मोठे ! हत्ती माघारा फिरला. ते समयीं खंडेराव दरेकर यांस श्रीमंतांनीं चौघडा दिलो. तेव्हां स्वारी पुण्यास आली. पुढे सारे मानकरी श्रीमंतांचे मुजऱ्यास येईनात. तेव्हां श्रीमंतांनीं सर्व मानकरी यांस मेजवानी करून वस्त्रें दिलीं. तेव्हां मानकरी बोलले जे, आपणाकडे यावयास आम्हांस लाज वाटती. आम्ही सारे पळालो, आणि खंडेराव यांनीं भाला मारून हत्ती फिरविला. तेव्हां श्रीमंत बोलले कीं, हें काय ! एक वेळ तुमचा दिल कच्चा जाहला म्हणोन तुम्ही शिपाई नव्हेत कीं काय ? तुम्हीं मागें शिपाईगिरी केल्या त्या आम्हीं पाहिल्याच आहेत. याप्रमाणें बोलून सर्वांचे दिलांत हुशारी आणून सर्वांनीं एकचित्त असावें असें केलें; कां कीं पुढें त्यांचे हातून कामकाज घ्यावयाचें. याप्रमाणें शिपाई लोकांची हुशारी बहुमान श्रीमंत राखीत होते.

४१. कोणे एके दिवशी यशवंतराव देवकांते सरकारचे मानकरी यांचे घरीं मुलांचीं लग्नें होतीं. त्यांचे घराकडील पत्रें खर्चास पाठवावें म्हणोन

१. ही हत्तींची लढाई गुलटेकडीजवळ झाली व आप्पाजीराव पाटणकर यानी सोंडेवर कट्यार चालवून हत्ती माघारा फिरविला, असे डफसाहेब लिहितात. २. ह्मणजे सालीना बाराशे रुपयाची तैनात करून दिली. हत्ती, चौघडा व पालखी हे तीन मान दरसाल बाराशे रुपये खर्चाचे आहेत.

आलीं. त्यांनीं कारकुनास सांगितलें कीं, श्रीमंतांकडे जाऊन दोन हजार रुपये खर्चास मागून घेऊन येणे. याप्रमाणें सांगतांच कारकून श्रीमंतांकडे येऊन मजकूर कानावर घातला. श्रीमंतांनीं विचारिलें कीं, तुह्मांस सालमजकूरची तैनात पावली कीं नाहीं? कारकुनानें विनंति केली कीं सालमजकूर पावलें, पेस्तर सालपैकीं ऐवज देववावा, याप्रमाणें यशवंतराव यांनीं सांगितलें आहे. तेव्हां श्रीमंतांचें उत्तर जाहलें नाहीं. त्यास आठ दिवस जाहले. नंतर यशवंतराव यांनीं कारकुनास विचारिलें. कारकुनानें सांगितलें कीं, मीं एक दोन वेळ विचारिलें, परंतु उत्तर जाहलें नाही. नतर यशवंतराव जातीनें येऊन श्रीमंतांस विचारिलें, 'घरीं लग्ने आहेत. त्यास खर्चास पेस्तर सालपैकीं यावें.' याप्रमाणें विनंति केली. परंतु श्रीमंताचें उत्तर जाहलें नाहीं. श्रीमंत स्नानास उठले आणि जिना उतरूं लागले. तों यशवंतराव पाठीमागेंच होते. श्रीमंतांच्या झग्याची दावण मागले पायरीवर पडली, तों यशवंतराव यांनीं तिजवर पाय दिला, तो पुढील पायरीवर श्रीमंत पाय जों टाकितात तों झगा कमरेपासून चिरला, तेव्हां श्रीमंतांनीं पाठीमागें पाहिलें. तों यशवंतराव बोलले कीं, मी यशवंतराव देवकांते आहे. खर्चाची विनंति केली त्याचें कांहीच उत्तर जाहलें नाहीं! तेव्हां कारकुनास आज्ञा जाहली कीं, यशवंतराव यास दोन हजार रुपये देवविणें. अशी आज्ञा जाहली. नंतर यशवंतराव यांनी दोन हजार रुपये घेऊन घरास पाठविले. पुढे कांहीं एक दिवस जाहले तों युद्धाचा प्रसंग आला. ते समयीं श्रीमंत अंबारींत होते. तेव्हां यशवंतराव देवकांते यांनी हातांत भाला घेऊन घोडा हत्तीचे समोर आणिला आणि श्रीमंतांस मुजरा करून विनंति केली कीं महाराज, मी यशवंतराव देवकांत्या झगा फाडलेला! मजवर नजर असावी! असें ह्मणून जे समयीं उठिले[1] ते समयी शत्रूचे सैन्याचे दोन भाग जाहले! पुन्हां बचाऊन माघारे आले आणि पुन्हां श्रीमंतांस मुजरा करून 'मी झगा फाडलेला, मजवर नजर ठेवावी,' असें ह्मणोन पुनः उठोन शत्रूस मारिलें. याप्रमाणे तीन वेळ मारिलें. चवथे वेळेस श्रीमंत बोलले कीं, अहो यशवंतराव, तुह्मी पायपोस दिले तरी घ्यावयाचे, तेथें झगा फाडला हें वारंवार काय सांगतां! आतां उठूं नका. मागें उभें रहावें. असें ह्मणून लगामास धरून बळजबरीनें मागें उभें करविलें. याप्रमाणें शिपाई लोकांची आड सोशीत होते. ही कथा बळवंतराव सोनी बावधनकर यांनी सांगितली ती लिहिली असे.

४२. श्रीमंत रावसाहेब यांची जरब मोठी होती. होळकर यांचे दिवाण गंगोबा[2] यांस छड्यांनीं मारिलें ती कथा सर्वांस जाहीर आहेच. आणखी कोणी मातबर पदरचे गृहस्थ यांचे तोंडांत मारिली व दुसऱ्या कोणाचे वाकसानें हात तोडिले, याप्रमाणें जरबेच्या कथा बहुत आहेत.

---

१ उठले = त्वरेनें हल्ला करिते जाहले. शत्रूवर जाऊन धडकले. २ गंगाधर यशवत चद्रचूड. पेशव्यांनीं यांच्याच तोंडांत मारल्याचे डफसाहेब लिहितात.

४३. कोणे एके समयी शेखमिरा[1] ह्मणून शत्रूकडील यवन होता त्यास श्रीमंतांनीं अभय देऊन आपले लष्करानजीक उतरविला. तों दुसरे दिवशी लष्करचे हांगे[2] याणीं लुटिला. तेव्हां त्याने सांगून पाठविलें कीं, ब्राह्मणी फौज बेकैदी. हुकूम चालत नाहीं असें सांगतांच श्रीमंतांस अतिशय राग आला आणि डेऱ्याचे बाहेर येऊन बसले. आणि दोन सुतार उभे करून त्याचे लष्करांतून जो येईल त्याचा हात तोडावयास आरंभ केला! याप्रमाणे पांच पंचवीस हात तोडिले[3]. त्यांत पांच चार सोन्याचे कड्यांचे देखील हात तोडिले! परंतु कोणाचा दम—तुह्मी कां असें करतां असें—ह्मणावयाचा नाहीं! नतर गोविंद शिवराम खासगीवाले आपले डेऱ्यांत होते त्यांस वर्तमान समजलें. ते तसेच निघून श्रीमंतांकडे आले आणि हात तोडणार होते त्यास प्रथम राग भरून नतर श्रीमंतांस बोलले कीं, रावसाहेब, हें काय करतां? याणीं उत्तर केलें की, माझा हुकूम मोडिला! गोविंदरावतात्या बोलले कीं, सारी फौज थोटी करावयाची आहे की काय? याप्रमाणें म्हणून श्रीमंतांचा हात धरून डेऱ्यांत घेऊन गेले, आणि बोलले कीं, सारी फौज एकदिल होऊन बदलल्यास तुह्मी काय करतां? असे म्हणून राग शात केला. याप्रमाणें पदरचे[4] मंडळींत अशींही माणसे रक्षिली होतीं.

४४. आणखी गोविंदरावतात्या याची गोष्ट लिहितों. कोणे एके समयीं मोगल यांचे दिवाण रुकनुद्दौला श्रीमंतांचे भेटीस येणार होते तेव्हां त्यांस सामोरे जावें ह्मणून श्रीमंतांचे मनांत येऊन तयारी करविली, आणि गोविंदरावतात्यांस बोलावणें पाठविलें. तों त्यांस मजकूर समजून दाटून पोशाख न करतां अंगवस्त्र पांघरून श्रीमंतांकडेस आले. श्रीमंतांनीं पाहून बोलले कीं, गोविंदराव, हे काय! आह्मी निघालों. तुह्मीं पोशाख वगैरे करून यावें कीं नाहीं? तुह्मांस समजलें नाही कीं काय? गोविंदरावतात्या बोलले कीं, स्वारी कोणीकडे जाणार मजला कांहीं समजले नाहीं. असें ह्मणतांच श्रीमंत ह्मणाले, निजामअल्ली यांचे दिवाण रुकनुद्दौला आले आहेत त्यांस सामोरें जावयाचें आहे. त्यास गोविंदरावतात्या बोलले कीं, खासा नबाब जर आले तर त्यांस सामोरें कोण जाणार याची योजना करून नंतर त्यांच्या दिवाणास सामोरें जावयाचें करावें. श्रीमंत बोलले कीं, तर आतां दिवाणास सामोरें कोणीं जावें? गोविंदराव बोलले कीं, मी जातों. असें म्हणून अंबारींत बसून तोच सरंजाम घेऊन सामोरे गेले. याप्रमाणें गोविंदराव यांची योग्यता होती.

---

१ हें नाव चुकलें असून या ठिकाणी मीर रेजा असें नांव पाहिजे. मीर रेजा हा हैदरअल्लीचा मेहुणा होता. यास लुटल्याची हकीकत ता० ८ मार्च स० १७६७ रोजी घडली. तिचे मनोरंजक तपशीलवार वर्णन ऐ. ले. संग्रहात नं. ६९२ पासून ६९७ च्या पश्चात आहे. २ लुगारे, लुटारू. ३ पेशव्यानी अडीचशें माणसांचे हात व कान कापल्याचें ऐ. ले. संग्रहात लिहिलें आहे. ४ त्या समयी सखारामबापूनीं श्रीमतांपुढें पदर पसरून त्याचा राग शात केला असे ऐ. ले. संग्रहात आहे.

४५. गोविंदरावतात्यांचा व पुरुषोत्तमराव दाजी यांचा अत्यंत लोभ. तात्यांनीं दाजीस दोन श्रीनर्मदाबाण दिले ते इनामगांव मौजे आंबें मुक्कामीं श्रीउत्तरेश्वरास एक स्थापना व श्रीअमृतेश्वरीं देवालयाचे बाहेर आहे तो असे दोन बाण दिलेले स्थापिले; व अगत्य बहुत बाळगीत.

४६. श्रीमंतांचाही दाजींवर विश्वास मोठा. येविशीं कथा सांगतों. मंगळवेढ्यास बापूजी नाईक भोसकर ह्मणून सावकार होते. त्यांचा व शिवाजीपंत[1] नाना म्हैसकर यांचा कांहीं कारणामुळें देण्याघेण्यास्तव खटला पडला. मंगळवेढीं चौघांनीं सांगितलें, परंतु शिवाजीपंत नाना ऐकेनात. भोसकर याजवर लोभ दाजींचा मोठा. शिवाजीपंत हे दरबारांत प्रसिद्ध. यामुळें खटला मंगळवेढी तुटला नाहीं. शिवाजीपंत नाना पुण्यास जाऊन भोसकर याजवर सरकारचा रोखा[2] केला आणि ढालाईत[3] दोन असामी रवाना केले; आणि मामलेदार मेघश्यामरावबापू यांस लिहिलें कीं, देखतचिठ्ठी भोसकर यास हुजूर रवाना करणें. याप्रमाणें रोखा आला तेव्हां मेघश्यामरावबापू यांनीं भोसकर यांस बोलाऊन सांगितलें कीं, तुह्मास पूर्वींच सांगत होतों कीं, हत्तीसीं गाडा ( ? ) खेळों नये. तें प्रत्यास आलें. आतां पुण्यास जावें ! असें सांगितलेनंतर भोसकर निघून दाजीकडे आले. तेव्हां दाजी यांनीं ढालाइतांस बोलावून सांगितलें कीं, सहा रोजात तुह्मांस मनाई आणून देऊं. नाहींपेक्षां असामी हवाली करूं. याप्रमाणें सांगून ढालाइतांस पोटास वगैरे देऊन बंदोबस्त करविला. आणि लागलीच सुलतानबा झाडकर ह्मणोन बारगीर होते त्यांस तयार करून पुण्यास रवाना केलें; आणि गोविंदरावतात्या यांस लिहिलें कीं, बापूजी नाईक भोसकर आमचे परम स्नेही. त्यांचा जाबसाल समक्ष मी येऊन श्रीमंतांजवळ विनंति करीन. तोंपर्यंत ढालाइतांस मनाई पाठवून द्यावी. सहस्र कामें टाकून हें काम अगोदर करावें. असें पत्र लिहून स्वारास सांगितलें, तूं अगोदर पुण्यास जाणें. पुण्यांत शोध करून नंतर थेउरास जावें. तेथें श्रीमंत आहेत. तेथे गोविंदरावतात्या असले तर बरेंच जाहलें. पत्र देऊन काम करून यावें. पुण्यांत असल्यास गोविंदरावतात्या यांस सांगावें कीं, आपण थेउरास जावयास पालखी आणली ह्मणजे नंतर मी घोड्यावरून उतरेन असें ह्मणावें. पालखी आणली ह्मणजे घोड्यावरून उतरावें. असें सांगून स्वारास जलद रवाना केलें. तो तिसरे दिवशीं दोन प्रहरचे आंत पुण्यास गेला. तों तेच दिवशीं श्रीमंतांचा निरोप घेऊन थेउराहून गोविंदरावतात्या पुण्यास आले होते ते भोजनास बसले होते. स्वार तेथें गेला. जातांच परवानगी लागली. दाजींकडून स्वार आला असें समजतांच ‘ आंत येणें ’

१. ज्याची पणे दरबारच्या हालहवालीविषयी अत्यन मनोवेधक अशी शेकडो पत्रे आह्मी ऐ. ले. संग्रहांत आजपर्यंत छापिली आहेत व पुढेही छापणार आहो ते हेच शिवाजीपंत म्हैसकर. हे पटवर्धनाकडून पेशव्यांच्या दरबारी वकील होते. २. ताकीदपत्र. ३. तगाद्यासाठी सरकारातून शिपाई पाठविण्यात येत त्यांत सक्ती, बेपर्वाई, उद्दामपणा या गुणामुळें ढालाइतांनी पहिला नबर पटकाविला होता !

म्हणोन सांगितलें. तों गोविंदरावतात्याच आंचवावयास बाहेर आले. तों लाखोटा स्वारानें घोड्यावरून दिला. गोविंदरावतात्या बोलले कीं, स्वारास उतरावयास सांगावें आणि पोटास द्यावें. स्वारानें सांगितलें कीं आपण श्रीमंतांकडे जावयास पालखी आणविली ह्मणजे नंतर मला घोड्यावरून उतरावयास सांगितलें आहे. असे म्हणतांच तात्यांनीं लागलीच पालखी आणावयास सांगितलें. नंतर लाखोटा फोडिला. पत्र वाचिलें, तों भोसकर याचें काम ! तेव्हां बोलले कीं, काम थोडे आणि निकड फार ! परंतु मला दाजींचे कामास नाहीं म्हणावयाचें नाहीं. असें म्हणून विडा घेऊन लागलीच पालखींत बसले. स्वारास पात्र वाढून दिलें. स्वारही जेऊन बरोबरच निघाला. तों दोन प्रहर भरतात तों थेउरास गेले. श्रीमंतांकडे गेले तो श्रीमंत निजले होते. प्रकृति बिघडली होती सबब फारसी झोंप नव्हती. गोविंदरावतात्या येतांच जागृत झाले आणि विचारिलें कीं, गोविंदराव, तुम्ही दोन रोजांचा निरोप घेऊन गेलां आणि लागलीच आलां ? त्याणीं सांगितलें कीं, पुरुषोत्तमराव दाजीचे कामामुळें आलों. मंगळवेढ्यांत बापूजी नाईक भोसकर म्हणोन सावकार दाजीचे स्नेही आहेत, त्यांचा व शिवाजीपंत म्हैसकर यांचा खटला पडोन त्यांनीं सरकारचा रोखा करून ढालाईत पाठविले. याजकरितां दाजींनीं लिहिले आहे जे, त्यांच्या जावसालाची मी समक्ष येऊन विनंति करीन, ढालाइतांस मनाई पाठवून द्यावी, म्हणोन लिहिलें आहे. श्रीमंतांनीं आज्ञा केली कीं, ढालाइतांस मनाई देवणें. गोविंदरावतात्या यांनीं त्याच वेळेस मनाई आपले हातची लिहून तयार केली तों इतक्यांत श्रीमंतांनीं आज्ञा केली कीं, गोविंदराव, पुरुषोत्तमराव यांसच लिहावें कीं, म्हैसकर व भोसकर या उभयतांचा खटला काय असेल तो मनास आणोन वाजवी असेल तें करणें, असें लिहिणें. पुरुषोत्तमराव यांची खातरजमा मला आहे. ते गैरवाजवी करणार नाहींत. त्याप्रमाणें पत्र देऊन गोविंदरावतात्या यांनीं स्वारास त्याच वेळेस रवाना केलें आणि आपण अस्तमानीं पुन्हां पुण्यास आले. स्वार मनाई घेऊन सहावे रोजीं मंगळवेढ्यास आला. दाजीस पत्र दिलें. दाजी यांनीं सांगितलें कीं, हें पत्र मामलेदारांस दाखवावें. आमची ओळख पुण्यांत आहे किंवा नाहीं हें समजलें पाहिजे ! याप्रमाणें श्रीमंतांची दाजीविषयीं खातरजमा व गोविंदरावतात्या यांस अगत्य. ही कथा वडिलांनीं सांगितलेवरून लिहिली आहे.[१]

४७. आणखी वडिलांची कथा एक लिहितों. श्रीमंत माधवरावसाहेब पट्टणचे स्वारीस जावयास निघाले ते धारवाडास आले. धारवाडास मोर्चे बसविले[२] तों पट्टणाहून हैदरखान फौजसुद्धां धारवाडच्या कुमकेस निघाला. ही बातमी श्रीमंतांची आली. नंतर

---

१. स. १७७२ च्या मेपासून आक्टोबरपर्यंत केव्हां तरी घडलेली ही गोष्ट आहे. २. सन १७६४ च्या सप्तबरांत.

गोविंदरावतात्या यांसी बोलले कीं, हैदरखान पट्टणाहून निघाला. त्याचे तोंडावर कोणी पाठवावा लागेल. आह्मास तो मोर्चे बसले त्यापेक्षां येथून जावयाचें नाहीं. त्यास कोण पाठवावा ? गोविंदराव बोलले कीं, हैदरखान याचे तोंडावर गोपाळराव यांस पाठवावें. त्यांजवांचून त्याचे तोंडावर जावयास कोणी योग्य नाहीत. असे ह्मणतांच श्रीमंत 'उत्तम' म्हणाले. आणि गोपाळरावदादा यांस बोलावून आज्ञा केली कीं, हैदरखान पट्टणाहून निघाला, त्यास त्याचे तोडावर कोणी गेलें पाहिजे त्यास आपण जावें. असें म्हणतांच 'आज्ञा' म्हणाले. नतर श्रीमंतांनीं दहा हजार फौज व दहा हजार गाडदी याप्रमाणें जाजती फौज देऊन रवाना केलें. तों धारवाडाहून दोन मुक्काम गेले. हैदरखानास बातमी समजली कीं, गोपाळराव आले. असें समजतांच कूच करून माघारे पट्टणांस[1] गेला. याप्रमाणें रायाची दहशत होती.

४८. भवानराव प्रतिनिधि यांनीं सांगितलें की, या पृथ्वींत साडेतीन राव. ते कोणते ? एक मुराररराव घोरपडे, एक भवानराव प्रतिनिधि, एक गोपाळराव पटवर्धन व अर्धा श्रीमंत माधवरावसाहेब ! असे प्रतिनिधि बोलले. येविशी कथा सांगतों. कोणी एके दिवशीं प्रतिनिधि पुण्यांत आपले वाड्यांत बसले होते. तो गोपाळनाईक तांबवेकर हे सावकार पालखींत बसून जात होते. समागमें कांही स्वार पायदळ व ईटेकेरी[2] व पट्टेकरी असे जात होते. ते यांचे माडीखालून गेले तों यांनीं शोधास पाठविलें कीं स्वारी कोणाची ? त्यांचे माणसांनी सांगितलें कीं, स्वारी गोपाळराव यांची. असें म्हणतांच त्याप्रमाणें पंत यांस येऊन सांगितलें कीं, गोपाळराव यांची स्वारी. पंत यांनीं शोधास पाठविलें की, गोपाळराव पटवर्धन कीं काय ? त्यांचे माणसांनी सांगितलें कीं, तांबवेकर. पटवर्धन नव्हेत. असे समजतांच पंतांनीं आज्ञा केली जे, काय पहातां ! धरून ठोका ! हा राव कोठून जाहला ? अशी आज्ञा होतांच पंतांकडील शेंपन्नास मनुष्य जाऊन तांबवेकर याची पालखी मोडून त्यासही मारिलें. इटे व पट्टे हिरावून घेतले. नंतर श्रीमंतांकडे तांबवेकर जाऊन मजकूर सांगितला. श्रीमंत बोलले कीं, तुह्मी आपणास राव कां ह्मणत होतां ? भवानराव यापुढें आमचें चालावयाचें नाहीं ! याप्रमाणें गोपाळराव पटवर्धन यांची योग्यता. तो केवळ प्रति अर्जुन. याप्रमाणें तो गोपाळराव हैदरखान याचे तोंडावर जातांच हैदरखान माघारा गेला. नंतर श्रीमंतांनीं धारवाड घेऊन स्वारी पुढें चालती जाहली.

---

१ ही माहिती चुकली. पट्टणास न जातां तो बिद्नूरच्या झाडीतून बाहेर पडला होता तिकडेच परत गेला. पहा ऐ. ले. स. न. ४८६ व ४९१ वगैरे. २ इटा हें भाल्याच्या जातीचे एक पायदळाचें हत्यार आहे. याचा मारा बारा हातपर्यंत चालतो. एक इटेकरी व दहा पट्टेकरी बरोबर अशी ह्मण आहे.

४९. आतां मुरारराव घोरपडे याची एक कथा सांगतों. कर्नाटकांत निजगल म्हणोन एक ठाणें होतें, तेथे श्रीमंतांचे मोर्चे बसले. एके दिवशीं लढाई होत असतां श्रीमंत मोर्च्यांत बुद्धिबळे खेळत बसले होते. मुरारराव याचे बंधु दौलतराव आणि आपण असे उभयतां खेळत होते. खेळत असतां अकस्मात् गोळी येऊन श्रीमंत नारायणरावसाहेब यांस निसरती लागली. लागतांच श्रीमंतांस विनंति केली की, महाराज, नारायणरावसाहेब यांस गोळी लागली. तेव्हां आज्ञा जाहली की, त्यांस गोटास घेऊन जावें. नंतर पालखींत बसून श्रीमत नारायणरावसाहेब गोटास गेले. ज्या जाग्यावर गोळ्या येऊन पडत त्या जाग्यावर श्रीमंत बुद्धिबळे खेळत बसले, व श्रीमंत नारायणरावसाहेब यांस गोळी लागली. तेव्हां सर्वास मोठी काळजी पडली. परंतु श्रीमंतांस येथून उठा ह्मणण्याची कोणाची शक्ति नाहीं ! तेव्हां सर्व सरदारानीं जाऊन मुरारराव यास सांगितलें कीं, राव, श्रीमंत बुद्धिबळें खेळत बसले तेथें गोळ्या येऊन पडतात. श्रीमंत नारायणरावसाहेब यांस गोळी लागली. आमची कांही श्रीमंतास ' उठा ' म्हणावयाची ताकद नाही ! ! ! तेव्हां मुरारराव तसेच निघून श्रीमंतांपुढे आले. आणि एक शिवी देऊन बोलले की, ऊठ ! नाहीं तर आतां तोडेंतों ! असे ह्मणतांच श्रीमंतांनीं वरते पाहिले. तों राव म्हणाले की, तूं मरणार की काय ? त्या पोरांस गोळी लागली, दैववशात् वांचला म्हणून वांचला आणि तुला गोळी लागल्यावर पुढें काय करावयाचें ! असे म्हणोन आपले भावास रागे भरले आणि विनोबा आबा व धोंडोबादादा हे उभयतां ते समयी जवळ होते त्यांसही रागे भरले तों श्रीमंत म्हणाले कीं, हें ठाणें येत नाही त्यास काय करावें ? मुरारराव म्हणाले हे एकांडे न् × × बरोबर ! माझा

१ साडेतीन रावाची गोष्ट निघाली आहे त्या अर्थी साडेतीन रावात पहिल्या नंबरचा राव मुरारराव याची गोष्ट लिहितों असा लिहिण्याचा ओघ. २ गजेंद्रगडकर. ३ ज्या ठिकाणी खेळत बसले होते त्या ठिकाणी किल्ल्यावरून तोफाचे गोळे येऊन पडू लागले असा अर्थ किल्ल्यावरून बंदुकीच्या गोळीचा मारा इतक्या लांबवर पोंचणार नाही हे उघडच आहे. ४ जखमी करितो. ५ पेशव्याचे बंधु नारायणराव हें पोर. या वेळी मुराररावाचे वय पासष्टपासून सत्तर वर्षांचे असावे. ६ विनोबा आबा व धोंडोबा दादा हे भास्कर हरि पटवर्धन याचे पुत्र उभयताही नामांकित एकांडे शिलेदार होते. ७ तुह्मासारखे शूर सरदार व पन्नास हजार फौज घेऊन या भिकारी किल्ल्यास वेढा घालून बसलों, दहा बारा दिवस झाले तरी किल्ला हाती येत नाही, तेव्हा आह्मी येथें लढण्यासाठी आलो नसून खेळण्यासाठी आलो हेच खरे, ह्मणून खेळत बसलों; इतकी खोंच या प्रश्नांत आहे. ८ एकाडे ( cavaliers ) ह्मणजे एकटे स्वार. हे निधड्या छातीचे मर्द शिलेदार ब्राह्मण, मराठे, रजपूत, मुसलमान वगैरे सर्व जातीचे असत. सामान्य स्वाराचें वेतन जरी सालिना अडीचशे, तीनशे, चारशें रुपयेपर्यंत घोडें माणस पाहून पाहून असे, तरी सात आठशें [illegible] दोन दोन हजार पर्यंत तैनाता देऊन व पालख्या अबदागिन्या वगैरे बहुमान देऊन हे एकाडे प्रत्येक पथकात व पागेंत दहा, वीस, पन्नास, शभर असे एकंदर स्वारांच्या सख्येचें मान पाहून बाळगलेले असत. आणीबाणीच्या वेळी नेहमी हे मोहरे अघाडीस असावयाचे. हेच पुढें बढती मिळून पागे व पथके होत असत. ३४ व ४१ या सदरांत ज्याची नांवें आलीं आहेत ते शितोळे व देवकाते हे त्या त्या वेळी एकांडेच होते.

तमाशा पहा ! असें म्हणून झाडून मानकरी घेऊन पायउतारा होऊन नीट चालोन गेले तों हल्लाच केली. मुरारराव खासा जातीनिशीं निशाण[1] घेऊन चढले. वर निशाण चढवून खालीं पाहतात तों शिडीच्या खालच्या पायरीजवळ श्रीमंत उभे ! तें पाहून मुरारराव यांनीं तोंडांत बोट घालून आश्चर्य केलें कीं, याचेपुढें शिपाईगिरी मिरविण्याची आमची हद्द जाहली ! याप्रमाणें श्रीमंतांचे मर्दुमीची गोष्ट सांगितली. ही कथा विनोबा आबा यांचे मुखेंची.

५०. पुढें श्रीमंतांची प्रकृति बिघडली सबब त्रिंबकरावमामा यांस मागें ठेऊन त्यांबरोबर पटवर्धन, सारे पागे, पथके, फौजा ठेऊन श्रीमंत पुण्यास आले. नंतर मागें गोपाळरावदादा यांचीही प्रकृति बिघडली. उदराची भावना जाहली. तेव्हां ती॥ ताई व नाना या उभयतांची भेट घ्यावी अशी मनांत फारच उत्कंठा लागली. लष्करांत सर्वत्रांस सांगून परशुरामभाऊ, वामनरावबाबा इत्यादि सर्वत्रांस निरवानिरव करून गोपाळराव मिरजेस यावयास निघाले पुरुषोत्तमराव दाजी त्या वेळीं घरास आले होते नारायणरावनाना वारले होते. गोपाळरावदादा यांनीं परशुरामभाऊस सांगितलें कीं, माझे पाठीमागें माझें नांव तूं रक्षण करिशील. असें सांगून त्रिंबकरावमामास सांगून पाठविलें कीं, माझी प्रकृति बिघडली; शरीराचा भरंवसा नाहीं; यास्तव मी वडिलांस भेटावयास जातों. असें ह्मणतांच त्रिंबकरावमामा बोलले कीं, श्रीमंतांनीं जरीपटका आपले भरंवशावर येथें ठेऊन प्रकृति बिघडली सबब श्रीमंत पुण्यास गेले. आपणही प्रकृति बिघडली ह्मणोन जातां. साऱ्यांनींच असा बहाणा केल्यास पुढे वाट काय ? शत्रु-सान्निध्य आणि आपण फौजेंतून गेलां ही गोष्ट शत्रूस समजल्यावर पुढें कसें होईल ? श्रीमंतांचा राग कोणे प्रकारचा हें आपणास माहीत आहे. मीं सांगावें असें नाहीं. असें ह्मणतांच गोपाळरावदादा बोलले कीं, हजार गोष्टी असोत, मी वडिलांचे पाय पहावयास जाणार. मी वांचल्यावर नंतर पुढें श्रीमंत चाकरीविशीं रागें भरतील ! असें ह्मणून डोलींत बसून डांकेवरून मिरजेस आले[3].

५१. इकडे त्रिंबकरावमामा यांनीं ' गोपाळराव, तुह्मी जाऊं नका, ' असें मी सांगत असतां ते घरास आग्रहानें निघून गेले, असें श्रीमंतांस पत्र लिहिलें. प्रकृति अत्यवस्थ हें

१. घोरपड्याचें निशाण जरीपटका. थोरले राजाराममहाराज यानी सताजी घोरपडे सेनापति यांस दिलेला. २. निजगलचा किल्ला हल्ला करून घेतल्याविषयी ऐ. ले. संग्रहांत न. १७३ चे पत्र नाना फडनविसानी लिहिलेलें आहे तें पहा. त्यात हल्ल्याच्या गर्दीत श्रीमंत उभे होते, त्याचे मागें नारायणराव उभे होते तेव्हा त्यास गोळी लागल्याचे लिहिले आहे या हल्ल्यांत चित्रदुर्गचा संस्थानिक पुढारी होता असे कर्नल विल्क लिहितो. बखरींत मुराररावाचें वर्णन आहे ते विनोबा आबाच्या तोंडचें असल्यामुळे तेंच खरें आहे. स. १७७० च्या मेमध्ये निजगलचा किल्ला घेतला. ३. ऐ. ले. सं. नं. १०४४ । १०५८ । १०८० वगैरे पहा.

कांहींच न लिहितां जितका गिळा तितका लिहून पाठविला ! श्रीमंत यानी लष्करच्या डांकेचें पत्र फोडून पाहिले. त्यांत गोपाळराव घरास गेले हे वाचताच तप्त जाहले आणि ह्मणाले की, मी मोफत सरंजाम चालवितों की काय ? असें ह्मणून लागल्याच जप्ती चिठ्ठ्या लिहून दोनशे असामी स्वार व पाचशे पायदळ व एक कारकून याप्रमाणें सरंजाम जप्त करण्याकरिता रवाना केले.

५२. तों इकडे गोपाळरावदादा मिरजेस येऊन पोंहचले. नतर थोरले दिवाणखान्याचे काम चालले होते, संपत आले होतें, ते डोलीचा पडदा उघडून पाहिले. रात्री नानानी व ताईची भेट घेतली. सर्व मंडळी भेटली. एक रात्र होते. प्रातःकाळी वारले. नतर गोविंदपत नानांनी श्रीमंतास पत्र लिहिले जे, प्रकृति बिघडली ह्मणोन लष्करातून राव घरास आले. एक रात्र होते प्रातःकाळी वारले. आतां आह्मांस वृद्धपणीं ही गोष्ट प्राप्त जाहली ' याप्रमाणे अनेक प्रकार पत्र लिहून जासूद जोडीबराबर जलद रवाना करून नतर गोपाळराव याचे शव बाहेर काढिले तो कहर कोठवर लिहावा ! गोपाळरावदादासारखे रत्न गेले ! सर्व पटवर्धन त्यांनी उदयास आणिले. त्याजविशी शोक जाहला तो कोठवर ल्याहावा !

५३. इकडे पुण्याकडून जप्तीचा कारकून रवाना जाहला तो पुण्यानजीक शिरवळ म्हणून गाव आहे तेथे आला तो इकडून जासूद गेलेले त्यास आढळले. त्याने शोध केला जे, जासूद कोठील कोण ? जासूद बोलले कीं आम्हांस बोलावयास फुरसत नाही. गोपाळराव दादा वारले, सबब आम्ही श्रीमंताकडे पुण्यास जातो. असे म्हणून जासूद चालते जाहले कारकून यानीं विचार केला कीं, श्रीमंतानी गोपाळरावदादा घरास गेले म्हणून जप्तीस आम्हांस रवाना केले, परंतु अशी अवस्था जाहली. हें श्रीमतांस समजले असतां आम्हावर वेडेपणा येईल त्यास येथेच मुक्काम करावा. श्रीमंतांस कळवून जशी आज्ञा येईल तसा विचार करावा असें मनांत आणून सांडणीस्वारासमागमे पत्र श्रीमंतांस लिहून पाठविले जे, ऐकीव वर्तमान गोपाळराव वारल्याचे लिहिले आहें. जासूदही स्वामीकडे आलेच आहेत. जशी आज्ञा येईल तसें करीन. याप्रमाणें लिहून सांडणीस्वार रवाना केला. जासूदही पुण्यास जाऊन पोंहोचले. मिरजेहून जासूदजोडी आली म्हणोन परमाणगी लागून आंत जाऊन लखोटे हवालीं केले. फोडून वाचतांच श्रीमंत अमळ पाव घटका सर्द जाहले. आणि बोलले की माझा एक हात गेला ! असे म्हणून त्यावेळी चौघडा जो वाजत होता तो, बंद करविला[2], आणि चिंताक्रांत जाहले की, कारकून जप्तीस पाठविला त्यास

१ गोपाळरावाच्या मृत्यूसबधे ऐ. ले. सं. न. १०८९ चे पत्र फार उत्तम आहे ते पहा. २ गोपाळराव वारल्याचे वर्तमान समजताच पेशव्यानी पुण्यातले चौघडे चार दिवस बंद केले होते व त्या अवधीत दरबार भरण्याचेंही मना केलें होते. पहा ऐ. ले. सं. न. १०८९.

कसे करावें ? असें मनांत आणिलें तों इतक्यांत सांडणीस्वार आला त्यानें लाखोटे दिले. ते वाचून पहातांच अंमळ स्वस्थ जाहले. नंतर गोविंदपंतनाना यांचे पत्राचें उत्तर दिले. त्यांत मजकूर बहुत लिहिले; परंतु हांशील काय आहे कीं, आपण मनांत असें आणावे जे, माधवराव गेले आणि गोपाळराव आहेत असें मनांत आणावे !! असें लिहून जासूद रवाना केले. आणि जप्तीचे कारकुनास पत्र लिहिलें कीं, तुह्मी सांडणीस्वार पाठविला हें फार चांगलें केलें. आता पत्रदर्शनी निघून यावे. शहरांत याल ते दिवशीं रात्रीं चार दिशांनीं फुटून यावे. एकंदर जमावसुद्धां एकाच वाटेनें येऊ नये. असे लिहून पाठविलें. आणि त्रिंबकराव मामास हे वर्तमान लिहून त्यांस लिहिलें कीं, गोपाळराव यांची इतकी प्रकृति बिघडली असतां तें कांहींच तुह्मी न लिहितां घरास गेले म्हणोन सारा गिल्लाच लिहिला यांत सरदार लोकांची हुरमत तुम्ही घेणार हे चांगले कीं काय ? याप्रमाणे नानाप्रकारें फजिती करून लिहिलें

५४. याप्रमाणे गोपाळरावदादा यांनीं सरकारचाकरी करून वैकुंठवासी जाहले. गोपाळरावदादा यांचे वेळेस हे पंचभाई, पाचजण भाऊ म्हणजे भारती वीर, याप्रमाणे यांचा लौकिक. वडील गोपाळराव, दुसरे नीलकंठराव, तिसरे कोन्हेरराव, चौथे नारायणराव, पांचवे पुरुषोत्तमराव, याप्रमाणें पांचजण. हा अनुक्रम शिपाईगिरीचा. यांत वयाने लहान मागें पुढें आहेत. परंतु पराक्रम सर्वांचे समान. शिपाईगिरी समान.

५५. आतां नीलकंठराव यांचे पराक्रमाचें वर्णन करितो. गोपाळरावदादा वारलेवर कर्नाटकचे स्वारीस त्रिंबकराव मामा होते, तेथे सारे सरदार पटवर्धन आदिकरून होते. पटवर्धन भाईमंडळी सारी होती. कोणे एके दिवशीं त्रिंबकराव मामा यांनी भालदाराचे[1] हातीं पटवर्धन यांजकडे सागून पाठविलें कीं, तुमचे पथक उदईक कहीसमागमें[2] नेमिलें आहे. तर तयार होऊन कहीबरोबर जावें. अशी ताकीद करावयास भालदार पटवर्धन यांचे लष्करांत आला. तो सारी मंडळी चांदणीत कचेरींत अस्तमानाचे समयास बसले आहेत, तेथे भालदार येऊन सलाम करून आपले यवनी भाषेनें सांगितलें की, उदईक आपले पथक कही बरोबर जावें ह्मणून मामासाहेब यांणीं हुकूम केला आहे सर्व एकमेकांकडेस पाहूं लागले. त्यांत पुरुषोत्तमराव दाजी बोलले कीं, अरे, याचीं उत्तरें बहुत आहेत, परतु तीं तुजपाशीं बोलावयाचीं नव्हेत. त्यास मामास सांगावें जे, आमचें पथक कहीबरोबर जावयाचें नाही असें सांगावें. असे ह्मणतांच भालदार दहावीस पाउलें माघारा जाउन पुन्हां उलटून येऊन सलाम करून बोलला जे, आणखी मामासाहेब यांनीं सांगावयास सांगितलें आहे,

१ प्रतिष्ठिताकडे दरबाराची बोलावणी व निरोप पोचविण्याचे काम भालदाराचे. २ लष्करची दाणावैरण आणणारी टोळी. हीत लढणारे लोक नसल्यामुळे तिच्या रक्षणार्थ बरोबर जुजबी फौज द्यावी लागत असे. कही सभाळून आणण्याचे हे पोलीसचे भिकार काम आमच्या दर्जाचे नाही, या कामासाठी आह्मी आपली घोडी माणसे शिणवीत नाही, हे पटवर्धनाचे ह्मणणें.

त्यास आपली आज्ञा जाहली तर विनंति करीन. असें म्हणताच पुरुषोत्तमराव दाजी बोलले की, तुला जे सांगितले असेल तें बोलावें. याप्रमाणे म्हणतांच भालदार बोलला की, हे मानपान गोपाळराव दादा यांजबरोबर गेले, आतां जी चाकरी सांगू ती करून रहावे, असा मामासाहेबांचा हुकूम आहे. याप्रमाणें बोलतांच प्रथम मामास एक शिवी देऊन दाजी बोलले की, अरे, गोपाळराव मात्र गेले, परंतु ज्यांनीं गोपाळराव केले ते जिवंत आहेत ! असे म्हणाले तो भालदार इतके बोलून निघून गेला. त्यास मामानी बोलावयास तसेंच सांगितलें होतें नंतर पुरुषोत्तमराव दाजी पालखींत बसून त्रिंबकराव मामाकडे गेले. तों भालदार याने जाऊन वर्तमान सांगितलेंच होते. तो हेही गेले. जाताच ' या पुरुषोत्तमराव ' म्हणोन उठोन मामानी ताजीम दिली आणि बसले. तो घटका रात्र जाहली. तेही बोलेनात व हेही बोलेनात. तेव्हां त्रिंबकराव मामा यांनीं गोष्ट काढिली जे, पुरुषोत्तमराव, काय करावे ? या उपर घोड्यांस दाणावैरण मिळून घोडीं कांहीं जगावयाचा सुमार दिसत नाही. हैदरखान याचे बेदडे[2] चोहींकडे फिरतात. कही निभावून येईनाशी जाहली. त्यास आपल्यासारखे मातबर यांचे पथक समागमें देऊन कही निभावून आली तर आली. नाहींपेक्षां सारीं पथके देऊन पाहिलीं, कहीं निभावून येत नाहीं, यास कसें करावे ? असें म्हणतांच पुरुषोत्तमराव दाजी बोलले कीं, हे वर्तमान सारे खरेंच परंतु तुम्ही शेवटील निरोप काय सांगून पाठविला जे, हे मानपान गोपाळराव यांजसमागमें गेले, आतां जी चाकरी सांगू ती करावी, असे सांगून तुम्ही पाठविलें- त्यास आपण कांहीं नवे आलां नाहीं. श्रीमंत भाऊसाहेब याचे मामा ते सारे राज्याचे मामा. कां कीं, शिपाई मर्द माणूस, म्हणून श्रीमंतांनी जरीपटक्यासमागमे आपणास नेमिलें. नाहींपेक्षां श्रीमंताचे घरीं मामा पुष्कळ आहेत ! परंतु मामा, गोपाळराव मात्र गेले, परंतु ज्यांनीं गोपाळराव केले ते मात्र जिवंत आहेत ! आणखी आपण सारे हैदरखानाच्या माणिकचौकांत[3] आहोंत. हरवक्त काम पडतें, कोण मनुष्यें कशीं हें तुम्हीं नजरेनें पहातां, असें असोन भलतेंच बोललां ! त्यास मामा, तुह्मी जुने माहितगार आहां म्हणोन उगेच राहिलों. नाहीपेक्षां नवा कोणी जर असता तर ××××× ला पायपोसाने मारिलें असतें ! याप्रमाणें तोंडावर बोलून निघून आपले लष्करांत आले आणि सर्व लहान थोर जमा करून त्यांस सांगितलें कीं, आम्ही जाऊन जे पाहिजे ते बोलून आलो. परंतु उद्यां प्रसंगास जर नांव रक्षिलें तर बरें, नाहींपेक्षां पडले काम करावें लागेल ! त्यास तुमचे सर्वांचे मनांत काय

१ गोपाळरावास ज्यानी एवढ्या योग्यतेस आणिले ते आह्मी भाऊबद् अजून जिवत आहो. २ कर्नाटकचे लुटारू लोकास बेद ही संज्ञा आहे. जसे इकडचे पेढारी तसे तिकडचे बेद. मराठीतला ' बैदा ' हा शब्द ' बेद ' या शब्दापासूनच निघाला आहे. बेद याचेच तुच्छतावाचक रूप ' बेदडा.' ३ माणिक चौक जसा शहराच्या मध्यभागी असतो तसे आपण हैदरखानाच्या मुलखात मध्यभागी आहोत. तो केव्हां गाठून आपणास अडचणीत घालील हा नेम नाही, असे तात्पर्य.

आहे ते सांगावें. याप्रमाणें बोलतांच सर्वांनीं उत्तर केलें कीं, हा अभिमान सर्वांसच आहे. असें बोलून सर्वांपासून बेलभंडार घेतला जे, प्रसंगास आम्हीं मागें सरणार नाहीं.

५६. याप्रमाणें बोलुन ठरलें तो कांहींएक दिवशीं प्रसंग आला[१] हैदरखान याची छाप्याची बातमी आली ती त्रिंबकराव मामा यांनीं पटवर्धन यांस सांगितली नाही. आपलें बुणगे वगैरे लावून देऊन तयारी करून आयते वेळेस यांस सांगून पाठविलें, आणि अवघड तोंड होतें तिकडील चाकरी सांगितली. पटवर्धन यानीही परभारें बातमी आणविलीच होती पटवर्धन यांनी त्रिंबकराव मामा यांस सांगून पाठविले कीं, तुह्मीं आपलें बुणगे सारें रवाना करून आयते वेळेस आह्मांस सांगितलें, त्यास आमचे बुणगे अद्यापि गोटांतच आहे. त्यापेक्षां आतां कसें होईल तसें होऊ ! आम्ही तयार आहोत. असें सांगून पाठवून ही सारी मंडळी तयार जाहली. आणि क्रोधही सर्वांस फार, याजमुळे सर्व लढाईस उदितच होते. तों पहांटेचे प्रहर रात्रींचे सुमारास खासा हैदरखान चालोन आला. तेव्हां पटवर्धन यांची गाठ पडोन लढाई मातबर जाहली. त्यांत हैदरखान मात्र यानी जिवानिशीं सोडिला सबब तो माघारा गेला. बाकी तोफा सुमार[२] ५ व हत्ती निशाणें सारें पाडाव आलें. तों इतक्यांत सूर्योदय जाहला. लढाई शिकस्त करून सारे माघारे फिरले. हैदरखान याची एक तोफ व शंभर पायदळ तोफ रक्षण करून घेऊन जात होते ते नीलकंठराव यांनी पाहिलें, आणि बोलले की अरे, तुमचे उरावरून तोफ घेऊन जातात ! पाहता काय ! घोडीं यांजवर घालावीं ! असें म्हणून नीट तोफेवर चालून गेले. त्या लोकांनी फेर झाडली तों गोळ्या अकस्मात् नीलकंठराव यांस लागल्या व ते ठार जाहले[३]. तो फौज तेथेंच सारी थिजली. सारे भाई मंडळी घोड्यावरून उतरून जमा जाहले. तो इतक्यांत त्रिंबकराव मामा तिकडून आले आणि बोलले की, मांझा हैदरखान

---

१ या प्रसंगाची माहिती देण्यांत बखर लिहिणाराची थोडी चूक झाली आहे. तो हैदरखानाच्या छाप्याची जी हकीकत देतो ती छाप्याची नसून उलट मोतीतलावाच्या लढाईची आहे. ती लढाई ता० ७ मार्च स० १७७१ रोजी झाली व तीत हैदराचा पूर्ण पराजय झाला. हैदरखानाच्या श्रीरंगपट्टणास जाण्याच्या वाटेवर त्यास अडविण्याकरिता मामानी पटवर्धनास नेमिले होते. ती फार अवघड चाकरी होती. २ जुन्या लेखांत ‘ सुमार ’ याचा अर्थ नक्की संख्या. अजमास नव्हे। ही नक्की संख्या लिहिण्याच्या संज्ञा निरनिराळ्या होत्या. बैलांस व टोणग्यास ‘ सर. ’ हत्तीस ‘ नग ’ घोड्यास ‘ रास ’ उंटास ‘ नफर. ’ बकऱ्यास ‘ बध ’ होन रुपये वगैरे नाण्यास ‘ नक्त. ’ संख्येनें मोजता येणाऱ्या बाकीच्या सर्व पदार्थास ‘ सुमार ’ असा शब्द लावीत असत. जसे बैल सर पधरा ह्मणजे पधरा बैल फक्त. तसेच हत्ती नग १०. घोडे रास पंचवीस. उंट नफर ७. मोहरा नक्त ११. नारळ सुमार ३०. इत्यादि. माणसास ‘ असामी ’ व ‘ कस ’ हे शब्द लावीत असत त्यापैकीं ‘ असामी ’ हा शब्द प्रचारात आहेच. ‘ कुणबीण ‘ कस ’ एक ’ असे मात्र आता कोणी म्हणत नाही ! तसेच कोठीत केली, वजनी व सुमारी जिन्नस असतो त्यात सुमारी ह्मणजे संख्येने मोजावयाचा. ३ नीलकंठराव बखरींत वर्णिल्याप्रमाणें लढाईनंतरच्या क्षुल्लक चकमकींत पडले नसून ऐन लढाईत शत्रूवरच्या अगदी शेवटच्या हल्ल्यात ठार झाले. पहा ऐ. ले. स. नं. ११०० ते ११०३. ४ मी मारावयाचा.

कोठें आहे ? तेव्हां पुरुषोत्तमराव बोलले की, हैदरखानास काय करितोस ? हा तुझा × × पडला पहा ! असें म्हणतांच त्रिंबकराव मामाही घोड्यावरून उतरले आणि तेथे आले. नंतर दहन केलें.

५७. दहावे दिवशीं पिंडास कावळा शिवेना. तेव्हा नानाप्रकारची उदकें सोडिलीं. तिसरा प्रहर जाहला, परंतु कावळा शिवेना. तेव्हां त्याचे बधु कोन्हेरराव बोलले कीं, मला एक सुचलें आहे तें मी बोलतों. असे म्हणतांच पुरुषोत्तमराव दाजी बोलले कीं काय सुचलें असेल तें बोलावे. असें म्हणतांच कोन्हेरराव बोलले की, अहो नीलकठराव, आपले मनांत असेल जे, माझा भाऊ एक आहे हा घरांत पडशा खोकल्यानें बिछान्यावर मरेल, अशी काळजी आपणास लागली असेल. त्यास आपणास ठाऊक असों यावें कीं, जसे आपण हैदरखान याचे निशाणावर चालून जाऊन रणाचे ठायीं ठार जाहलां, त्याप्रमाणेंच मी कोन्हेरराव या हैदरखानाचे निशाणावर चालून जाऊन रणाचे ठायीं देह अर्पण करीन[1] ! याप्रमाणें बोलून उदक सोडतांच तत्काळ कावळा शिवला ! हे सारें फौजेनें व मानकरी वगैरे सर्व मंडळीनें पाहून सर्वांनीं आश्चर्य केलें आणि कीर्तीचीही वर्णना केली.

५८. पुढें तेरावे दिवशी त्रिंबकराव मामा समाचारास आले आणि बोलले कीं, नीलकंठराव आह्मांस टाकून वैकुंठास गेले ! असे म्हणतांच पुरुषोत्तमराव दाजी बोलले कीं, अहो त्रिंबकराव, कोणते लढाईस आमचा पुरुष पडला नाहीं अशी लढाईच नाही. दर लढाईस आमचा एक पुरुष खर्च होतो तेव्हां श्रीमंत सरंजाम चालवितात ! आह्मीं शिरे हातांत घेतलीं आहेत. आह्मीं कांहीं लेकी अथवा बहिणी[2] देऊन रोजगार मिळवून श्रीमंतांची कृपा संपादिली असा अर्थ नाहीं ! असें ह्मणतांच त्रिंबकराव मामा यानीं पदर पसरून बोलले जे, पुरुषोत्तमराव, मी चुकलों. आतां सर्वांनीं मजवर कृपा करावी. वारंवार आपण असें बोलू नये. असें ह्मणून राग शांत केला.

५९. याप्रकारें पटवर्धन यांचे पुरुष कीर्तिवान् जाहले. त्या कीर्ति साऱ्याच वर्णन, करीन ह्मटलें तर आयुष्य देखील पुरावयाचें नाहीं. त्यांतून शक्त्यनुसार वर्णन करितों. हें जाहलें वर्तमान श्रीमंतांस कळोन त्यांनीं इनामगांव रघुनाथराव नीळकंठ यांस देऊन वस्त्रें दिलीं. जशी कृपा नीळकंठराव यांजवर, त्याप्रमाणें रघुनाथराव यांजवर जाहली. याप्रमाणें कथा वडिलांनीं सांगितली ती लिहिली.

---

१ या प्रतिज्ञेप्रमाणे कोन्हेरराव सावशींच्या लढाईत हैदरखानाच्या फौजेशी लढून ठार जाहले. ती लढाई ता० ९ जानेवारी सन १७७७ रोजी झाली. २ चिमाजी आपास त्रिंबकराव मामाची बहीण दिलेली होती त्या गोष्टीस अनुलक्षून हा टोमणा ! पटवर्धन पेशव्याचे आप्त होते असे डफसाहेबानी लिहिले आहे तें चूक आहे. पेशव्यांच्या घराण्याशी पटवर्धनाचा संबध झालेला आहे तो पेशवाई गेल्यावर पुष्कळ वर्षांनी झालेला आहे.

६०. हैदरखान याचे लढाईत मेघश्यामराव बापू सांपडले ती कथा लिहितों. लढाईचे प्रसंगानंतर मेघश्यामराव बापू कांही जरूरीसाठीं घोड्यावरून उतरले यामुळे फुरसद मिळून शत्रूनें गांठिलें. तों इतक्यांत जलदी करून घोड्यावर बसले, परतु घोडी कांही केल्यानें जागा सोडीना ! नाना प्रकार केले, सोटे मारिले, परंतु जागा सोडीना ! शेवटीं पागेकडील बारगी याणीं पुठ्यावर तलवारीचे वार केले तरी घोडी जागा सोडीना ! नाहींपेक्षां मेघश्यामराव बापूप्रमाणे घोड्यावर बसणार पटवर्धन मंडळीत नाहीं ! परंतु होणार बलवत्तर ! धरले गेले ! नंतर हैदरखान यानें पिंजऱ्यात ठेविलें पुढे श्रीमंत माधवरावसाहेब यांची स्वारी जातीनिशीं आली ते समयीं लढाई होऊन शत्रूस जिंकिलें. नंतर तहाचें बोलणें आलें तेव्हां खंडणी ठरून बंदींत नरगुंदकर होते त्यांसही सोडावयाचें ठरलें. त्यांत मेघश्यामराव यांस सोडावयाचें कलम लिहिलें नाहीं. हे वर्तमान पुरुषोत्तमराव दाजीस समजलें. त्या वेळेस गोपाळराव दादा होते. दादांचे कानावर मजकूर घालताच त्यांनी श्रीमंतांकडे सांगून पाठविलें कीं सरकारचा तह होऊन खंडणी ठरविली व नरगुदकर यांस सोडावें असेंही ठरलें; आणि मेघश्यामराव यांचें कांहींच बोलणें नाहीं ! त्यास आमचे भावाचे पायांत बेड्या असोन आपणाजवळ चाकरी करण्याची आमची प्रतिष्ठा काय ? त्यास आज्ञा दिल्यास हैदरखान याजकडे जाऊन मी त्याच्या कैदेंत राहतो आणि मेघश्यामराव यांस घरास पाठवून देतों. वडिलानीं ध्यास फार घेतला आहे. असे सागतांच श्रीमंतांनीं हैदरखान याजकडील वकिलास बोलावून आणोन सांगितले जे, मेघश्यामराव यांस सोडल्यास तुमचा आमचा तह. नाहींपेक्षां बिघाड ! तेव्हां वकील यानी विनति केली जे, यादी वगैरे ठरल्यां. तेव्हां श्रीमंतांनीं आज्ञा केली जे, तें कांही असो. मेघश्यामराव यांस सोडल्याखेरीज तह नाहीं. नाहींपेक्षां आजच लढाई ! असे ह्मणताच मेघश्यामराव यास हैदरखान याणीं बहुमान करून श्रीमंतांकडे पोचतें करविलें.

६१. बापाजी यांस फारच काळजी लागली होती. नारायणराव नाना वारले, आतां बापूस कोण सोडवील ? याप्रमाणें निरंतर ध्यास. नाना वारले व बापू बंदीस, या पुत्रशोकानेंच बापाजी कैलासवासी जाहले ! बापू घरास येईपर्यंत त्यांस उभयतांचें वर्तमान अगदींच सांगितले नाही. घरीं मंगळवेढ्यास आलेवर बापाजींचे व नानांचे वर्तमान समजलें. मग त्यांनी जो शोक केला त्यास अंतपार नाही ! ते लिहितां पुरवत नाहीं. बापू बोलले जे, मी दीड वर्ष पिंजऱ्यांत होतो तेथें अंत जाहला असता तरी पुरवता, परंतु हें दुःख सोसणें कठिण !

---

१ सन १७६३ त मेघश्यामराव व नरगुदकर भावे वगैरे सरदार याची हैदराचा सरदार मीर फैझुल्लाखान याशी लढाई होऊन याचा पराजय झाला, व हे पळत सुटले आणि त्याची फौज याच्या पाठीस लागली. तो मेघश्यामराव यास शत्रूंनं वर सांगितल्याप्रमाणे अचानक गाठलें. २ ही लढाई ह्मणजे १७६४–६५ मध्यें पेशव्यांनी हैदरअल्लीवर केलेली पहिली स्वारी होय. ३ यादी ठरल्यावर आता नवीन कलम कसें घालतां येईल, असा अर्थ.

६२. मेघश्यामराव बापू याणीं मंगळवेढ्याची मामलत यावज्जीव पन्नास साठ वर्षे अंमल केला. त्यांनी प्रजापालन केलें असें राज्यांत देखील कोणीं केलें नाहीं. नांगर धरणारे यांजवर अबदागिऱ्या धरिल्या ! प्रजा रानांतच राहून झाडांस पाळणे बांधिले. याप्रमाणें निर्भय राज्य केले. अद्यापि मंगळवेढ्यांत ओव्या गातात. असे पुण्यवान् ! प्रजापालनाविशीं मानवांत उपमाच नाही.

६३. आतां बाप्पाजींचे चतुर्थ पुत्र महादेवराव[1] अण्णा तेही महापराक्रमी. ते हैदरखान याचे छाप्यांत सरकारकामास आले. तेथे तोफेचा गोळा लागून ठार झाले. त्या वेळेस परशुरामभाऊ जवळ होते. भाऊ यांची तीन घोडीं पडलीं परंतु त्यांनीं जागा सोडिली नाहीं ! त्या वेळेस भाऊस सालिना वीस हजार तैनात करून दिली पुढें महादेवराव अण्णा यांचे पुत्र दामोदर महादेव यास श्रीमंतांनी कृपा करून नांदोरें गांव इनाम करून दिला, व तैनात दीड हजार रुपये करून दिली. याप्रमाणे ते कीर्तिवान्.

६४. धाकटे बळवतरावदादा पांचवे पुत्र बाप्पाजींचे हेही पराक्रमी, घोड्यावर बसणार उत्कृष्ट. यांनीही श्रीमंताचे घरीं चाकरी करून तैनाता वगैरे मेळाविल्या.

६५. याप्रमाणे पंचपुत्र बाप्पाजींचे महापराक्रमी. कृष्णंभटबाप्पाजी पुत्रशोकानें वारले. ते त्रिवर्ग बंधु पुत्रशोकानेच वारले. कृष्णंभटबाप्पाजी व गोविंदपंत नाना व त्रिंबकपंत आप्पा या त्रिवर्गासही पुत्रशोक जाहला. त्रिवर्गाचे पुत्र केवळ भार्गवरामासारखे. पुत्र असें त्यांसच ह्मणावें. ज्या पुत्रांनी मेळविलें तें त्यांचे वशज अद्यापि खातात व पुढेंही यावत् वंश आहे तोपावेतो अचळ खातील, अशा कीर्ति करून गेले !

६६. श्रीमत माधवरावसाहेब याची प्रकृति फारच बिघडली. थेउरास श्रीगणपतीजवळ अनुष्ठान केले, परंतु महद्रोग जाहला. राजयक्ष्मा रोग होऊन श्रीमत शके १६९४ कार्तिक वद्य ८ रोज बुधवारी वारले. श्रीमंत रमाबाईसाहेब सहगमनें गेली. त्या वेळेस त्यांनीं प्रसाद सर्वांस दिला. पांच मोहरा प्रसाद पुरुषोत्तमराव दाजी यांस श्रीमंत बाईसाहेब यांनीं दिल्या. तें दाजीनी स्वदस्तूरचे लिहून ठेविलें आहे.

६७. पुढें श्रीमंत नारायणरावसाहेब राज्याधिकारी, परंतु श्रीमंत दादासाहेब कारभारांत पुढें जाहले[2]. श्रीमत रावसाहेब यांचे वेळेस जे बंदींत होते ते सारेच पुढें सरले. सखारामपंतबापू हे दिवाण श्रीमंत रावसाहेब यांचे वेळेस बंदींत होते ते श्रीमंत दादासाहेब यांच्या लक्षानें वागणार. याप्रमाणे सारी सृष्टि नवी जाहली. श्रीमंत नारायण-

---

१ छाप्यात माधवरावास तोफेचा गोळा गुडघ्यावर लागून त्याच्या चिधड्या झाल्या. त्याच दुखण्यानें ते काही दिवसानी शिरे येथे वारले. त्याविषयी ऐ. ले स. न. ९५५ पहा व या छाप्याचे वर्णनाविषयी नं. ९०९ व ९१५ पहा. २ नारायणरावसाहेबास फक्त मुजऱ्याचे धनी करून दादासाहेब स्वतःच कारभार करू लागले असे येथें लिहिले आहे. पण यास ऐ. ले. संग्रहात अगर अन्यत्र आधार नाही.

रावसाहेब मुजऱ्याचे मात्र धनी सारा कारभार श्रीमंत दादासाहेब करीत. याप्रमाणें नऊ महिने सुरक्षित गेले. श्रीमंत रावसाहेब यांनी सांगितलेंच होतें कीं, याचे कपाळीं राज्य नाहीं; तोच समय प्राप्त जाहला. पुढें श्रीमंत दादासाहेब यांची कन्या दुर्गाबाई हिचें लग्न जाहलें.

६८. श्रीमंत नारायणरावसाहेब हूड होते. कारभारी यांचा बहुमान रक्षीत नसत. एके दिवशीं पर्वतीस स्वारी गेली तेथें सारे बोथाट्या खेळत होते. याप्रमाणें खेळ खेळत असतां श्रीमंतांनीं नाना फडणीस यांचे पागोटें बोथाटीनें पाडिलें, आणि हंसूं लागले जे, नाना, तुमचे पागोटें खालीं पडले. तेव्हां नानांनीं उत्तर केलें कीं, मी कारकूनच आहें. माझें पागोटें पडलें हें कांहीं आश्चर्य नाहीं. स्वामीनीं आपलें पागोटें संभाळावें ! असें उत्तर केलें. परंतु नानांनीं सूचना केली हे कांहीं समजले नाहीं ! सूचना कोणती तर, कांही सखारामबापूसीं श्रीमंत दादासाहेब यांचे खलबत जाहलें, त्यांत श्रीमंत नारायणरावसाहेब यांस कैद करावें असें ठरलें. ती सूचना नानांनीं श्रीमंतांस या प्रकारें केली, परंतु त्यांच्या समजुतींत आली नाहीं. श्रीमंतांजवळ हरिपंत फडकेही होते, परंतु केवळ राजकारणांत पडत नव्हते. श्रीमंत रावसाहेब यानी एकांतीं श्रीमंत नारायणरावसाहेब यांस सांगितलें होतें जे, काय करणें ते हरिपत याचे विचारे करीत जा, तर कांहीं दिवस वांचशील नाहींपेक्षां तुझ्या जिवास कठिण आहे; असा बहुत बोध केला होता. कांहीं कांहीं विचारीत. कोणती गोष्ट पोटांतही फारशी रहात नव्हती, यामुळें हरिपंत फारशी लगट करीत नव्हते.

६९. तों फितूर जाहला जे, यांस कैद करावें. त्यास सुमेरसिग गाडदी व खरकसिंग गाडदी हे उभयतां पांच हजार गाड्यांचे जमातदार, त्यांस सांगितले जे, श्रीमंत नारायणरावसाहेब यांस तुह्मी धरावें; म्हणजे तुह्मांस बक्षीस गांव इनाम वगैरे मिळतील. त्यांनीं उत्तर केलें कीं, आह्मांस दस्तऐवज करून दिला तर आह्मी हा उद्योग करूं. असें म्हणतांच श्रीमंत रघुनाथराव दादासाहेब यांनीं दस्तऐवज करून दिला जे, नारायणराव यांस धरावें, नंतर तुम्हांस अमुक बक्षीस देऊं. असे नानाप्रकारें लिहून दिले. तो आनंदीबाई रघुनाथरावदादा यांची पत्नी, तिनें गाड्यास बोलावून सांगितले जे, तुम्हांस धरावें असें लिहून दिलें; त्यास धरिलें असतां पुढें कांहीं लोक तिकडे, कांहीं इकडे, असें होऊन राजकारण उभें राहील. त्यास मारून टाकावे हेच बरे, म्हणजे एकछत्री जाहलें ! असेंच करावें. नंतर गाडदी यांनीं उत्तर केलें कीं, आपण 'धरावें' असे लिहून दिलें आणि मारावें कसें ? तेव्हां आनंदीबाईनीं सांगितले कीं, तुम्हांस मारावें असे लिहून देते. तुमचा कागद कोठें आहे तो आणवावा. नंतर त्यांनीं कागद आणून दिला; तेथें 'धरावा' जें होतें तें तेथेंच 'मारावा' असें करून दिलें. 'ध' चा 'मा' केला. नंतर सारा मजकूर ठीकच होता !

७०. याप्रमाणें बंदोबस्त करून जे दिवशी मारावयाचे, तेच दिवशीं श्रीमंत गांवांतच

१. ती मोरोपत कवीचे आश्रयदाते पाडुरगराव बारामतीकर यास दिली.

पुणे मुक्कामी सासुरवाडी होती तेथें भोजनास सहकुटुंब गेले होते. इकडे वाड्यांत नाकेबंदी होऊन तलब चढली ह्मणोन गाडदी जमा जाहले. श्रीमंत सासुरवाडीस भोजन करून विडे घेतात तो कोणी सूचना केली की, आपण वाड्यांत जाऊं नये. कांहीं दंगा फितूर आहे, त्यास कृपा करून वाड्यांत जावयाचें करू नये. तेव्हां त्याजवर रागे भरले आणि तसेच पालखींत बसोन वाड्यांत आले. आणि तिसरे मजल्यावर खबूतरखाना होता तेथें अम्मळ उभे राहिले. तो उभयतां गाडदी तेथे आले आणि विनंति केली कीं, महाराज ! आमची तलब चढली याची वाट काय ? आमचा रोजमुरा फडशा करून द्यावा. श्रीमंतांनीं आज्ञा केली कीं, तिसरे प्रहरी कचेरीस विनंति करावी. नंतर काय जी आज्ञा व्हावयाची ती होईल. गाडदी यानी उत्तर केले की, आह्मांस कचेरीची काय गरज ! आपण धनी. आपण फडशा करावा. तो श्रीमंत तेथून खालीं येऊं लागले. तों जिना उतरतानाच गाडदी यांनी लगट केली की, आह्मास येथें ऐवज द्यावा; नाहीपेक्षां आह्मी उतरूं देणार नाहीं. तो इच्छारामपंत ढेरे ह्मणून कारकून होते ते गाडद्यांस रागें भरले जे, असा दंगा केल्याने ऐवज मिळतो की काय ! असें उचलून बोलतांच त्यांनी तलवारी ओढून इच्छारामपंतास ठार मारिलें. तो श्रीमंत जिना उतरून खालीं आले. तों खालीं चौकात पूजेच्या गाई दोन बांधिल्या होत्या त्या गारद्यांच्या नागव्या तरवारी पाहून बुजाल्या आणि दावीं तोडून गारद्याच्या अंगावर आल्या. तो तेथें फुरसद सांपडली. नाही तर तेथेंच श्रीमंतांस मारावें असें होते. गाई आडव्या येतांच गाडद्यांनीं तलवारीनें गाई ठार मारिल्या ! तों श्रीमंत पार्वतीबाईचे खोलीत गेले, आणि सांगितलें की, काकी, मला गाडदी मारितात ! तेव्हां पार्वतीबाई बोलली कीं, मी तुला लपवितें. तूं कांहीं भिऊ नको. आणि तुला मी पारही करितें. असें ह्मणाली. तों श्रीमंतानीं उत्तर केले की, मी दादासाहेब यांजकडे जातों. असे ह्मणून तेथून निघाले. तों गाडदी यांनी गांठिले तों तेथें कुणबीण होती ती आडवी जाहली. तिलाही ठार केली. गारद्यांस खून चढला. तों दादासाहेबांजवळ श्रीमंत जाऊन कमरेस मिठी घालून बोलले कीं मला मारू नका. किल्ल्यावर कैद करून पीठमीठ लावून ठेवा ! मारूं नका ! असें दीन वचन बोलले तेव्हां दादासाहेबांस दया आली. तो गाडदीही तेथे आले आणि बोलले कीं, आतां आह्मी यास जिवंत सोडणार नाही. हा वांचल्यास आमचीं राडापोरें ढाणकास वांटील ! सर्पास दुखवून सोडितों कीं काय ? असे ह्मणतांच दादासाहेब ह्मणाले कीं, अरे, बाळास मारूं नका ! असें ह्मणून हात पुढे केला. तो आंत खोलीत तेथेंच आनंदीबाई होती तेथून दादासाहेब यांस ह्मणाली कीं, ' आतां कांकणे हातांत घाल !' असें

१ कृष्णाजी हरि साठे याचे घरी. श्रीमताचे श्वशुर यापूर्वीच वारले होते. सासू नाई साठी जिवंत होती. तिचा मुलगा महिपतराव साठे हा या वेळी लहान होता. २ पगार. विशेषेंकरून आरबाचा पगार. तलब चढली = पगाराची बाकी तुबली. ३ म्यानातून उपसून.

ह्मणून गाडद्यांस सांगितलें कीं, उभयतांस मारून टाका!!! तों गाडद्यांनीं एक वार टाकिला तो दादासाहेब यांचे हातास लागला. तों तुळ्या पवार आनंदीबाईचा खिसमतगार होता त्यानें श्रीमंतांचे पायास धरून दादासाहेब यांचे कमरेपासून ओढिलें. तों चाफाजी टिळेकर श्रीमंत माधवरावसाहेब यांचा खिसमतगार तसाच श्रीमंतांवर पडला. तों गाडदी यांची तलवार चालली तेथें कांहीं बाकी राहिली नाही! उभयतांचे तुकडे एके ठिकाणीं जाहले. श्रीमंत साखरभात भोजन करून गेले तो पोटांतून तसाच पडला! हें कृत्य रघुनाथरावदादा यांचेसमोर जाहलें. गर्दी जाहली तो दिवस शके १६९५ भाद्रपद शुद्ध चतुर्दशी. याप्रमाणे जी गोष्ट न व्हावयाची तीं झाली.

७१. नंतर गाडदी याणी वाड्यावरून रघुनाथराव यांची द्वाही फिरवून 'दीन्'[1] गाजविला. तों श्रीमंत गंगाबाईसाहेब पालखींत बसून वाड्यांत आली. तों बाहेर हांक जाहली कीं, गाडदी वाड्यात शिरून गाडद्यांनी दंगा केला. असें ह्मणतांच हुजरातीचे लोक व पागे तमाम फौजा तयार होऊन आल्या. गाडदी यांनीं दिल्ली दरवाजा लाविला. पानसे यांनीं तोफखान्यातून तोफा ओढून आणून ह्मणाले जे, वाड्यास तोफा लावून वाडा उडवून देतों! गाडदी यांनीं वरून सांगितले जे, जी व्हावयाची ती गोष्ट सरकारहुकुमावरून पार जाहली. आतां तुह्मी आक्रोश कां करतां? आतां सरकारच्या पायापाशींच लक्ष ठेवा!

७२. याप्रमाणें वरून बोलतात तो त्रिंबकरावमामा हातांत भाला आणि घोड्यावर बसोन आले, आणि बोलले कीं काय पहातां! ××××× ना तोफेचे तोंडीं द्या! असें बोलतांच गाडद्यांनीं वरून मामास मुजरा करून बोलले कीं, मामासाहेब, आपण पुढें येऊं नये. आलां असतां गोळी घालूं! आपण सडे आंत यावे. असें ह्मणतांच घोड्यावरून उतरून पाय उतारा दिंडींतून मामा आंत गेले. ते रघुनाथरावदादाजवळ गेले तों मारलेले मुडदे गाशांत गुंडाळून आंत खोलींत ठेविले होते. तों रघुनाथरावदादा बोलले कीं, मामा, माझ्या कपाळास ही गोष्ट आली! आपण आंत जाऊन पहावें. त्रिंबकरावमामा यांचे मनांत नारायणराव जखमी असतील, असें वाटून आंत जाऊन पहातात तों फक्त मांस पाहिलें! नंतर तसेच बाहेर येऊन रागानें रघुनाथरावदादा यांचे तोंडापुढें हात नेऊन बोलले कीं, श्रीमंत बाजीरावसाहेब यांचे पोटी पोरगी जन्मास

---

१ 'दिन् दिन्' अशी गर्जना केली. गर्दीच्या वेळी शनिवारच्या वाड्यात सारे सात आठशें गारदी शिरले होते. त्यांत थोडे रजपूत व शिख असून बाकीचे मुसलमान होते. त्यांचे प्रमुख जमादार तिघे होते. त्यांत सुमेरसिग व खरगसिग हे रजपूत व महमद इसफ हा मुसलमान. या गारद्यांत स्वदेशी माणूस–हिंदु अगर मुसलमान–एकही नव्हतें! सारे परदेशीच होते. पुणें मुक्कामी पेशव्यांची स्वारी असे, तेव्हांचा बंदोबस्त ह्मटला तर वर सांगितलेले हे गारदी व पुण्याच्या आसपास वैरणीची सोय पाहून ठेवलेल्या हुजुरपागा व शहरात थोडेसे हुजरातींचे मानकरी व काही तोफखान्याचे लोक अशी सारी फौज तीन हजारपर्यंत असे. याशिवाय कोतवालीकडचे लोक बारमहाचे ते निराळे.

आला असतास तर एक्या ब्राह्मणाचे घर उभें राहतें ! हें काय केलेस ! ! ! असे म्हणतांच दादासाहेब कपाळास हात लावून उगेच राहिले. आणि मामास ह्मणाले कीं आतां पुढें याचे दहनाचा विचार करावा. मामा बोलले की, अरे, दहन कशाचें करितोस ? मलाही मारून टाक ह्मणजे झालें ! तुझ्या घरीं ब्राह्मण कोण येतो ? दहन कोण करितो ? असें अनेक प्रकारें बोलले. रघुनाथरावदादा परम पुण्यवान्, स्नानसंध्याशील, परतु स्त्रीचे योगेंकरून अनर्थास पावून अपेश माथां घेतलें. पूर्वीही राज्यनाशास कारण स्त्रीच. तसेंच आतांही जाहले.

७३. तों प्रहररात्र जाहली. ब्राह्मण कोणी मिळेनात. परतु प्रयत्नानें तेलंग ब्राह्मण दोन असामी मिळाले. नतर मशाल लावून ते तुकडे[1] निवडिले. शूद्राचे एकीकडे काढून हे तुकडे ब्राह्मणांजवळ दिले. तों गाडदी कांहीं दरवाजा उघडीनात ! नतर दिंडीतून प्रेत बाहेर काढिले. तों श्रीमत गगाबाईसाहेब यांनी आग्रह केला कीं, मी सहगमन जाणार. होणार बलवत्तर ! श्रीमंतांचा उदयकाळ होऊन सर्वांचीं पारिपत्यें करून प्रजेस सुख द्यावयाचे होतें, यामुळें अकस्मात् आनंदीबाईचे मुखांतून आलें जे, जातीस कोठें ? तुझी पाळी चुकली आहे ! तेव्हांच वाग्देवता ‘ तथास्तु ’ ह्मणाली ! याप्रमाणें मागें वर्तमान जाहलें. नंतर प्रेत बाहेर काढून अग्निसंस्कार त्रिंबकरावमामानीं करविला. तो संस्कार त्रिंबकरावमामानीं ह्मणून करविला ! नंतर मध्यरात्रीचे सुमारास पागे पतके सारे निराश होऊन माघारे आले. पानसे यांनींही तोफखाना माघारा नेला. एक गाडदी खेरीजकरून बाकी सारी फाज अगदीं दिलगीर जाहली. सर्वांचे मनांतून जे, रघुनाथराव यांचे पाय भुईस न लागत येविशी प्रयत्न करावा.

७४ पुढें दुसरे दिवशीं गावांतील शिष्ट ब्राह्मण बोलावून विचार आरंभिला जे, कांहीं प्रायश्चित्त करावें, ह्मणून जमा करून रामशास्त्री यांस बोलावून आणिलें. तों हें वर्तमान होतांच शास्त्रीबावा यांनीं आपलीं मुलें माणसे माहुलीस रवाना करून आपण हातांत पंचपात्र घेऊन सोवळ्यानीं वाड्यांत आले. तों रघुनाथरावदादा कचेरीस बसले आहेत. तों शास्त्रीबावा येतांच श्रीमंतानीं नमस्कार केला. तेव्हां शास्त्री बोलले कीं, नमस्कार न करणें. तुह्मास अशौच आहे. असें बोलतांच वरकड पंडित ह्मणाले की, शास्त्रीबावा, आपणास यजमान यांनीं बोलाविले जे, गाडदी यांचे हातून हें कर्म जाहले; परतु शब्ददोष श्रीमंतांवर आला, त्यास कांहीं प्रायश्चित्त करावें; यामुळे आपणास बोलाविलें. तेव्हां शास्त्रीबावा ह्मणाले कीं, प्रायश्चित्त कशाचें करतां व कोणास देतां ? ब्रह्महत्या, गोहत्या, स्त्रीहत्या, बालहत्या जेथें जाहल्या तेथें कोणते प्रायश्चित्त पुस्तकांत लिहिलें आहे ? एक प्रायश्चित्त.

---

१ नारायणरावसाहेबाच्या खुनासबधे ऐ. ले. सग्रहात नं १२५७ वगैरे पत्रे आहेत त्यातील मजकुराशी वर आलेला बखरीतील मजकूर ताडून पहातां यात पुष्कळच अधिक तपशील दिला आहे हे दिसून येईल. इतकी एकत्र तपशीलवार हकीकत आजपर्यंत कोठेंही छापिलेली नाही.

यांस देहांत प्रायश्चित्त करावें ! शिसें तापवून प्राशन करावे, किंवा दर्भाचें गृह करून आंत बसावे आणि अग्निसंस्कार करावा. यांतून वांचल्यास पुढे प्रायश्चित्त करावें. असे ह्मणताच सारे पंडित बोलले जे, शास्त्रीबावा, आपण असें काय म्हणून बोलतां ? हे बोलले कीं, मला यांचे राज्यांत काहीं रहावयाचें नाहीं तुम्हांस रहावयाचे असेल म्हणून तुम्ही ग्रथा-खेरीज भाषण करतां ! मी मुलें माणसे रवाना करून सोवळ्यानींच आलों. मी असाच निघणार. कालपासोन जलस्पर्श देखील नाही केला ! मी जीवित्वास उदार जाहलों. मर्जी असल्यास आणखी एक ब्रह्महत्या करावी ! याप्रमाणे शास्त्रीबावा बोलतांच कोणी एक बोलेनासें जहाले. शास्त्रीबावा तसेच निघून माहुलीस आले, नतर अन्नव्यवहार केला ! मागें कांही प्रायश्चित्त केले नाही[1].

७५ पुढे रघुनाथरावदादा यांजकडोन हे अकर्म जाहले याजमुळे सखारामबापू यांचे मनांत आले जे, यास राज्यापासोन बहिष्कृत करावें, असे आलें. त्यांत त्रिंबकराव-मामा व नाना फडणीस व हरिपंततात्या फडके या त्रिवर्गाचे मत एक होऊन सखाराम-बापू यांचा मनसुबा घ्यावा, त्यांस कसें करावें हे विचारावे, असे त्रिवर्गानीं ठरविले. त्यांचा भरंवसा कोणास लागेना ! मग हरिपंततात्या यांनी त्यांजकडे जाऊन त्यांचाही मनसुबा घेतला सरदार मडळी मालोजी राजे वगैरे सारे एकवटले असे बारा असामी एक जाहले. त्यांस बारभाई ह्मणो लागले आणि मनसुबा केला कीं, श्रीमंत गंगाबाईसाहेब गर्भि-णी आहेत. कशावरून ? जे समयीं सहगमन जातें म्हणाली ते समयीं आनदीबाई बोलली जे, ‘ तुझी पाळी चुकली, त्यास कोठे जातीस ? ’ असे म्हणाली. तर हाच मनसुबा बळा-वून पुरंदरास तिजला कैदेंत ह्मणोन ठेवावी आणि रघुनाथरावदादा यांस स्वारीस ह्मणोन बाहेर काढावें. गर्भिणीस महिना दोन महिने खास जाहले असें समजल्यास नंतर त्यासा-रखें इकडे फौजेचा वगैरे मनसोबा बळावून उलट रघुनाथरावदादा यांचे पाठीशीं लागावें. याप्रमाणे सर्वांनीं एक विचार करून बेलभंडार जाहले. जर अतर देऊं तर काशींत × × × × × अशा शपथा केल्या व सारे अनुकूल याप्रमाणेंच केलें.

७६. तों एक महिना जाहला. श्रीमंत गगाबाईसाहेब गर्भिणी असें समजलेवर आनंदीबाईनीं मारेकरी घालून मारावी असा मनसुबा करून शेतखान्यांत मारेकरी घातले. कुणबीण तांब्या ठेवावयास गेली तों आंत हत्यारबंद पाहून तिनें शंख केला. तो बोभाट जाहला. मारेकरी धरिले. त्यांचीं लटकींच पारिपत्यें केलीं. हें वर्तमान कारभारी यांस समज-ल्यावर फारच मनसुब्याची जलदी केली आणि सखारामपंतबापू यांनीं रघुनाथरावदादा यांस सांगितले जे, आतां आपला अंमल बसला. परंतु आपण येथेंच राहिले असतां परराज्यांत जरब बसणार नाहीं. त्यास बाहेर स्वारीस निघावें. अगोदर श्रीमंत गंगाबाईसाहेब यांस

१ रामशास्त्री निघून गेल्यावर श्रीमंतानी काही प्रायश्चित्त घेतलें नाही.

कैद करावें. यांस येथे ठेविलें किंवा बरोबर स्वारींत घेतले असतां हें फंदासच कारण. त्यास किल्ल्यावर पुरंदरास कैद करावे. तमाम सरदारांस पत्रे पाठवून सरदार आणवावे. अशी मसलत बळावून सुमुहूर्ते स्वारीस डेऱ्यांत आणिले. श्रीमंत गंगाबाईसाहेब यांस पुरंदरास किल्ल्यावर कैद केल्यादाखल ठेविली[1]. तमाम सरदारांस पत्रें गेलीं.

७७. पटवर्धन यांसही पत्रें आलीं. पटवर्धन पुण्यास कांहीं नव्हते. घरीं होते. वामनरावबाबा व परशुरामभाऊ व रघुनाथरावदादा या त्रिवर्ग सरदारांस पत्रें आलीं. सारे सरदार तासगावाजवळ रामापूर कमळापूर म्हणोन गावें आहेत तेथें जमा जाहले. त्या वेळेस पुरुषोत्तमरावदाजी मंगळवेढ्यास घरी होते. पटवर्धन यांस काळजी लागली जे, रघुनाथरावदादा यांचा आह्मावर अत्यंत राग. त्यांनी प्रत्यक्ष पुतण्यास गाड्याकडून मारविले तेथे आमची कथा काय ? पुढे विचार ठीक दिसत नाहीं ! सर्वांनीं ठरविलें जे, पुरुषोत्तमरावदाजीस आणविलेखेरीज परिणाम नाहीं ! याप्रमाणे ठरविलेनतर परशुरामभाऊ यांची मातुश्री जानकीबाई यांचे नांवें पत्र पाठवून जासूद रवाना केले.

७८. जासूद मंगळवेढ्यास आले व पत्रें येतांच भुजंगभट जोशी मंगळवेढेकर यांजकडून मुहूर्त काढून दाजी रातोरात निघाले ते तासगांवास आले. तेथे बाईची भेट घेतली. तों बाई बोलली कीं, अरे दाजी, भाऊ रामापूर कमळापुरावर उतरून आठ रोज जाहले. तूं कोठें होतास ? तुला समजले कीं नाहीं ? तेव्हां दाजींनी उत्तर केले की, बाई, दूधभात खाण्यास भाऊ आणि मरावयाचे वेळेस मात्र दाजीची आठवण तुला जाहली ! असें ह्मणतांच बाईनीं पदर पसरला आणि बोलली कीं, या वेळेस तूं भलतेंच बोलूं नको ! असे म्हणण्याचे कारण, एकदां तासगांवास असतांना भोजनास सारी मंडळी बसली त्यांत बाईनीं दूध आणोन भाऊस मात्र वाढिलें, दाजीस कांहीं वाढिले नाही. असें होतांच मुकाट्यानेच दुसरे दिवशी निरोप घेऊन दाजी घरास गेले. नंतर प्रसंग आला ह्मणून हें उत्तर केलें !

७९. नंतर बाई ह्मणाली की, तूं लष्करांत जा. तेव्हा दाजी बोलले कीं मी जात नाही. भाऊ जोंपर्यंत लहान होता तोंपर्यंत तूं जें सांगितलेस तें मीं केलें. आतां त्याचें त्यास कळों लागलें. असे म्हणतांच बाईनीं वडिलांची शपथ घातली जे, तूं अक्षर देखील बोलूं नको. मी सांगतें त्याप्रमाणें ऐक. तेव्हां यांनीं उत्तर केलें जे, बाई, तुझी आज्ञा प्रमाण; परंतु मला समागमे घ्यावयाचें असल्यास मी जें करीन तें त्रिवर्गांनीं मान्य केल्यास बरें. नाहींपेक्षां पाणी प्यावयास देखील रहाणार नाहीं ! याप्रमाणें बोलतांच बाईनी सांगितलें कीं मी येऊन त्रिवर्गासही ताकीद करितें. असें ह्मणोन बाई पालखींत बसून दाजीस घेऊन लष्करांत आली. आणि त्रिवर्गास बोलावून सांगितले कीं, मीं दाजीस आणिलें आहे.

---

१ वस्तुतः रघुनाथरावानी गंगाबाईस पुरंदर किल्ल्यावर कैदेंत ठेविले नाही. कारभाऱ्यानी रघुनाथराव कर्नाटकात गेल्यावर तिला तेथें नेलें. २ रामचंद्र हरीची.

त्यास तुह्मांस वांचण्याचें असल्यास जें दाजी सांगेल त्याप्रमाणें ऐकावें. न ऐकल्यास तो घरास निघून जाईल. याप्रमाणे सांगतांच त्रिवर्गानीं सांगितलें कीं, जे दाजी करितील तें आह्मांस प्रमाण. ते जितके पाणी प्यावयास सांगतील तितकेंच पाणी पिऊं ! याप्रमाणें बाईचे पायावर त्रिवर्गानीं हात ठेविले.

८०. नंतर त्या स्वारीस पुरुषोत्तमराव दाजी यांनीं जी मेहेनत केली ते उपकार परशुरामभाऊ स्मरत जे, आह्मी आमचे अंगाचें कातडें काढून जोडे करून दाजीचे मुलाचे पायांत घातले तरी दाजींचे उपकार फिटावयाचे नाहींत ! याप्रमाणें बोलत हें सर्वांस माहीत आहे.

८१. पटवर्धन पुण्यास गेलेनतर अलीकडे दोन कोश उतरून पुरुषोत्तमराव दाजी अगोदर पुढें पुण्यांत शहरांत गेले जाऊन प्रथम मोरोबादादा फडणीस यांची गांठ घेतली. त्या वेळेस मोरोबादादा दरबारच्या कामांत वागत होते नंतर त्यांचेच द्वारानें पटवर्धन आले असें रघुनाथरावदादाचे कानावर घालून नंतर भेट घेतली. भेटी जाहलेवर रघुनाथरावदादासाहेब यांचें म्हणणें पडलें कीं, पटवर्धन यांजपासून बेलभंडार घेऊन नतर चाकरीस समागमें न्यावे. असें बोलणें घातले. पटवर्धन त्रिवर्ग सरदार यांनी सागितले कीं, आम्हांस काय ते वडील पुरुषोत्तमरावदाजी. त्यास सरकारची आज्ञा जी काय होणें ती दाजीस व्हावी. दाजी जे करितील त्यांत आम्ही आहों. असें सांगितले. नंतर नित्य कचेरीस जाणें ते दाजीच जात होते. आठ पंधरा दिवशीं त्रिवर्ग सरदार जात. दाजी गेले म्हणजे श्रीमंत नित्य तबकांत बेलभंडार आणोन ठेवीत. तेव्हां दाजीनीं विनंति केली कीं, महाराज, आम्हांस बेलभंडार कशास पाहिजे ! आम्ही नवीन चाकरीस रहावयास आलों की काय ? असें म्हणतांच रघुनाथरावदादासाहेब म्हणाले जे, सर्वांपासून आम्हीं बेलभंडार घेतला; त्यास तुह्मींही देणें. याप्रमाणे प्रत्यही चालत होतें. एके दिवशीं फारच आग्रह पडला. पुरुषोत्तमरावदाजी यांनीं मनांत विचार केला जे, श्रीमंत नानासाहेब यांचा जो वंश तो आह्मांस पूज्य. सर्व धनी ते. यांनीं त्यांचे वंशासीं अनुचित गोष्ट केली त्यापेक्षां यांसीं आह्मांस बदमामली अवश्य करावयाची ! श्रीमंत नानासाहेब यांचे वंशासीं मात्र करावयाची नाहीं. असें मनांत आणोन उच्चार केला कीं, "आम्ही पहिलेपासोन सरकारचे चाकर. सरकारचे पायासीं अंतर करणार नाहीं. एकनिष्ठपणें वर्तणूक करूं." याप्रमाणें बोलून बेलभंडार उचलून दिला.[1]

८२. नंतर[2] स्वारी पुण्याहून बाहेर निघाली. प्रथम हिंदुस्थानचे रोखें स्वारी निघाली. एके दिवशीं स्वारींत रघुनाथरावदादासाहेब यांनीं विचारिलें जे, अहो पुरुषोत्तमराव, परशुरामपंतभाऊ यांचे डोळे लाल दिसतात. त्यास ते भांग ओढीत असतात कीं काय ?

---

१ पण सरकार कोण याचा उलगडा मोघमच ठेविला ! २ वस्तुतः सारे पटवर्धन भेटण्याआधींच दादासाहेब पुण्याहून निघाले होते.

तेव्हां दाजीनीं विनंति केली कीं, महाराज, डोळे लाल दिसतात खरे. भांग ओढतात किंवा नाहीं हें कांहीं समजलें नाहीं. त्यांत पूर्ववय. बारमहा हत्याराखेरीज रहात नाहींत. लष्करांत जाहलें तरी भलत्यावरच कारणावांचून तलवार उपसतात, असा अविचारही थोडाबहुत आहे. असें सांगतांच दादासाहेब यांनीं आज्ञा केली कीं, त्यांस दरबारांत आणीत न जाणें. दाजीनीं उत्तर केले कीं, महाराज, मी हीच विनंति करणार होतों. आज्ञा जाहली बरी जाहली ! असें म्हणून आपल्या गोटांत आले आणि परशुरामभाऊस सांगितलें की, तुला[1] आज रघुनाथरावदादासाहेब यांनी भांग ओढतात काय म्हणोन विचारिलें. मीं सांगितलें, ओढीत असतील ! त्यांचा भरंवसा नाहीं. नंतर आज्ञा जाहली कीं त्यांस दरबारास न आणणें. असे सांगतांच भाऊनी सांगितलें जे, बरे जाहले ! आम्हांस तो दरबार नको ! याप्रमाणे बोलले.

८३. एके दिवशीं आनदीबाईजवळ चार दुष्ट मिळोन मसलत दिली कीं, पटवर्धन यांचा विश्वास धरितां नये. त्यांस हरतऱ्हा करून दगा करावा प्रथम पुरुषोत्तमराव यास मारावे. नंतर मग साऱ्यांचे कांही कठिण नाही ! पुरुषोत्तमराव हे फार सावध, यांस दगा करावा. असें सांगून दादासाहेब यासही मजकूर सागून मसलत सिद्ध करविली. भोजनास बोलावून विषप्रयोग करावा तो पटवर्धन याणी त्याचा बंदोबस्त पूर्वींच केला होता जे, "आम्हीं कोंकणांत कुलदेवतेस जाण्याचा नवस केला होता तो सरकारचे पत्र आल्यावरून आलों. त्यास एक अडत केली आहे जे, दर्शन घेतल्याखेरीज कोठे भोजनास जावयाचें नाही, याप्रमाणे बोललो आहो." असे म्हणून भोजनास जाण्याचा बंदोबस्त प्रथमच पुढील अंदेश मनांत आणून हे बोलून ठेविलें. त्यास भोजनास बोलवावयाचें राहिले.

८४. पुरुषोत्तमरावदाजी यांचा नेम सरकारचे विडे जरी आले तरी ते आपले गोटास आणोन पुरून टाकावे, याप्रमाणें प्रत्यहीं नेम. एखादे वेळेस विडा खावा अशी त्याणीं आज्ञा केली तरी दाजीनीं विनति करावयाची जे, महाराज, आमचा सांप्रदाय सरकारचें काय जें येईल तें सर्वांस दिल्याखेरीज आह्मांस खातां नये, याप्रमाणें रामचंद्रपंत आप्पा यांजपासून चाल आहे. आमचे मानकरी आहेत त्यांस दिल्याखेरीज आम्हांस खातां नये. खाल्लें असें त्यांस समजल्यास ते प्रसंगास दगा करितील, यामुळें त्यांची मर्जी रक्षण करणें प्राप्त ! असें सांगून तेथें विडे खाण्याचा बंदोबस्त केला.

८५. एके दिवशीं मकरसंक्रमण आलें. ते दिवशीं तीळगुळाचा समारंभ जाहला. सर्वांनीं सरकारांस तिलशर्करा दिली. पुरुषोत्तमराव दाजी आनंदीबाईकडे तिलशर्करा द्यावयास गेले तों आनंदीबाई बोलल्या जे, या पुरुषोत्तमराव; असें म्हणून बसावयास पाट दिला. याणीं नमस्कार करून तिलशर्करा दिली. नंतर त्यांनीं रुप्याचे तबकांत तिलशर्करा—सोनेरी वर्ख

१ तुजविषयी.

लावलेली व केशरी असा नानाप्रकारचा हलवा—त्याचें तबक भरून आणून आपले हातानें तबक उचलले तो दाजीनीं शेला पुढें पसरला. तो तबक शेल्यांत सारें ओतिले; आणि बोलल्या कीं तिलशर्करा घेणे. नतर याणी विड्याप्रमाणेच विनंति केली आणि आपले लष्करांत तिलशर्करा घेऊन आले, आणि सर्वांस सांगितलें जे, सरकारची तिलशर्करा आली ही भक्षण करतां कीं काय ? चांगली आहे, सोनेरी वर्ख लाविले आहेत, ज्यास मरावयाचें असेल त्यानें खावी ! असे ह्मणून कुत्रीं लष्करांत होतीं त्यांस आणून त्यांजपुढे टाकिली. त्यांनीं खातांच तत्काळ गरगर फिरून लागलीच मेली; हें सर्वांनीं पाहिलें. नंतर सर्वांची खातरजमा जाहली जे, दाजी सांगतात ते खरें !

८६. एके दिवशीं दरबारास दाजी गेले तों अस्तमान जाहला तेव्हां आनंदीबाईनीं सांगितलें की, पुरुषोत्तमराव, आज येथेंच संध्या करणे. यांनी ‘ आज्ञा ’ ह्मणाले. तों सूचनेप्रमाणे शिप्यानें संध्येस मांडिले. पाय धुवावयास पाणी दिले. हे पाय धुवून आले तों समईजवळ येऊन पाट माडून आनंदीबाई आपण जवळ बसली. तो यानीं विनंति केली की महाराज, माझे डोळ्यास आजार आहे. डोळे फार दुखतात, त्यास दिवा अगदीं सोसत नाहीं, यामुळे समई जवळ कामाची नाहीं. असे सांगून भाडीं आपणच घेऊन समईपासून लांब गेले आणि तेथें जाऊन तोंडांत पाणी न घेतां ताह्मन मात्र भरले, आणि पळी संध्येची वाजविली ! याप्रमाणे संध्या करून निरोप घेऊन लष्करांत आले; आणि सांगितलें कीं आज बाईसाहेबांनीं संध्येस ठेऊन घेतलें. संध्या[1] करून आलो. सर्वांनीं विचारिलें कीं, आचमनाचें कसे केले ? नंतर वर्तमान जाहलें तें सारे सांगितले. याप्रमाणें बाईसाहेब हरइलाज करीत, परंतु याजवर ईश्वराची कृपा, आणि श्रीमंतांचे पायासीं निष्ठा, ह्मणून सारी विघ्नें टळत.

८७. एके दिवशी रात्रीं सरकारचें बोलावणे आलें तो पुरुषोत्तमराव दाजी निघाले. सरकारचे लष्करानजीक[2] आले, आणि शोध केला जे, श्रीमत कोठे आहेत ? तों बातमी लागली जे, एक्या राहुटींत श्रीमंत दादासाहेब व मुराररराव घोरपडे उभयतां खलबत करीत बसले आहेत; आणि शोध करविला तों लष्करांत हत्ती पांच चार तयार करून वर महात बसोन तयार आहेत अशी बातमी लागली. नंतर यांनीं मनांत आणिले जे, लहान राहुटीत ज्यापेक्षां बसले आहेत त्यापेक्षां कांहीं दगा आहे ! आणि सर्वांनीं श्रीमंतांस सांगितलेच होतें जे, पुरुषोत्तमराव यास मारिलें ह्मणजे सर्वांस मारिलेंसें जाहलें; याही बातम्या येत. नंतर वडिलांचे पाय स्मरून दाजी त्या राहुटींत गेले. जातांच ‘ या पुरुषोत्तमराव, ’ ह्मणून श्रीमंत दादासाहेब ताजीम देऊन बसले. तो इकडील तिकडील

१ संध्येच्या पाण्यात आनदीबाईनी विष कालवले असेल ही काही तरी शका दिसते ! २ बारभाईचे कारस्थान उभारण्याच्या सुमारास पटवर्धन थोरल्या लष्करापासून निराळेच कोस अर्ध कोस अतरावर उतरत असत.

गोष्टी काढिल्या. इतक्यांत एका शिष्यानें येऊन विनंति केली जे, लघुशंकेस पाणी आणिलें असें ह्मणतांच श्रीमंत उठले. नंतर मुराराव व पुरुषोत्तमराव उभयतांच तेथें राहिले.. नंतर मुराराव यांस दाजी ह्मणाले जे, राव, आपण महाराज छत्रपति यांचे सेनापति, आणि श्रीमंत हे पंत प्रधान. उभयतांचा बरोबरीचा मायना; त्यापेक्षां आपण बसले असतां यांनी उठून जावें कीं काय ? ही चाल पूर्वीं नव्हती. आपणांस तितकें लक्षांतच आलें नाहीं. आपणास विडे देऊन निरोप दिल्यानंतर मग लघुशंकेस अथवा अन्यत्र जिकडे पाहिजे तिकडे जावे[1]. असें ह्मणतांच मुराराव बोलले जे, पुरुषोत्तमराव, आपण ह्मणतां ही गोष्ट खरी आहे. तेव्हां पुरुषोत्तमराव बोलले जे, यांतील अभिप्राय आपल्यास समजला नाहीं! आतां आपणास बोलावणें येईल. आपण गेल्यावर मी येथें एकटा नंतर राहुटीवर हत्ती घालून मला तुडवून मारावें असा बेत दिसतो ! राव, आपणास ठाऊक असों द्या कीं—राव यांचे गळ्यांत पाचेची कंठी होती त्या कठीस धरून पुरुषोत्तमराव बोलले जे—जशी ही कंठी आपले गळ्यांत आहे तसा पुरुषोत्तमराव आहे बरें ! मी आपणास जाऊं देणार नाही. असें म्हणतांच मुरारराव बोलले जे, पुरुषोत्तमराव, मी आपणास सोडून जाणार नाहीं. असें बोलतात तों मुरारराव यांस बोलावणें आलें जे, राव, श्रीमंतांनीं आपणास बोलाविलें. असें म्हणतांच मुरारराव म्हणाले जे, पुरुषोत्तमराव येथें बसले आहेत, मी येत नाहीं. इतकें ह्मणतांच तसाच निरोप गेला. नंतर दादासाहेब माघारे राहुटींत आले. येतांच पुरुषोत्तमराव यांनीं विनंति केली कीं, महाराज, मुरारराव बसले असतां आपण जाऊं नये; यांस विडे देऊन निरोप दिल्यावर आपण जावें; याप्रमाणे श्रीमंत नानासाहेबांपासोन चाल आहे. आम्ही आपले चाकर, आमची गोष्ट निराळी, आणि हे आपले बरोबरीचे, त्यापेक्षां असें दिसतें कीं, प्रथम आपण गेलां, नंतर मुरारराव यांसही बोलावणें पाठविलें; मग मी येथें एकटा, मजवर हत्ती घालून मला मारावें अशी मसलत ! ही मसलत आपले मनांत नाहीं, परंतु चार लुच्चे आपणास सांगतात तें प्रमाण वाटून आह्मांस मारावयाचा यत्न करतां ! त्यास मारावें असे आपल्या मनांत असल्यास एकादे शत्रूवर घालून मारावें. तेथें जर आह्मी मागें सरलों तर सरकारचे अन्यायी ! आणि असें दग्यानें मारणें हें श्रीमंतांस योग्य नव्हे. त्यापेक्षां याउपर आम्हास आपला विश्वास नाहीं. अतःपर मुरारराव यांचे गोटाजळ उतरत जाऊं. याप्रमाणें सांगून तसेंच करिते जाहले.

८८. एके दिवशीं पटवर्धन यांस लुटावें म्हणून सरकारचे पागेंत हुजुरातींत वगैरे तयारी जाहली. ही बातमी पटवर्धन यांस समजोन हे सारे तयार होऊन सरकारचे डेऱ्याजीक नगारा वाजवीत आले ! तों कोण आले म्हणून शोध घेतला तों पटवर्धनांची फौज. तेव्हां सांगून पाठविलें कीं, रात्रींच तयार होऊन येण्याचें कारण कोणतें ? यांनीं उत्तर

1 जावयाचें होतें.

केलें कीं, सरकारचे पागेंत तयारी जाहली म्हणोन बातमी आली, तेव्हां कोणी गनीम आला किंवा गनिमावर दग्यानें जावयाचें असेल, असें समजून आह्मी तयार होऊन आलों. आमचें आणखी दुसरें काम कोणतें ? वडिलांनीं हेंच केलें. आम्हीही हेंच करणार. सरकारांतून आज्ञा जाहली जे, आतां तुह्मीं आपले गोटास जावें. यांनीं उत्तर केलें कीं आह्मीं राहुट्या वगैरे पाडून बुनगें लादलें, आतां कोणीकडे जावें ? आतां उजाडेपर्यंत असाच छबिना[1] करूं. असें ह्मणून रात्रीं तसेच छबिन्यास उभे राहिले. प्रातःकाळ होताच सरकारचें कूच जाहलें त्याजसमागमें तसेच चालते जाहले[2].

८९. कोणे एके दिवशीं पुरुषोत्तमराव दाजी श्रीमंतांचे कचेरीस गेले तों तेथें मानकरी सारे मांडीस मांडी लावून बसले; व सुमेरसिंग वगैरे गाडदी बसले. त्यांचा मरातब दादासाहेबांनीं मोठा वाढविला व त्यांस पालख्या अबदागिऱ्या वगैरे दिल्या. तेही कचेरीसच बसले होते. तेथें पुरुषोत्तमराव बसले. तों फुलांचे हारतुऱ्यांच्या पाट्या भरून आणून श्रीमंतांपुढें ठेविल्या. तों दादासाहेब याणीं हारतुरे अगोदर गाडदी समोर बसले त्यांचे अंगावर टाकिले. नंतर मालोजी राजे घोरपडे व आप्पाजीराव पाटणकर वगैरे मानकरी यांस देऊन पुरुषोत्तमराव यांचे अंगावर तुरा टाकिला. तों दाजी यांनीं तसाच तुरा माघारा टाकोन बोलले जे, राजे, राजे, हारतुरा माघारा टाका ! असें म्हणतांच दरोबस्त मानकरी यांनीं हारतुरे माघारे टाकिले. नंतर पुरुषोत्तमराव बोलले जे, दादासाहेब ! हे गाडदी पायचीं माणसें, आणि हे मानकरी तुमच्या मांडीस मांडी लावून बसले, असें असतां गाड्यांस हारतुरे अगोदर देऊन नंतर मानकरी यांस देणें ही चाल श्रीमंत नानासाहेबांपासोन नव्हती ! दादासाहेब, श्रीमंत नारायणरावसाहेब यांस गाड्यांनीं मारिलें त्या वेळेस हे मानकरी जर वाड्यांत असते तर पांच हजार गाडदी कापून काढिले असते ! ! ! असें बोलतांच दादासाहेब यांस वाटलें कीं, हे मानकरी आतां दंगा करितील कीं काय ! आणखी पुरुषोत्तमराव तलवार जवळ होती ती हातांत घेऊन बोलले कीं, आपणास चमत्कार पहावयाचा असल्यास अद्यापि का होईना ! असें म्हणतांच दादासाहेब कचेरींतून उठून आंत डेऱ्यांत बिचोब्यांत गेले ! पुरुषोत्तमराव दाजी मानकरी यांजसुद्धां गटाचा गट तसेच कचेरीचे बाहेर आले. तों गाडदीही बाहेर आले. गाडदी दाजीस मुजरा करून बोलले[3],

१ तीन चार हजाराची टोळी लष्कराभोंवती पहाऱ्याकरिता रात्रभर फिरती असे तिचे नांव छबिना; व हें प्रहाऱ्याचे कामही छबिनाच होय. २ ही माहिती थोडी चुकली आहे. श्रीमंताचा मूळ बेत भवानराव प्रतिनिधीस लुटण्याचा होता व त्यासाठी त्यांनी प्रतिनिधींच्या गोटावर फौज पाठविली होती. प्रतिनिधिही लढून मरण्यास तयार झाले होते. ती बातमी पटवर्धनास लागताच ते प्रतिनिधींच्या कुमकेस तयार होऊन आले. तो इतक्यात श्रीमंताची व प्रतिनिधीची आपसात समजूत झाली. तेव्हां पटवर्धनांचा फितूर उघडकीस आला. मग वर लिहिल्याप्रमाणे प्रश्नोत्तरें झाली. शेवटी मुरारराव घोरपड्यांनी मध्यस्थी करून दादासाहेबांकडून पटवर्धनास निरोप देवविला. यासंबधें ऐ. ले. संग्रहांत नं. १३२७ च्या पत्रांत सविस्तर हकीगत आहे ती पहा. ३ गारद्यांचा.

महाराज, आपली बरोबरी आम्हांस यावयाची नाहीं. असें म्हणतांच गाडद्यांस बोलले कीं, अहो जमातदार, तुह्मांकडे काय आहे ! हें श्रीमंतांनी पहावें. तुम्ही किती थोर जाहलां तरी श्रीमंतांच्या मांडीस मांडी लाऊन बसाल कीं काय ! हे मानकरी मांडीस मांडी लाऊन बसतात. तुम्ही किती जाहलां तरी सरकारचे चाकर. असें म्हणोन गाडद्याचेही तोंडावरून हात फिरविला ! तों मालोजी राजे पुरुषोत्तमराव दाजी यांची पाठ थोपटून बोलले कीं, दाजी, तुला काय सांगूं ! माझे अंगावर साडेतीनशे जखम आहे. आणि प्रसंग पडल्यास आणखी मरून जाऊं. परंतु हें बोलणे आमच्यानें व्हावयाचें नाहीं ! आह्मी उगेच हारतुरे घेऊन बसलों होतों ! आज आमची अब्रु तू राखलीस. असें ह्मणतांच दाजी बोलले जे, राजे, आह्मी काय, ब्राह्मण ! असे ह्मणतांच राजे बोलले कीं, तूं वरकड बामणावाणी बामण नव्हेस. तूं बोलशील आणि प्रसंग पडल्यास मरूनही जाशील. माझी खातरजमा आहे. याप्रमाणें दाजींचें वक्तृत्व व शूरत्वाची खातरजमा मोठे मोठे मानकरी यांस होती. याप्रमाणें कथा वडिलांनीं सांगितली ती लिहिली.

९०. प्रथम श्रीमंत पुण्याहून स्वारीस निघाले ते वेळेस नाना फडणीस आपली प्रकृति बिघडली म्हणून परत येऊन पुण्यांत राहिले. नंतर स्वारीतून एक एक मंडळी हरतऱ्हेचें निमित्त करून माघारी आली. सखारामबापू, हरिपंततात्या, सारे माघारे आले. श्रीमंत गंगाबाईसाहेब यांस चार महिने जाहले असें खास जाहलेवर त्रिंबकरावमामा यांस मुख्य करून पटवर्धन सारे सरदारसुद्धां रघुनाथराव--दादासाहेब यांनीं बेइमानी केली असें समजोन त्यांच्या पाठीस लागले. रघुनाथराव-दादासाहेब पुढें पळावयास लागले. तमाम हुजुरातसुद्धां फौजा पाठीस लागल्या. बारभाईनीं मोगलाईत संधान करून खासा नबाब निजामअल्ली हैदराबादेहून मदतीस आणिले. त्यास दरकूच लाख रुपये कबूल केले. फौजेंत मुख्य त्रिंबकरावमामा. दुय्यम हरिपंत फडके; पुरंदरास मुख्य नाना फडणीस, दुय्यम सखारामबापूं, याप्रमाणें. बाकी सरदार मंडळी मानकरी सारे अनुकूल झाले आणि दादासाहेबांच्या पाठीस लागले. ते समयीं

१ दरबारांत श्रीमंतांच्या मांडीस मांडी लावून बसणारे सर्वच मानकरी होते असें नाही. राजपथकी लोकांचा ह्मणजे महाराज छत्रपतीकडून ज्यास सरदाऱ्या व मानमरातब मिळाले होते तेवढ्याचा मात्र तो मान होता. २ आणि हे मानकरी म्हणजे श्रीमंताच्या बरोबरीचे, असा वाक्यशेष. ३ म्हणजे शेपन्नास. केवळ तीनशे पन्नास असे नव्हे. आपले लोकात साडेतीन ही एक आवडती सख्या आहे. जसे साडेतीन मुहूर्त, साडेतीन वस्त्रे, साडे तीन शहाणे, साडेतीन राव. श्रीमत दादासाहेब पुण्याहून स्वारीस निघाले ते बेदरावर निजामअल्लीशी लढाई व तह होऊन कर्नाटकांत गेले. आणि पुण्यास बारभाईचे कारस्थान सिद्धीस गेल्याची बातमी समजल्यावरून तिकडून माघारे परतले. तितक्या अवधीत घडलेल्या गोष्टी बखरीतल्या ८० पासून ९० पर्यंत सदरांत आल्या आहेत. ह्मणजे त्याचा काळ स० १७७३ सप्तबरपासून १७७४ मार्चपर्यंतचा आहे. त्या केवळ कालक्रमानेच एकापुढे एक आल्या आहेत असें नाही. कांही मांग पुढेंही झाल्या आहेत. ४ क्रम चुकला. बापू मुख्य, नाना दुय्यम, असें पाहिजे.

यांचे फौजेस बारभाईंची फौज असें म्हणूं लागले. ती स्वारी एकंदर छत्तीस महिन्यांची. त्यांत लढाया मोठमोठ्या जाहल्या व राजकारणेही मोठमोठीं जाहलीं. तीं सारीं लिहिलीं तर भारततुल्य ग्रंथ वाढेल, आणि तितकें लिहिण्यास माझी योग्यता नाही. परंतु ज्या कथा वडिलांनीं सांगितल्या तितक्याच लिहितो.

९१. प्रथम लढाई श्रीक्षेत्र पंढरपुरनजीक कासेगांव येथील मैदानांत जाहली. तेथें त्रिंबकरावमामा धरले गेले, लढाई बिघडली, ते विस्तारें लिहितों. प्रथम इकडील सरदार रघुनाथरावदादासाहेब यांचे पाठीस लागले तेव्हां ज्या मुक्कामाहून दादासाहेब पुढें जात त्या मुक्कामावर या फौजा उतरत. याप्रमाणे फिरत होते. जसे त्यांचे चिरंजीव बाजीरावसाहेब पुढें पळत, पाठीमागें इंग्रजांची फौज लागली, त्याप्रमाणें. दादासाहेब यांचा मुक्काम श्रीक्षेत्र पंढरीस आला. तेथे वेडी बया म्हणून भगवद्भक्त होती. ती जे सांगेल त्याप्रमाणें होत होतें. श्रीमंत दादासाहेबांनीं तिजला आणोन विचारिलें. तिनें सांगितलें जे, तुला आज जय येतो. तूं पुढें जाऊं नको, लढाई कर. असे सांगितले. त्या भरंवशावर त्यांनीं मुक्काम केला. तों त्रिंबकरावमामा फौजसुद्धां पाठीमागून आले ते कासेगांवावर नजीक राहिले. तों बातमी आली जे, दादासाहेब यांचा मुक्काम पंढरीस आहे. आज लढाईचा मनसुबा आहे. असे समजल्यावर त्रिंबकरावमामा यांनीं पुरुषोतमराव दाजीस बोलावणें पाठविलें. पटवर्धन यांची फौज माण नदीवर उतरली होती तेथून पुरुषोत्तमरावदाजी निघून आले ते त्रिंबकरावमामा यांजकडे आले तो मामा गाशा घालून बसले होते. तो पुरुषोत्तमराव गेले. जातांच मामानी ताजीम दिली आणि बसले. तों मामानी वर्तमान सांगितलें जे, नित्य आम्ही त्यांचे पाठीसीं लागलों. ते पुढे पळतात, त्यांचे मुक्कामावर आमचा मुक्काम; असें असतां आज त्यांनीं कूच केले नाहीं. त्यांचा लढाईचा मनसुबा दिसतो. त्यास आपण आलांच आहां, त्यास लौकर परशुरामपंतभाऊ व वामनरावबाबा व रघुनाथरावदादा यांस आणवा. आतांच चालोन जावयाचे. त्यांचीही तयारी जाहली. असें म्हणतांच पुरुषोत्तमरावदाजी बोलले कीं, बरें आहे. आम्ही त्यांच्या पाठीस कशासाठीं लागलों ? लढावयासाठींच ! परंतु माझा मनसुबा ऐकावा. लढाईचा मोकदमा आज करूं नये. उदईक करावा. कां म्हणाल तर, आज आम्हांस वीस कोसांची मजल पडली. सारी गाळण जाहली. हे आमचे सरदार पांचशें स्वारांचे धनी, परंतु यांचे समागमें स्वार पंचवीस देखील नाहींत ! याप्रमाणें सर्वांचेंच जाहलें आहे. मागून सारी फौज सायंकाळीं जमा होईल. ताजे तवाने होऊन उदईक लढाईची मसलत करावी. हें एक. आणखी एक वर्तमान कळवावयाचें. हुजुरातींत सारा फितूर जाहला आहे. त्यास याचाही विचार करावयाचा. असें म्हणतांच त्रिंबकरावमामा बोलले कीं, पुरुषोत्तमराव, अशी गोष्ट कां सांगतां ? लढाई आजच करावयाची. तुम्ही लौकर आपली

१ जुजबी विश्रांति घेण्यासाठी.

फौज आणवा. असें म्हणतांच पुरुषोत्तमराव दाजी बोलले कीं मामा, जर आज गडबड कराल तर हुजुरात सारी फितली आहे हे तुमच्याच मुसक्या बांधितील ! असें तोंडावर सांगितलें. परंतु मामास क्रोधाचा आवेश फार. कांहीं केल्यानें ऐकेनात. सरदारांस आणवा असेंच म्हणूं लागले. तेव्हां पुरुषोत्तमराव दाजी यांनी सांगितलें कीं, ते मी गेल्याशिवाय यावयाचे नाहींत. तर मी जाऊन त्यांस तयारी करून घेऊन येतों. असें म्हणून घोड्यावर बसून चालते जाहले. जातेवेळेस सांगितले की, मामा, आम्ही येईतोंपर्यंत गडबड करूं नये. असें सांगून चालते जाहले. आपले फौजेंत येऊन तयारी करून जों निघाले तों तिकडून दादासाहेब यांची फौज चालून आली. वेडी बया जी होती तिला श्रीमंतांनीं अंबारींत बसविली. तिनें हत्ती पुढें घातला आणि तोंडानें सांगितलें जे, काय पाहतां, पुढें हत्ती ढकला ! आज फत्ते आहे. तों इकडून त्रिंबकरावमामा चालोन गेले. लढाईचें जों तोंड लागतें तों हुजुरातींत पहिलाच फितूर होता. लागलीच जखम लागून मामा घोड्याखालीं आले. तशाच मुसक्या बांधल्या ! फौज सारी उधळली. दादासाहेब यांची फौज मामाचे फौजेस लुटीत पाठीस लागली[1].

९२. तों पटवर्धन यांची फौज जों तयार होऊन येती तों त्रिंबकरावमामाकडील पळ सुटला. त्याबरोबर यांचीही फौज उधळली. यांचेजवळ खासे खासे मात्र दोन चारशें राहिले. नंतर दादासाहेब यांचे फौजेंत स्वारांनीं निंबाचे ढाळे[2] खोंविले. तों पुरुषोत्तमराव दाजी यांनीं आपलेही लोकांकडून निंबाचे फांटे खोंवविले, आणि सांगितलें जे, तुम्हांस 'कोणाकडले' म्हणून विचारल्यास 'दादासाहेब यांजकडीलच' असें दटावून सांगा. असे सांगून त्यांजबरोबर आपणही निघाले. तों मध्यें एक शेरताटी होती, तेथें परशुरामभाऊ व सारी मंडळी उभी होती. शेरताटीचे पलीकडे सुमेरसिंग गाडदी वगैरे उभे होते. आपले डोचकीवर अबदागिरी धरवून—असे उभे होते. त्यांस परशुरामभाऊनीं पाहिलें, आणि पुरुषोत्तमराव यांस ह्मणाले जे, दाजी, हे गाडदी उभे आहेत यांजपाशीं जमाव थोडाच आहे. त्यास यांजवर घोडीं घालावीं ! असें ह्मणतांच दाजी बोलले, भाऊ, तुला समजलें ? आह्मीच शिपाई आणि त्यांनीं हातांत काय कांकणें भरलीं कीं काय ? आम्हीं त्यांजवर घोडीं घातलीं, त्यांस आह्मीं मारिलें, त्यांनीं आम्हांस मारिलें, त्यांत आमचा एखादा खासा पडला, तरी आम्हांस पहाणारा कोण आहे ? आम्हांस धनी ना गोसावी, अशी आमची अवस्था जाहली आहे ! त्यांनीं त्या म्हातार्‍याच्या[3] मुसक्या बांधून टाकल्या तशा तुझ्या मुसक्या बांधितील ! आतां आपली अब्रु बचावून सांभाळून निघून जावें हेंच खरें ! असें म्हणतांच परशुरामभाऊ बोलले जे, ते काय गाडदी[4], श्रीमंत नारायणराव-

१ ए. ले. संग्रह न. १३७९ त कासेगावच्या लढाईचें वर्णन पहा. ही लढाई ता० २६ मार्च १७७४ रोजी झाली. २ शत्रु कोण, मित्र कोण, ही ओळख पटण्यासाठी. ३ त्रिंबकरावमामाच्या. ४ त्या गारद्यांची कथा काय !

साहेब यांस मारणारे असें असून डोयीवर अबदागिऱ्या धरून उभे राहिले, यास आतांच मारावें! असे म्हणतांच पुरुषोत्तमराव दाजी याणीं परशुरामभाऊ यांचे शेल्यास धरून एक शिवी देऊन माघोरे ओढिलें; आणि बोलले जे, माघारा फिर! शिपाईगिरीच्या गोष्टी आह्मांस सांगतोस! त्या थेरड्यास धरून नेलें तसें तुला धरून नेतील; नंतर आह्मांस मरावें लागेल; किंवा पाढरे कावळ्यांकडे जावें लागेल! असें ह्मणतांच परशुरामभाऊ माघारे फिरले. नंतर माण नदीवर जाऊन मुक्काम केला. हरिपंत फडके यांजसमागमें कांहीं फौज राहिली ती सारी जमा होऊन परशुरामभाऊजवळ जमा जाहले; आणि पुढें मसलत कशी करावी या विचारांत पडले. श्रीमंत दादासाहेब पंढरपुरावर उतरले.

९३. नबाब निजामअली यांचा मुक्काम परांड्यास आला. श्रीमंत दादासाहेब यांजकडील वकील त्यांजकडे जाऊन बोलणे लाविलें जे, तुम्हीं आम्हांस मदत करावी. बारभाईकडे जाऊं नये. नबाब बोलले कीं, त्याणी आम्हांस दरकूच लक्ष रुपये कबूल करून आणिलें. पांच पंचवीस लक्ष रुपये त्यांचे आम्हास पावले. असें असतां ही गोष्ट बेइमानीची कशी घडेल? असें नबाबाचें बोलणे पडलें. दादासाहेब यांचें म्हणणे तुम्हांस आम्हीं चौथाई मुलूख देतों. तुह्मीं आह्मास कुमक करावी. असें नानाप्रकारें कारभारी रुकनुद्दौला यांचे विद्यमानें बोलत; परंतु नबाब ऐकेनात. तेव्हां असे बोलणे केलें जे, तुम्हीं येथून कूच करूं नये. आम्हांकडेही येऊं नये आणि त्यांजकडेही जाऊ नये. आम्ही खर्चास दररोज लक्ष रुपये देतों! असे बोलून नबाब यांचा मुक्काम करविला. इकडे हरिपंत वगैरे वाट पहातात जे, आज उद्यां नबाब येतील; परंतु नबाबाचे कूच होईना! इकडील वकील विचारीत तेव्हां त्यांस नबाब कांहीं बहाणा सांगत जे, घांटांत आमची तोडमोड जाहली याजमुळें तयारी नाहीं. तयारी करून निघतों. परंतु आंतून फितूर जाहला ही बातमी वकिलांनीं लिहून पाठविली. नंतर स्वतः हरिपंत फडके नबाबाचे लष्कराकडे चालते जाहले.

९४. इकडील वर्तमान—त्रिंबकरावमामा धरले गेले हें वर्तमान सांडणीस्वारासमागमें पुरंदरास नानाफडणीस व सखारामबापू यांस लिहून पाठविलें. ते उभयतां पुरंदरास श्रीमंत गंगाबाईसाहेब यांजजवळ होते. ही सारी मसलत पुरंदर मुक्कामीं राहून केली. श्रीमंत गर्भवासांतच होते. तों लष्कराहून सांडणीस्वार आला. उभयतां कारभारी पुरंदरचे दरवाज्यावर लहानसा बंगला आहे तेथें बसले होते. तों सखारामबापू यांनीं दुर्बीण लावून पाहिलें आणि सांगितलें जे, लष्करांतून

१ नारायणरावसाहेब यांच्या मारेकऱ्यापैकी महमद इसफ यास कासेगांवच्या लढाईंत ठार मारण्याचा परशुरामभाऊनी पुष्कळ यत्न केला, पण साधला नाही. याविषयी ऐ. ले. सं. नं. १३४९ पहा. २ या वेळी पटवर्धनांच्या फौजेवर परशुरामभाऊ मुख्य सरदार होते असे बखर लिहिणारा समजतो ही त्याची चूक आहे. या वेळी वामनराव मुख्य सरदार असून भाऊ त्यांचे दुय्यम होते. हीच चूक त्यानें ९७ सदरांतल्या मजकुरांत केली आहे. पटवर्धनांचे फौजेवर भाऊंची मुख्य सरदारी १७७७ पासून सुरू झाली.

सांडणीस्वार येतो आहे, परंतु मसलत बिघडलीसी दिसते ! असें सांगतात तों साडणीस्वार येऊन दाखल जाहला. पत्रें लखोटे फोडून पाहिलीं. त्यांत त्रिंबकरावमामा धरले, फौज उधळली, हें वाचिलें. अगोदर सांडणीस्वार यास सखारामबापूनीं विचारिलें जे, हरिपंत जिवंत आहे कीं मेला ? असें ह्मणतांच सुतरस्वार यांनीं सांगितलें जे, हरिपंत शाबूद आहे. असें ह्मणतांच ' कांहीं चिंता नाहीं ' असें बोलून नंतर लखोटे फोडिले. वर्तमान ऐकून नानाफडणीस यांची कंबर बसली. आणि बोलले जे, प्रथमग्रासीं माक्षिकापात जाहला ! असे बोलून स्तब्ध राहिले. तों दोन प्रहर दिवस आला. नाना भोजनास उठेनात. तेव्हां सखारामबापू याणीं धैर्य दिले; नाना, हे राजकारण आहे, असे तरंग किती उठतील ! आपण इतक्यांतच दम टाकल्यास पुढें कसें कराल ? तुह्मांस एक सांगतों. ज्यापेक्षां हरिपंत जिवंत आहे त्यापेक्षां मसलत बिघडत नाही. तो पुन्हां राजकारण उभें करील. याप्रमाणें बोलून नानास भोजनास उठविले.

९५. पुढें वैशाखमासीं श्रीमंत माधवरावसाहेब साक्षात् विष्णु अवतार जन्मास आले. शके १६९६ सोळाशें शाण्णऊ, जयनाम संवत्सरे, आधिक वैशाख शुद्ध सप्तमी, इंदुवारीं, मध्यान्हीं केवळ श्रीरामचंद्राचा अवतार जाहला, पृथ्वीवरील दरिद्रदुःख देशांतरास गेले; त्याप्रमाणें हा अवतार जाहला. सर्व लोक सुखी जाहले. अनेक प्रकारच्या कीर्ति केल्या. शत्रूचा पराभव करून साधूंचें संरक्षण केले बावीस वर्षे राज्य केलें.

९६. आतां या अवताराच्या गुणाचें व कीर्तीचें वर्णन करितों. हरिपंत फडके नबाबाचे लष्करांत गेले. जाऊन रुकनुद्दौला यांची भेट घेऊन बोलणें लाविलें; परंतु कोणतीही गोष्ट साफ दिसेनासी जाहली. एके दिवशीं कारभारी यांचे डेऱ्यांत रात्री हरिपंत गेले. नानाप्रकारें कारभारी यांसी बोलले जे, आह्मीं दरकूच लक्ष रुपये देऊन तुह्मांस कुमकेस आणिलें. असें असतां आज फेर गोष्ट सांगणें हें चांगलें कीं काय ? असें नानाप्रकारें सांगितलें. शेवटीं फार रात्र जाहली तेव्हां कारभारी बोलले कीं, हरिपंत, तुह्मीं निजावयास जावें. उदईक पहातां येईल. हरिपंत बोलले कीं, मी जाऊन काय करूं ! आज पंधरा दिवस जाहले, तुम्ही कबूल केल्यापैकीं काय जाहलें ? असें म्हणतात तों रुकनुद्दौला यांस झोंप येऊं लागली. ते आपले पलंगावर निजले. हरिपंत तेथेंच पलंगाचे खुरास टेंकून निजले ! तों मध्यान्ह उलटली. कारभारी जागे होऊन पहातात तों हरिपंत आपले पलंगाशीं टेंकून निजले आहेत ! तेव्हां हांक मारून जागें केलें; आणि बोलले कीं, तुम्हीं अद्यापि गेलां नाहीं हें काय ? यांनीं उत्तर केलें कीं, मीं विनंति केली ती आपण मान्य केली ह्मणजे मी निघालों ! असें म्हणतांच कारभारी यांनीं पारशी अक्षरांची चिठी लिहून खोजा बोलावून आणविला. आणि त्याचे हातीं चिठी देऊन नबाबाकडे लावून दिली. ती जनानखान्यांत चिठी गेली. तेथें नबाब पलंगावर निजले होते तेथें चिठी गेली. तेव्हां नबाबांनीं

मेणबत्ती धरवून चिठी वाचून पाहिली. त्यांत लिहिलें होतें जे, हरिपंत आले आहेत त्यांचें ह्मणणें उदईक आपलें कूच जाहलेखेरीज मी उठत नाहीं. त्यांस मीं हरतऱ्हेनें सांगितलें. शेवटीं कंटाळून निजलों तरी ते पलंगासच टेंकून बसले. त्यास खावंदानीं मेहेरबानी करून उदईक प्रातःकाळीं कूच होण्याच्या हुकुमाचा शेरा या अर्जीवर आला पाहिजे. अशी चिठी वाचतांच नबाबांस हरिपंत यांची काम करण्याची तारीफ वाटून कारभारी यांचे चिठीवर शेरा पारशी अक्षरांचा जाहला जे, ' हरिपंतके खातर छे कोस का कूच करना. ' असा शेरा होऊन खोजानें चिठी आणून कारभारी यांजजवळ दिली, नंतर कारभारी यांनीं शेरा सरकारचा वाचून पाहून हरिपंत यांस सांगितलें जे, तुमचें काम बशर्थ[1] जाहलें. उदईक सरकारचें कूच आहे. तुम्हीं आपली फौज तयार करून सामोरे मुजऱ्यास येणे. असें सांगतांच हरिपंत यांनीं कारभारी यांस खुरनिसा करून निघाले. तों चार घटिका पहांटेचे रात्रीस नबाबाची कुचाची तोफ जाहली. ही बातमी दादासाहेब यांस कळतांच त्यांनीं लागलेंच आपले कूच करून पळाले !

१७. पुढें परशुरामभाऊस घेऊन हरिपंततात्या सारी फौजसुद्धां नबाबाकडे मुजऱ्यास येऊन उभे राहिले. नबाब अंबारींत बसले होते. खवासखान्यांत रुकनुद्दौला कारभारी बसले होते. तेव्हां नबाबांनीं विचारिलें कीं, हरिपंत कोठें आहेत ? तों हरिपंत परशुरामभाऊचे डावे बाजूस सफेत पोषाख करून डोईवर अबदागिरी[2] न धरितां उभे होते त्यांस दाखविलें. तेव्हां नबाबांनीं हरिपंत यांचे अकलेची फार तारीफ केली कीं, यानें जसा बुद्धिबळाचा डाव टाकावा तसें केलें ! दादासाहेब लढाई न देतां पळाले ! असें ह्मणून ' खवासखान्यांत त्यांस बोलावणे ' असा हुकूम जाहला. नंतर खवासखान्यांत हरिपंत यांस घेतलें तों परशुरामभाऊ यांचा मुजरा जाहला. नंतर नबाब यांनीं परशुरामभाऊस खवासखान्यांत बोलावणें म्हणून हुकूम केला. तेव्हां रुकनुद्दौला बोलले कीं ते सरदार लोक आहेत. त्यांचा मरातब मोठा. ते खवासखान्यांत यावयाचे नव्हेत. याप्रमाणें बोलले. नंतर नबाबाची स्वारी मुक्कामास आली, परशुरामभाऊही मुक्कामास आले. सारी फौज परशुरामभाऊजवळ जमली. पुढें न-

---

१ हटकून. २ पेशवाईंत छत्र्या नव्हत्या ! उष्णनिवारणासाठी अबदागिऱ्या होत्या. पण तो सरकारी बहुमान असल्यामुळें ज्यास पराक्रम वगैरे योग्यतेबद्दल सरकारातून अबदागिरी मिळेल त्यानेंच ती वापरावी, इतर कोणी श्रीमंतीच्या जोरावर अबदागिरी वापरीन ह्मणेल तर त्यास तत्काल शेणमार व्हावयाचा ! सरकारांतून ज्यास अबदागिरी मिळे, त्यास अबदागिरी धरणाऱ्या गड्याचा पगार व दर तीन वर्षांनी अबदागिरीचें नवे सामान हा सर्व खर्च सरकारांतून मिळे. बाकी सर्व आबालवृद्ध लोक उन्हांतूनच फिरत. लग्नकार्य वगैरे समारंभांतून ज्याची अबदागिरी असेल, त्याजकडून ती कामापुरती मागून आणून निर्वाह चालवीत. राष्ट्रांतील लोकात तेज जागृत रहावें, नावलौकिकाची कृत्यें करण्यास लोकात नेहमी हुरूप असावा, यासाठीं निशाण, चौघडा, अर्धें आसन, मांडीस मांडी लावून बसण्याचा मान, पालखी, हत्ती, अबदागिरी, मशाल वगैरे बहुमान देण्याची त्या वेळच्या सरकारची युक्ति होती !

बाबास मेजवानी करावयाची, त्यास नाना फडणीस व सखारामबापू यावयाचे ते आले पाहिजेत, असे लष्करांतून हरिपंत फडके यांनी लिहून पाठविलें.

९८. नंतर पुरंदरास मसलत पडली जे, येथें श्रीमंतांजवळ कोणास ठेवावें ? ही योजना पडली. झाडून मंडळींची नांवनिशी लिहिली. तेव्हां सखारामबापू म्हणाले जे, श्रीमंतांजवळ ज्यास ठेवावयाचे त्यास चार गुण चांगले पाहिजेत. एक तर मातबर नामांकित मनुष्य पाहिजे. दुसरा गुण विश्वासूक पाहिजे. तिसरा गुण निस्पृह पाहिजे. कोट रुपये मृत्तिकेसमान असे पाहिजे. चौथा गुण शिपाई मर्द माणूस पाहिजे; कीं, जो प्रसंग पडला असतां प्राण–समर्पण करणार. हे चार गुण ज्यामध्ये आहेत त्यानेंच श्रीमंतांजवळ रहावें. तेव्हां मंडळींपैकीं कोणामध्ये कांही गुण, कोणामध्यें कांहीं गुण, परंतु चारी गुण संपूर्ण असे कोणांत नाहींत. ते पुरुषोत्तमराव दाजी यांमध्यें आहेत सबब त्यांस आणवावें असें ठरून लष्करांतून पत्र पाठवून पुरुषोत्तमराव दाजी यांस आणविलें; आणि सांगितले जे, आम्हांस लष्करांत नबाबास मेजवानी करावयाची यास्तव गेलें पाहिजे. त्यास आपणास श्रीमंतांजवळ ठेवावयाचें यास्तव आणविलें, त्यास आपण येथें रहावें; असें उभयतां कारभारी याणीं सांगितले.

९९. तेव्हां पुरुषोत्तमराव बोलले कीं, हें सरदाराचें काम–मी सरकारचा एकांड्या शिपाई, लष्करांत फिरणार, मला हें मोठे काम कशास पाहिजे ? सरकारचे पदरीं माझेसारखे लक्षावधि आहेत. हे काम कोणा सरदारास सांगावें. पटवर्धन सरदार तिघे आहेत त्यांतून कोणास सांगावें. अशी झाडाझाडीच केली. तेव्हां सखारामबापू बोलले कीं, आह्मीं सर्वांची चौकशी करून ठेविली. कोणी शिपाई आहेत तेथें मसलत नाहीं. मसलत शिपाईगिरी आहे तेथे विश्वास नाहीं. असे कोणांत कांहीं गुण; परंतु जे सर्व गुण आह्मांस पाहिजेत ते आपलेपाशीं आहेत. त्यास आपणासच ठेवावयाचें. तेव्हां पुरुषोत्तमराव दाजी यांनीं उत्तर केले कीं, मी सरकारचा चाकर खरा, परंतु मला दुसऱ्याचे ताबेदारीस आपण लावून दिले त्यापेक्षां मला भाऊची परमाणगी पाहिजे. असें म्हणतांच कारभारी याणीं सांगितलें जे, आह्मी भाऊंचें पत्र आणवितों. असे ह्मणून डांकेवरून पत्र आणविलें. भाऊनीं लिहिलें कीं, दाजी वडील आहेत. ते आह्मास आज्ञा करणार, आणखी सरकार त्यांस तेथें ठेवणार, त्यापेक्षां आह्मी नाही ह्मणतों कीं काय ? कोठेही सरकारची चाकरी करावयाची. याप्रमाणे परशुरामभाऊचें पत्र आलें.

१००. तेव्हां कोठे सवड नाहींसी जाहली. तेव्हां दाजी बोलले की, आपण मला येथें ठेवितां, परंतु सारी मुखत्यारी जर मला सांगितली तर राहीन. तेव्हां कारभारी बोलले

१ नबाबास मेजवानी करण्यास जाणार हे सारें दरबारी भाषणाचे ढोंग. वस्तुतः नबाबाच्या मदतीनें खानदेशांत जाऊन दादासाहेबास गाठून त्यास आपल्या कह्यात आणण्यासाठी जाणार !

जे, जसे आह्मी उभयतां, त्याप्रमाणें आपण. तेव्हां दाजी बोलले कीं, मला येथील कामगार आहेत त्यांची रुजुवात करून द्यावी. नंतर जनोबाआप्पा यांस बोलाविलें. त्यांजकडे किल्ला होता. त्यांस कारभारी यांनीं सांगितलें जे, आह्मी लष्करास जातों. पुरुषोत्तमराव दाजीस येथें श्रीमंतांजवळ ठेविलें आहे; तर जसे आम्ही उभयतां, त्याप्रमाणें दाजी. ते जी आज्ञा करितील त्याप्रमाणें वागावें. असें सांगतांच दाजी बोलले कीं, अहो आप्पा, तुमचा माझा स्नेह. हे कारभारी मला येथें ठेवणार. त्यास मी जो हुकूम करीन त्याप्रमाणें तुह्मांस ऐकावें लागेल. नाहींपेक्षां तुमचें पारिपत्य करीन ! आतांच सांगावे. याप्रमाणें स्पष्ट बोलले. तेव्हां जनोबाआप्पानीं सांगितलें जे, माझें काय गेलें ? उभयतां सांगतात जे आपले ठिकाणीं दाजी; त्यापेक्षां जें आपण सांगाल तेच आम्हांस मान्य. आपण शिबंदी अधिक उणी ठेवावयास सांगाल त्यांत आमचें काय गेलें ? सरकारचा पैका खर्च होईल. याप्रमाणें सांगितलेनंतर नाना याणीं गोपाळपंत बिवलकर यांस बोलावून आणून सांगितलें जे, आम्ही लष्करास जातों. दाजी जशी आज्ञा करितील त्याप्रमाणें करणें. त्यांसही दाजीनीं विचारिलें. तेव्हां बिवलकर बोलले जे, मी एक वेळ विनंति करीन कीं नानाची शिस्त अशी अशी आहे. मग जे आपण सांगाल त्याप्रमाणें करीन. दोन रुपये खर्च जास्त करावयास सांगाल, त्यास माझे काय गेले ! आतां नानानीं सांगितलें जे, जसा मी तसे दाजी, मग आमचें काय गेले ? याप्रमाणें झाडून सरकारचे दरकदार यांची रुजुवात करून घेऊन यादी वगैरे सारा दौलतीसंबंधें बंदोबस्त करून घेतला. नंतर विचारिलें जे, आपण मला एकटे ठेविले, त्यास प्रसंग पडल्यास मी एकटा मरून जाईन. परंतु माझे दिमतीस कांहीं लोक करून द्यावे. तेव्हां चारशें प्याद्यांची यादी करून घेतली. उभयतां कारभारी लष्करास जावयाकरितां निघाले ते वेळेस सखारामबापू यांनीं दाजीस एकांतीं बोलावून सांगितलें जे, अहो पुरुषोत्तमराव, दादासाहेब पन्नास हजार फौज घेऊन बाहेर फिरतात. आह्मी आपणास श्रीमंतांजवळ ठेविलें. त्यास बहुत सावधगिरीनें रहावे. तेव्हां दाजी बोलले कीं, बापू, हें सारें माझे पोटांत गडबडत आहे ! मी श्रीमंतांचे घरीं दहा वर्षांपासोन—पंचेचाळीस वर्षें माझ्या वयास जाहलीं[1]—आजपर्यंत वागलों. परंतु कोणाचे पाचोळ्यावर देखील पाय दिला नाहीं. ते माझी अब्रु घ्यावयासाठीं मला हें काम आपण सांगितलें ! परंतु बापू, आपणास एक ठाऊक असों द्या कीं, हे चारशें प्यादे आपण करून दिले हे मारवीन, नंतर आभाळ जरी कडकडून पडलें तरी या मुलावर पालथा पडेन; परंतु पुरुषोत्तमराव जिवंत असोन भलती गोष्ट आपण ऐकणार नाहीं ! याप्रमाणें बोलले तेव्हां सखारामबापू बोलले कीं पुरुषोत्तमराव, तुम्हाविषयीं माझी खातरजमा आहे. असें बोलून नंतर लष्करास कार-

१ यावरून स. १७२९ त पुरुषोत्तमराव दाजीचा जन्म झाला हें स्पष्ट होतें.

भारी चालते जाहले. पुरुषोत्तमराव दाजी श्रीमंतांजवळ राहिले. श्रीमंत गंगाबाईसाहेब यांनीं दाजीस आपले बंधु ह्मणविलें होतें. दाजी यांनीं ढाल तलवार घेऊन खोलीचे दारांत निजावें. चौकी पहारा पहात सारी रात्र फिरत असावें.

१०१. तों इकडे कारभारी लष्करांत गेले. नबाबास मेजवानी जाहली. तेव्हां नबाब यांनीं कारभारी यांस विचारिलें जे, तुह्मी उभयतां आलां, आणि राव पंडतके पास कोण आहे ? तेव्हां कारभारी यांनीं सांगितलें कीं, पुरुषोत्तमराव पटवर्धन यांस ठेविलें आहे. तेव्हां नबाब बोलले कीं, गोपाळराव यांचे बंधु नारायणराव व पुरुषोत्तमराव आह्मास माहीत आहेत; चांगले योग्य मनुष्य आहेत; याप्रमाणे नबाब बोलले. येविशीं प्रमाण परशुरामभाऊ यांचें पत्रही आहे पुरंदरप्रकरणीं; त्यांत लिहिलें आहे जे, पटवर्धनांची चौकी विश्वासाची ही नबाबापावेतो कीर्ति. याप्रमाणें पुरुषोत्तमराव दाजी यांची विश्वासाची चौकी.

१०२. कारभारी यांस जाऊन महिना पंधरा दिवस जाहले. तों सरकारचीं शागीर्दपेशाची माणसें कारकून खासगीकडील वगैरे यांचे नेबाद[1] श्रीमंत नानासाहेब यांचे कारकीर्दीपासोन राहिले होते. त्यांनीं श्रीमंत बाईसाहेब यांजजवळ रदबदली लाविली जे, आमचे नेबाद फार राहिले. हल्लीं दाजी यांचा कारभार आहे, त्यास आपण दाजींस सांगून आमचे हिशेब करवावे. आणि दाजीनीं केल्यास नाना कांहीं नाहीं म्हणावयाचे नाहींत. याप्रमाणें त्या माणसांनीं विनंति केली. नंतर दाजीची गांठ पडल्यावर श्रीमंत बाईसाहेब यांनीं सांगितलें कीं, दाजी, आमची हीं खासगीकडील माणसें हुजरे, जासूद, दिवटे, अबदागिरे, वगैरे शागीर्दपेशा. यांचे हिशेब श्रीमंत नानासाहेबांपासोन जाहले नाहींत. त्यास हल्लीं आपण मनावर घेऊन त्यांचे हिशेब करून नेबाद देववावे. गरीब फार हांका मारितात ! त्यांचा पैका फार राहिला. आणि तुह्मीं केल्यास नाना कांहीं तुह्मांस म्हणावयाचे नाहींत. याप्रमाणें सांगतांच दाजी बोलले कीं, बाईसाहेब, आमचा कारभार औट घटकेचा. जसा साडेतीन घटकेचा शिराळशेटीचा राजा तसें आमचें. उद्यां नाना आले म्हणजे ते नेबाद देवोत, हिशेब करोत, काय पाहिजे तें करोत. बाईसाहेब, आपण या कामांत अगदीं पडों नये. अशी झाडाझाडी केली. तों आणखी दोन दिवस मध्यें गेले. तों बाईसाहेब यांनीं गोष्ट काढिली जे, कसेंही करून आपण मनावर घेऊन गरीबांचें काम करावें. आपण केलें तर होईल. नाहीं तर नाना आलेवर ते काहीं करावयाचे नाहींत. याप्रमाणें दोनचार वेळ गोष्टी काढल्यावर दाजी बोलले कीं, बरें. आपण सांगतां त्यापेक्षां आतां माझेंच नाना काय करितील तें करोत ! असें म्हणून गोपाळपंत बिवलकर यांस हांक मारिली आणि विचारलें जे, अहो गोपाळपंत, हीं तुमचीं सरकारचीं खासगीकडील माणसें. यांचे हिशेब

१ पगारापैकी तहकूब ठेवलेल्या रकमा.

श्रीमंत नानासाहेबांपासून नाहींत ? तेव्हां गोपाळपंत यांनीं हिशेब नाहीत म्हणून सांगितलें. तेव्हां दाजी बोलले कीं, आह्मी कांहीं काम सांगितलें असतां माणसें ह्मणतात जे, आपण काम मात्र सांगणार; आणि रोजमुऱ्यास ठिकाण नाहीं ! त्यास ही माणसांची रड वाईट. मी काम सांगणार तो चुकला असतां लागलीच पायपोसानें मारणार ! तुमचा तीन पिढ्यांचा चाकर असला तरी सोडणार नाही. तेव्हां गोपाळपंत बोलले कीं, मी नानांचे समक्ष बोललों होतों जे, मी एकवेळ विनति करीन. पुन्हां बोलणार नाहीं. त्यास मी एकदा सांगतों, या कामांत आपण पडूं नये. उद्यां नाना आलेवर ते नेबाद देवोत अथवा न देवोत; काय पाहिजे ते करोत. हें माझे युक्तीस येतें. असे ह्मणतांच पुरुषोत्तमराव दाजी बोलले की, अहो, तुम्हीं सांगतां हें सारे खरेंच, परंतु माझे गळ्यांत ही गोणी घालून ते लष्करास निघून गेले. आणि ही शागीर्दपेशा वगैरे खासगीचीं माणसे यांत सारी खिचडी आहे. हे कांहीं दादासाहेब याजकडे आहेत, कांही इकडे आहेत. बाप तिकडे, लेक इकडे. मामा इकडे, भाचा तिकडे. चुलते तिकडे, पुतणे इकडे. अशी ही सारी खिचडी आहे. आणि उद्यां हे पैका खाऊन × × × × × जर फितले, आणि बरें वाईट जाहलें, तर मला मात्र प्राण द्यावा लागेल ! त्यास परिच्छिन्न[1] सांगतों, हिशेब करून नेबाद सारे फडशा करणें. असें म्हणतांच गोपाळपत बोलले जे, मीं प्रथमच सांगितले आहे की, एक वेळ विनंति करीन, पुनः बोलणार नाहीं. आतां जशी आज्ञा कराल तसें करीन. असे म्हणून मग हिशेब करावयास प्रारंभ केला. आठ पंधरा दिवसांत झाडून हिशेब करून एकंदर यादी केली तों पाऊण लक्ष रुपये सुमार बेरीज जाहली ! यादी पुरुषोत्तमराव दाजी यांजकडे आणिली. दाजी याणी मखलाशी[2] करून 'देणें'[3] केले, आणि रोजमुरा दरोबस्त वांटला ! सारीं मनुष्यें संतुष्ट जाहलीं आणि चाकरीस नीट वर्तू लागलीं. हे सारे गंगाबाईसाहेब यांचे आज्ञेवरून केलें; परतु नानाजवळ कांहीं बाईसाहेब यांचें नांव घ्यावयास यावयाचें नाहीं[4]. श्रीमंत बाईसाहेब यांची दाजीवर पूर्ण कृपा. केवळ बंधूप्रमाणे मानीत.

१०३. एके दिवशीं दोन प्रहरीं दाजी खोलीचे दारांत निजले होते. तों कुणबीण नित्य आंत जाणार तीच जात होती. तो यांची चाल कीं, नित्य माणसें आंत जाणार त्यांचा झाडा घेऊन नंतर आंत जाऊं द्यावीं. याप्रमाणे नित्यकृत्याची शिस्त होती. तों कुणबीण आंत चालली ती दाजीनीं पाहिली आणि बोलले जे, रांड फितुरी आहे, धरा ! असें ह्मणतांच धरून झाडा घेतला. तो कांहीं निघाले नाहीं. दुसऱ्या कुणबिणी आणून अगदीं लुगड्यासुद्धां झाडा घेतला, नंतर वेणी सोडविली तों बुचड्यांत सुरी निघाली ! आणि चौ-

---

१ निश्चित. २ हिशेब मजूर केल्याचा शेरा. ३ 'देणें' व 'देवविणे' या शब्दाविषयी सविस्तर खुलासा अधिकार-योग पृ. ५२।५३ येथें पहा. ४ आले नसते. अर्थात् पैसा खर्च करण्याचे कामी बाईसाहेबांच्या हुकुमास काही किमत नव्हती !

कशी केली तों फितुरी असें खास जाहलें. नंतर भोतांत घालून कडेलोट करून दिला याप्रमाणें दाजींची धूर्तता बहुत होती.

१०४. तो कांहीं दिवशी नाना व बापू लष्करांतून आले. हरिपंततात्यांसमागमें फौज देऊन पटवर्धन परशुरामभाऊ व मानकरी व नबाबाची फौजसुद्धां दादासाहेब यांच्या पिछाडीवर रवाना केले. दादासाहेब इंग्रज यांचे पाठीशीं पडोन गाडर[1] म्हणून इंग्रज गोरे लोकांचीं चार पलटणें कुमकेस घेऊन आले. तों त्यांची व इकडील फौजेची गांठ गुजराथेंत महीनदी[2] म्हणून आहे तेथें पडली तेथें पलीकडे दादासाहेब व सरकारची फौज मानकरीसुद्धां नदीचे अलीकडे. दोन प्रहर दिवस आला होता. सरकारची फौज सारी तयार होती. परंतु ऊन फार यामुळें झाडाखालीं गाशे घालून सावलीस कोणी बसले आहेत, कोणी निजले आहेत, तों इंग्रजांचीं दोन पलटणें भर दोनप्रहरीं नदी उतरली. बाकी दोन पलटणे उतरावयाची तयारी जाहली होती. हत्तीवरून बावा महात यांनी ती पलटणे आलेलीं पाहिलीं. सरकारचे अल्लीबक्ष व ऐरावत असे दोन हत्ती, एकावर बावा महात व एकावर दावल महात हे उभयतां बंधू. अल्लीबक्ष याजवर जरीपटका[3] होता. त्यानी हत्तीवरून पाहून एकमेकांत बोलले कीं ही दोन पलटणें अलीकडे उतरली. आणखी दोन पलटणें उतरावयास तयार जाहलीं. अशी चार पलटणें एके ठिकाणीं जाहलीं असता मग आमचे फौजेस ऐकणार नाहींत. त्यास हीं दोन पलटणे जी उतरली आहेत, यांत हत्ती घालून हीं तुडवून मारून टाकावीं ! अशी उभयतांनीं मसलत करून दोन हत्ती उठविले. तो ते हत्ती नीट पलटणांवर चालोन गेले. तेव्हां बाकीचे फौजेनें पाहिलें. आणि हत्ती कां उठविले असें जों पाहतात तों इंग्रजांची पलटणें पाहिली ! तेव्हा मालोजी राजे बोलले जे, अरे, काय पहातां ! तें फडकें गेलें म्हणजे आमची अब्रु गेली ! असें म्हणून चहूंकडून पलटणांवर घोडीं घातलीं. तों हत्ती आंत पलटणांत जाऊन मिसळले[4]. तेव्हां हत्तीचे सोडेत पट्टे दिले. तों चहूंकडून फौजा मिसळल्या. दोनं[5] पलटणांपैकीं एकही मनुष्य राहिलें नाही. दोनही पलटणें कापून काढिलीं.

१ नांव चुकलें, गाडरच्या जागीं कर्नल कीटिग्चे नाव पाहिजे. २ हे जाग्याचे नाव चुकलें. इंग्रजाशीं मराठ्याची ही लढाई मही नदीवर झाली नाही. ती नापार येथे झाली. ३ जरीपटका. ज्या सैन्याची निशाणें शत्रूने हिरावून घेतली ते सैन्य पराजित होय, ही सर्व देशातील युद्धनीति आहे. ४ या लढाईत अल्लीबक्षावरच्या बावा महातास तोफेचा गोळा लागला व निशाणदारास गोळ्या लागल्या. हत्तीसही दहा गोळ्या लागल्या. पहा ऐ. ले. स. न. १४६७. ५ ही अतिशयोक्ति आहे. नापारच्या लढाईत इंग्रजाचे म्हटले तर सारे जखमी व ठार मिळून सव्वादोनशे लोक होते. बाकी आरब व गारदी वगैरे पुष्कळ माणूस मारले गेलें तें दादासाहेबाकडचें होते. नापारच्या लढाईसबधाचे पत्र वामनराव पटवर्धन याचे ऐ. ले. सं. न. १४६४ चें आहे. त्यांतही इंग्रजाचे एक पलटण मारल्याचे लिहिले आहे ते चुकले आहे. शत्रूची संख्या व लढाईत त्याचें झालेलें नुकसान यासबंधाचे अजमास खुद्द लढाईतल्या सरदाराचेसुद्धा पुष्कळ वेळां चुकतात. याच लढाईसंबधें कर्नल कीटिग् व मि. फोर्बस् यानी हकीकती लिहिल्या आहेत त्यात मराठ्यांची एकदर संख्या व लढाईमुळें त्याचे जाया जखमी झालेले लोक याचे अजमास चुकले आहेत.

तेव्हां गाडरसाहेब यानें दुर्बीण लावून सारी लढाई पाहिली. आणि तोंडांत बोट घालून आश्चर्य केलें जे, आमचीं पलटणें ह्मणजे दारूची आग. त्यांजवर मुकीं जनावरें ज्यापेक्षां चालून येऊन पलटणें मारिलीं, त्यापेक्षां हें राज्य आह्मांस येतं नाहीं ! तेव्हां दादासाहेब बोलले कीं, हीं माझीं माणसें अशींच आहेत. मी घरभांडणामुळें तुमचे पाठीशीं पडलों. याप्रमाणें बोलले.

१०५. आणखी एके दिवशीं दोनही फौजांच्या गांठी पडल्या तेव्हां सरकारचा गोलंदाज मुसा नारंज म्हणून फरासीस होता. तिकडे दादासाहेब अंबारींत होते. तेव्हां इकडील कोणी बोलला जे, तोफेचा गोळा दादासाहेब यांस मारावा. असें ह्मणतांच मुसा नारंज बोलला जे, ते धनी आहेत. त्यांस कसें मारावें ? परंतु माझी शिस्त पहावी. असे ह्मणून तोफेचे गोळ्यानें अंबारीचा कळस उडविला ! हें दादासाहेब यांनीं पाहून इंग्रजांस फार निषिद्ध केलें जे, मी व्यर्थ तुमचे पाठीसीं पडलों ! अरे, ज्यानें अंबारीचा कळस उडविला त्यास माझा प्राण घ्यावयास उशीर लागेल कीं काय ? असें ह्मणतांच इंग्रज यांस फार राग येऊन मनगटे चावलीं; आणि बोलले जे, ही शिस्त फरासिसाशिवाय नव्हे ! दुसऱ्याचे हातून असें घडावयाचें नाहीं. असें म्हणून नीट तोफेवर चालून घेतलें आणि मुसा नारंज याचा गळा कापून नेला. तेथें लढाई मातबर जाहली. याप्रमाणें लढाया मातबर होऊन दादासाहेब यांस कोठें चैन पडों देईनात.

१०६. इकडे उभयतां कारभारी पुरंदरास आले. आलेवर गोपाळपंत बिवलकर यांनीं खर्चाच्या कीर्दी नेऊन पुढें ठेविल्या. नानानीं कीर्दी पाहिल्या. ज्या महिन्यांत नेबाद वांटले ती बेरीज मोठी पाहून गोपाळपंत यांस विचारिलें, हें काय आहे ? त्यांनीं विनंति केली कीं, मला ज्यांचे हवालीं केलें होतें त्यांस विचारावें ! त्यांनीं सांगितलें त्याप्रमाणें केलें. असे ह्मणतांच दाजीस बोलावून आणिलें आणि कीर्दी पुढें टाकून नाना ह्मणाले कीं, हें काय केलें ! दाजीनीं उत्तर केले की, बहुरूप[3] नाचविलें कीं काय ! अहो, तुम्हीं माझे डोचकीवर ओझें ठेविलें, आणि हीं सरकारची माणसे तिकडील पैका खाऊन जर फितलीं असतीं तर मला प्राण द्यावा लागता ! असें ह्मणतांच सखारामबापू बोलले कीं, दाजीनीं केलें ते ठीकच केलें. नंतर नाना कांहीं एक बोलले नाहींत. पुढें पलंगचौकीचें काम[4] दाजीकडे जसें होतें तसेंच होतें.

१०७. एके दिवशी दाजी पुरंदराखालीं भिंवडी म्हणून गांव आहे तेथे पागा बार-

---

१ मिळत नाहीं. २ मुसा नारज हा पेशव्याचा सरदार फ्रेंच जातीचा होता. हें त्याच्या नावावरूनच दिसत आहे. या १०५ सदरात वर्णिलेली गोष्ट मुसा नारज याची नसून सय्यद हुसेन नावाचा एक पेशव्यांचा नामांकित गोलंदाज होता त्याची आहे व ती नापारच्या लढाईतच घडलेली आहे. मुसा नारज याचें नांव काव्येतिहाससंग्रहांत पत्रें यादी वगैरे ले. २९१ मध्यें मुसा भरज असें आहे. तीं मोडीचें बालबोध करणाराची चूक आहे. ३ भोरप्यांचा खेळ. बहुरूपी याचाच अपभ्रंश भोरपी. ४ पलंगचौकीचें काम = पेशव्यांच्या शरीरसंरक्षणाचे काम.

गीर वगैरे शेंपन्नास लोक यांचे निसबतीस असत, तेथें घोडीं पहावयास ह्मणून किल्ल्यावरून आले. फार दिवस आले नव्हते ते कारभारी परत आलेवर खालीं आले. मागती पालखींत बसोन पुन्हां किल्ल्यावर जाऊं लागले. तों दरवाज्यांत ‘ परमाणगी पाहिजे ’ असें दरवाजकरी बोलले. तेव्हां हे तसेच माघारे फिरून आपले राहुटीस गेले. हें वर्तमान नानास कळतांच नानानीं स्वदस्तूरची चिठी पाठविली; त्यांत लिहिलें आहे जे, “ काल आपण माचीस येऊन दरवाज्यापासून श्रीमंत राजश्री माधवरावसाहेब यांजवर रागें भरून गेलां, त्यास दरवाज्यावर कारकून नित्य होता तो नव्हता; कालच नवा नेमून दिला; यास्तव आज राग टाकून यावें. नाहीं तर मला आपली आज्ञा जाहलीयास मीच आपले राहुटीस येईन ! ” याप्रमाणें चिठी येतांच निघून किल्ल्यावर गेले. नानाची गांठ पडली. नंतर दाजी बोलले कीं, नाना, मला श्रीमंतांचे घरी तीन पिढ्या परमाणगी ह्मणून नाहीं. याप्रमाणें श्रीमंत नानासाहेबांपासोन चाललें. असें बोलतांच नाना बोलले कीं, आतां तरी आपणास आडकाठी कोठें आहे ! त्या दिवसापासोन जसे उभयतां कारभारी, त्याप्रमाणें दाजी. यांस कांहीं दरवाज्यावर आडकाठी नाहीं. कोणी आपलेकडील आला असतां दरवाज्यावर सांगून पाठवून आणवावें याप्रमाणें सांप्रदाय. सरकारवाड्यांत कोणी सरकारचे दर्शनास येणार—त्यास नाना याणीं दाजीचे नांवें चिठी पाठवावी जे, अमके आले आहेत यांस श्रीमंतांचें दर्शन करवावें; याप्रमाणें नानाच्या चिठ्या आहेत.

१०८. पुढें श्रीमंत गंगाबाईसाहेब यांनीं आज्ञा केली कीं, आपण कुटुंब आणवावें. येथें कुटुंबसुद्धां रहावें. श्रीमंत लहान, त्यापेक्षां तुम्हांस घरास जावयास निरोप व्हावयाचा नाहीं, त्यास कुटुंब आणवावें; असा फारच आग्रह पडला. नंतर मंगळवेढेहून कुटुंब नेलें. दाजी यांस पुत्र चार, कन्या दोघी. वडील पुत्र हरिहररावतात्या. यांचें वय दहा बारा वर्षांचें होतें. त्यांस दरबारास जातेसमयीं समागमें नेत. श्रीमंत गंगाबाईसाहेब यांची पूर्ण कृपा. जें लागेल तें सरकारवाड्यांतून आणवावें. दाजी कधीं सरकारचे पंगतीस भोजन करीत नव्हते. आपले घरींच जेवीत. जे दिवशीं आज्ञा होईल ते दिवशीं भोजनास जावयाचें, याप्रमाणें पूर्वींपासोन सांप्रदाय. आठ चार दिवशीं श्रीमंत बाईसाहेब यांनीं दाजीस भोजनास ठेवून घ्यावें. दाजीनीं म्हणावें जे, मुलास ठेवून मी जातों. बाईसाहेब यांनीं ह्मणावें, मुलासुद्धां येथेंच भोजन करा. असें म्हटलेवर यांनीं तेथें रहावें. श्रीमंत पार्वतीबाईसाहेब—श्रीमंत भाऊसाहेब यांची पत्नी—व श्रीमंत गंगाबाईसाहेब या उभयतांचीं ताटें मांडीत त्यांचे समोर या उभयतांची ताटें. याप्रमाणें श्रीमंत लोभ करीत. वडील सांगत जे, दाजीनीं श्रीमंतांचें घर आह्मास आपले घराप्रमाणें केलें होतें ! याप्रमाणें पूर्ण लोभ. एकादे दिवशीं बाईसाहेबांनीं दाजीचे कुटुंबास बोलावून न्यावें. त्यांचें नांव कृष्णाबाई. त्यांस आई म्हणत. ती मातुश्री मोठी प्रसिद्ध—ज्यांस परशुरामभाऊसाहेब व बाळासाहेब मानीत—त्यांची कीर्ति

पुढें वर्णन करीन. त्यांस वाड्यांत बाईसाहेब बोलावून नेत. दाजीची कन्या धाकटी सगुणाबाई म्हणून होती तिला बया ह्मणत. ती स्वरूपानें फार सुंदर होती. तिचें वय सहा सात महिन्यांचे लहान होतें. तेव्हां बाईसाहेब यांनीं म्हणावें जे, दाजी, तुमची गोजरी आमचे बाळास करावयाची ! असें ह्मटलेवर दाजीनीं बोलावें जे, महाराज, आम्ही पदरचे चाकर. आमची योग्यता मुलगी द्यावयाची आहे कीं काय ? आम्ही गरीब. कण्याभाकरी खाणार. असें म्हटलें म्हणजे त्याणी म्हणावें, काय हें दाजी ! कण्याभाकरी म्हणजे काय ! यांनीं बोलावें जे, महाराज, आम्हांस कण्याभाकरीचा मुलुख दिला. त्या मुलखांत दुसरें धान्यच नाहीं ! असें म्हणतांच त्यांनीं हसावें या मुलीस श्रीमंतांचें दूध उरलेलें पाजावे. सोन्याचीं बोंडलीं, सोन्याच्या वाट्या घेऊन बाईसाहेब यांनीं आपले पायांवर घेऊन मुलीस दूध पाजावें. श्रीमंतांनींही ' दूध पाजणें ' असें म्हणावें. याप्रमाणें केवळ आप्ताप्रमाणें मानीत.

१०९. एके दिवशीं कचेरींतून पुरुषोत्तमरावदाजी मागील चौकांत गेले. श्रीमंत बाईसाहेब झोपाळ्यावर बसल्या होत्या, आणि जवळ पुरुषोत्तमरावदाजी यांचें कुटुंब यांस बसविलें होतें, आणि कांही झोंपाळ्यावरील गाणीं ह्मणत होत्या. तें पुरुषोत्तमरावदाजी यांनीं पाहिलें आणि रागें भरले जे, काय वेडी माणसें आहेत ! आपली योग्यता काय ! उभें राहून झोंपाळा हालवावयाची देखील योग्यता नाहीं, आणि बरोबरीनें बसणें ह्मणजे काय ? असें रागे भरतांच श्रीमंत बाईसाहेब बोलल्या जे, येथें बरोबरी व मानपान बायकांत कशाचे ! ते तुमचे मानपान काय ते कचेरींत पहावे ! नंतर पुरुषोत्तमरावदाजी बोलले जे, महाराज, कसें झालें तरी आम्हीं आपले योग्यतेने असावे ! याप्रमाणे श्रीमंत बाईसाहेब यांची पूर्ण कृपा.

११०. पुढें कांही दिवशी दादासाहेब यांचा बंदोबस्त कोपरगांवीं गंगातीरीं जाहला. दादासाहेबांस हरिपंत फडके घेऊन आले. त्यांस दादासाहेब बोलले जे, तुह्मीं आह्मांस बरे धुळीचे दिवे दाखविले ! असें म्हणतांच हरिपंत फडके यांनी उत्तर केलें कीं, महाराज, याचें उत्तर आह्मीं सेवकांनीं काय करावें ? आपण श्रीमंत रावसाहेब यांस विचारावें. ते आपणास सांगतील. असें बोलून दादासाहेब यांनीं सर्व प्रायश्चित्त करून गंगातीरीं राहिले.

१११. सुमेरसिग गाडदी व तुळाजी पवार उभयतां फिरंग्याचे राज्यांत पळून गेले होते. तेथून त्यांस आणून पुण्यांत पांच पाट काढून शेंदूर घालून चारी रस्त्यांनीं हिंडवून चावडीवर आणून बांधिलें. नंतर मार्गानीं अठरापगड

१ हे हरिपंताचें उत्तर किती मार्मिक व अर्थपूर्ण आहे ! सालबाईचा तह झाल्यावर दादासाहेबास इग्रजाचा आश्रय नाहीसा झाला; तेव्हा आपला मानमरातब व खर्चाची सोय यथास्थितपणे होईल अशाबद्दल हरिपंत फडके, तुकोजी होळकर व परशुरामभाऊ याजपासून लेखी हमी घेऊन श्रीमंताची स्वारी सन १७८३ च्या जलईत सुरतेहून गोदातीरी कोपरगांव येथे येऊन राहिली. त्यास आणावयास हरिपंत व रास्ते गेले होते.

जात जाणार त्यांनीं त्यांचे तोंडावर थुंकावें, याप्रमाणें चार दिवस केलें. नंतर अंगास सुया टोंचून त्यांस पलिते गुंडून पेटविलें आणि जाळून मारिलें. याप्रमाणें गाड्यांचें पारिपत्य केलें. कांहीं त्या प्रकरणीं होते त्यांस फांशीं दिलें.

११२. मानाजी फांकडे हे दादासाहेब यांस कोपरगांवीं आणविलें तोंपर्यंत दादासाहेब याजपाशींच होते.[1] दादासाहेब यांचा बंदोबस्त केल्यावर ते आपले घरास गेले. ते कांहीं फितुरीप्रकरणांत नव्हते. फक्त शिपाईगिरीचे इरायानें होते, म्हणोन श्रीमंतांनीं त्यांस बोलावणें पाठवून आणाविलें. पुरंदरास भेटीस येण्याचें ठरलें तेव्हां नाना फडणीस यांनीं पुरुषोत्तमरावदाजीस सांगितलें जे, मानाजी फांकडे यांजबरोबर बोलावयाचा आमचा कांहीं लाग नाहीं. त्यांजबरोबर आपणच बोलावें. दाजी बोलले कीं, तुमचा पंचहत्यारी कसला जरी आला तरी मी त्याजबरोबर बोलतों. सारे माझे ओळखीचे आहेत ! असें बोलले. नंतर कचेरीचे वेळेस पुरुषोत्तमरावदाजी श्रीमंत रावसाहेब यांस आणावयास गेले. तेव्हां बाईसाहेब बोलल्या कीं, दाजी, बाळास सांभाळावें. यांनीं उत्तर केलें कीं, बाईसाहेब, आपण कांहीं काळजी करूं नये. पुरुषोत्तमराव जिवंत आहे तों कोणाचें भय नाहीं ! मानाजी फांकडे भेटीस[3] येणार ह्मणून सर्वत्रांस भय वाटलें. दाजी यांनीं श्रीमंतांस कडेवर घेऊन कचेरीस आणून मसनदीवर बसविलें. शेजारीं तलवार घेऊन पुरुषोत्तमरावदाजी बसले. नाना फडणीस व सखारामबापू झाडून मानकरी बसले. नंतर मानाजी फांकडे आले. त्यांस दोन समले, समागमें पंचवीस तीस खासे, याप्रमाणें आले. नीट कचेरींत येऊन मसनदीजवळ आले. तों पुरुषोत्तमरावदाजी बोलले कीं, रावसाहेब, मानाजीबावांस ताजीम द्यावी. असें म्हणतांच श्रीमंतांचे मसनदीवर खुरनिसा करून समोर मध्येंच मसनदीजवळ मानाजी फांकडे बसले; आणि कचेरींत चहूंकडे पाहून ' दाजी, रामराम. ' असें ह्मणतांच हे बोलले कीं, 'मानाजीबावा, रामराम.' मग त्यानें कोणासही रामराम केला नाहीं; आणि बोलावयास आरंभ केला; पुरुषोत्तमराव, मी कसा आहे तो मीं आपल्या तोंडानें वर्णन करावेंसें नाहीं. परंतु मला हीं बामणें फितुरी ह्मणतात ! त्यास आह्मास कोठेंही चाकरी करावयाची. दादासाहेब काय आणि हे पाय काय, त्यास आतां पुरे. आह्मी कांहीं आईचे पोटांतून दाली बांधून आलों नाहीं. यांनीं आह्मांस दाली बांधिली. असें म्हणून गळ्यांतून पडदळसुद्धां तलवार काढून श्रीमंतांचे पायांपुढें ठेविली. तों नाना फडणीस यांनीं खुणेनें पुरुषोत्तमराव यांस सांगितलें जे, यास लौकर जावयाचें करा ! असें ह्मणतांच दाजी बोलले कीं, मानाजीबावा, हें काय करितां ! तुह्मांस दाली बांधिली ती माघारी घ्यावयास बांधिली

१ ही माहिती चुकली आहे. १७७६ च्या जून महिन्यात दादासाहेबांस सोडून देऊन हरिपंतांबरोबर मानाजी फाकडे पुण्यास आले. सखाराम हरि व सदाशिव रामचद्र हेही त्याच वेळीं आले. २ सवाईमाधवराव यांणीं. ३ यापूर्वी इतर मानकऱ्यांबरोबर मानाजी फांकड्याची व पेशव्याची भेट झालीच होती. ही दुसरी स्वतंत्रच भेट. पहा ऐ. ले. सं. न. १८५३

कीं काय ? आणि तुह्मांस फितुरी तरी ह्मणतो कोण ? तुह्मीं आपला सरंजाम खाऊन श्रीमंतांचे पायासीं लक्ष ठेवून स्वस्थ असावें.असे ह्मणतांच मानाजी फांकडे बोलले कीं, पुरुषोत्तमराव, आम्ही सरकारचे चाकर. आजपर्यंत चाकरी कशी केली ती आपणास माहीत आहेच. असें म्हणतांच दाजी बोलले कीं, मानाजीबावा, आम्हीं काय, ब्राह्मण ! असें ह्मणतांच मानाजीबावा बोलले कीं, वरकड बामणावाणी तुम्ही ब्राम्हण नव्हे. तुमची खातरजमा मला आहे आणि माझी खातरजमा तुम्हांला आहे ! असें म्हणतांच दाजी बोलले जे, रावसाहेब, मानाजीबावांस तलवार उचलून द्यावी. असें म्हणून श्रीमंतांचा हात लावून तलवार उचलून आपण दिली. आाणि बोलले जे, मानाजीबावा, श्रीमंतांची भोजनाची वेळ जाहली, निरोप घ्यावा. असें म्हणून लागलीच विडे आणविले आाणि श्रीमंतांचा हात लावून विडे दिले आणि बोलले जे, अहो, मानाजीबावांचे लोकांस विडे देणें, असें ह्मणून त्यांचे लोकांस विडे दिले. नंतर सांगितलें जे, आतां निरोप द्यावा, असें ह्मणून श्रीमंतांस उठावयाची खूण करतांच श्रीमंत उठले. तों मानाजी फांकडे मुजरा करून निघाले. दाजी बोलले, तुह्मीं सरकारचे पायांशी लक्ष ठेऊन स्वस्थ असावें. कोणे गोष्टीची फिकीर न करणें असें ह्मणून त्यांस निरोप दिला. ते गेल्यावर नाना फडणीस बोलले जे, दाजी, आज आपण होतां ह्मणून मानाजी फांकडे यांसी बोललां. आमचा कांहीं त्याजबरोबर बोलण्याचा लाग नव्हता. अहो कचेरींत ह्मणतो, ' हीं बामणें मला फितुरी म्हणतात ! ' त्यासी काय बोलावें ! याप्रमाणें मानाजी फांकडे यांची कथा वडिलांनीं सांगितली ती लिहिली.

११३. आणखी एके दिवशीं जी गोष्ट घडली ती लिहितों. कारभारी श्रीमंत गंगाबाईसाहेब व श्रीमंत पार्वतीबाईसाहेब उभयतां बायांकडे नित्य तिसरे प्रहरीं येऊन बसत. तेथें कांहीं राजकारणप्रकरणीं गोष्टी आणि कांहीं खलबतांतील गोष्टी बोलत. तेव्हां कारभारी बोलावयास आले म्हणजे बाईसाहेब पुरुषोत्तमरावदाजीस बोलावीत. याप्रमाणें होऊं लागलें. तें सखारामबापूस आवडेनासें जाहलें. तेव्हा सखारामबापू यांनीं बाजीपंतअण्णा म्हणून सरकारचे कारकुन यांस बोलावून आणून सांगितलें जे, तुमचा व दाजीचा ऋणानुबंध बरा आहे असें आह्मांस समजलें; त्यास आह्मी सांगतों एवढें काम करा. आह्मीं सांगितलें असें कांहीं त्यांस कळों नये. सहज गोष्ट स्नेहानें काढलीसी करून त्यांस निरोप कळवावा. कोणता म्हणाल तर जे, आम्ही तिसरे प्रहरीं बाईसाहेब यांजपाशीं कांहीं राजकारणप्रकरणीं गोष्टी बोलावयास येतों, तेथें पुरुषोत्तमरावदाजी असतात याजमुळे आम्हांस संकोच होतो. त्यास आम्ही खलबतास गेलों असतां त्यांनीं येऊं नये. अशी युक्तीनें गोष्ट काढून बंदोबस्त करावा, असें ह्मणतांच बाजीपंत बोलले जे, बापू, आपण सांगतां त्यापेक्षां आह्मास निरोप कळविणें प्राप्त; परंतु दाजीचा स्वभाव रागीट, ते

कांहीं बुद्ध्या कोणाच्या बोलण्यांत शिरावयाचे नाहींत; बाईसाहेब बोलावणें पाठवितात सबब तेथें येऊन बसतात, आणि त्यांस आपण मोठे आग्रहानें येथें ठेऊन घेतलें आणखी असा निरोप त्यांस कळविल्यावर पुढें काय होईल तें मात्र मला विचारूं नये ! आपण सांगतां त्यापेक्षां मी युक्तीनेंच कळवितों. तेव्हां सखारामबापू बोलले जे, कांही चिंता नाहीं, तुह्मीं कळवावें असें सांगितलें. दुसरे दिवशीं सरकारचे वाड्यांत दहा घटका दिवसास जेवणें जाहलीं. नंतर बाजीपंत विडा खात तसेच पुरुषोत्तमराव यांचे बिऱ्हाडी आले. हे भोजनास बसले होते. बाजीपंत येतांच बोलले जे, या बाजीपंतअण्णा, आज इकडे कोणीकडे आलां ! कांहीं काम योजून आलां असें वाटतें. अहो, त्यांस बसावयास पाट देणें, असें म्हणून बसावयास पाट दिला. तेव्हां बाजीपंत बोलले कीं, सहज आलों. दाजी बोलले कीं, तुम्ही सहज कधीं यावयाचे नव्हेत. कांहीं काम आहे. कामाखेरीज कांही आलां नाहीं. असे ह्मणून भोजनें झालीं. नतर विडा खात बसले आणि बोलले जे, काय काम आहे सांगा. बाजीपंत दाजीस मामा म्हणत, वडिलां-प्रमाणें मानीत; दाजीनीं बाजीपंतांस ‘ अरे बाजीपत ’ ह्मणावे. तेव्हां बाजीपंत बोलले कीं मला आपण वचन दिले तर मी सांगेन तेव्हां दाजी बोलले कीं वचन कोणतें ? तेव्हां बाजी-पंत बोलले कीं, आपण शिव्या देणार नाही याप्रमाणें वचन द्यावें. तेव्हां दाजी बोलले कीं, शिव्या द्यावयास असा अपराध तूं केला नाहींस व मीही केला नाहीं ! तेव्हां बाजीपंत बोलले कीं, तसेंच आहे. आपण वचन द्यावें. तेव्हां दाजीनीं वचन दिलें. मग बाजीपंत बोलले की, आपण तिसरे प्रहरीं दरबारास जातां तेव्हां कारभारी आंत खलबतास जातात त्या वेळेस आपणही आंत जातां. तेथें कांहीं राजकारणमजकूर बोलतात आणि आपण तेथें आलां म्हणजे त्यांस संकोच होतो. तेव्हां आपणास तरी तेथें खलबतांत जाण्याची गरज काय आहे ? इतके म्हणतांच दाजी बोलले कीं, अरे, तुला हें बोलावयास सखाराम-बापूनें सांगितलें असेल ! असें म्हणून तप्त जाहले, आणि बोलले जे, तूं वचन घेतलेंस म्हणून तुला कांहीं बोलत नाहीं. परतु आतां तुमच्या सर्वांच्या मनांत काय आहे कीं, पुरुषोत्तमरावदाजी हे आमचे गरिबाचे मात्र काळ, त्यास कांही बोलावयाचे नाहींत; असा एक भ्रम तुम्हांस असेल. तरी सखारामबापू हे कोण आहेत ते माझ्या ओळखीचे आहेत ! आतां काय होणें तें कचेरीसच होईल ! आतां तूं जा. असें ह्मणून बाजीपंतांस निरोप दिला. मग तिसरे प्रहरीं वाड्यात गेले तों श्रीमंत कचेरीस बसले होते. यांचा नित्य सांप्रदाय श्रीमंतांस नमस्कार करून मसनदीजवळ बसावें. नंतर श्रीमंत बाईसाहेब

१ पुरुषोत्तमरावदाजी तोतयास अनुकूल असल्याबद्दल कांही अमुक अमुक संशय त्या वेळी कोणा-कोणास आला होता हे लक्षात घेता खलबतासारख्या नाजूक प्रसगी दाजी हजर राहिले तर सखाराम-बापूस सकोच वाटणें अगदीं योग्य होतें असें वाटतें. आपणावर असा आरोप असल्याचा कांही भास खुद्द पुरुषोत्तमराव यांसही झालेला असावा असें त्यानी लिहिलेल्या ऐ. ले. सं. न. १५२० च्या पत्रावरून दिसतें.

यांचा निरोप यावा जे, आंत येणें. नंतर आंत जावें. तेथें कारभारी बसलेच असतात. ते दिवशीं आंतून निरोप आला. सखारामबापू यांनीं बाजीपंतांबरोबर निरोप पाठविला हें कांहीं श्रीमंत बाईसाहेब यांस ठाऊक नाहीं. बाईसाहेब यांचें बोलावणें येतांच दाजी ह्मणाले जे, अहो, आम्हांस आंत जावयाची गरज नाहीं. ते कारभारी आंत आहेत. कांहीं राजकारणप्रकरणीं बोलतात. तेथें आमचें जावयाचें प्रयोजन काय ? बाइसाहेब आज्ञा करितात सबब जावयाचें, परंतु कारभारी यांस संकोच होतो ! ! नंतर कचेरीचे मानकरी वगैरे होते त्यांस बोलले, अहो, श्रीमंतांचे घरीं कारभारी मुख्य दिवाण पुरंदरे. त्यांचे कारकून हे सखारामबापू चांगले शहाणे सबब हेच पुढें जाहले. परंतु तुम्हांस एक सांगतो. यांनीं मागें चाळे बहुत केले. तेव्हांचे श्रीमंत थोर सुज्ञ होते. त्या वेळेस अब्रु राहिली. हल्लीं हे पाय[1] आहेत आणि तुम्हांआम्हांसारखे चाकर श्रीमंताचे पदरीं बहुत आहेत. आतां सखारामबापू यांनीं चाळे करावे, पुरुषोत्तमराव पारिपत्य करील ! याप्रमाणें दोन तीन वेळां उरास हात लावून बोलले. यांचे बोलणें सारें कारभारी ऐकतात. बाहेर कचेरी आणि ते माजघरांत. मध्यें पडदी मात्र. दाजी असे ह्मणून आणखी बोलले जे, अहो, माझे वयास अठेचाळीसें[2] वर्षे जाहलीं, परंतु मला कोणी श्रीमंतांचे घरीं बोलले नाहींत. श्रीमंत देखील माझी मर्जी रक्षण करीत. याप्रमाणें तीन पिढ्या चाललें. हल्लीं कारभारी यांचें बोलून घेऊन मला येथें रहावयाची जरूर नाहीं. यास्तव आज मी निरोपासच आलों. असें म्हणतांच कचेरीचे लोक म्हणाले जे, दाजी, आपण असें कां ह्मणतां ? आपणास कोण बोलणार आहे ? हे ह्मणाले कीं, अहो, मी बोलून घेऊन रहावयाचा गृहस्थच नव्हे ! तेव्हां सखारामबापू नानाकडे तोंड करून बोलले कीं, पुरुषोत्तमरावदाजीस राग आला ! असें म्हणतांच नाना बोलले कीं, तुह्मी त्यांस कशास सांगून पाठवीत होतां ? तेव्हां बाजीपंत तेथें होते त्यांस सखारामबापू बोलले कीं, अहो बाजीपंत, तुम्हीं काय सांगितलें ? बाजीपंत बोलले कीं, ही विनंति मीं पूर्वीच केली आहे. आतां मजकडे कांहीं शब्द नाहीं ! असें म्हणतांच बाईसाहेबास बापू बोलले कीं, दाजीस आपण आणवून समजूत करावी. बाईसाहेब बोलल्या कीं, आह्मा कांहीं बोललों असतां ते आतांच निघून जातील ! असें ह्मणतांच सखारामबापू मुकाट्यानें उठून कचेरींतून

---

१ ‘हे पाय आहेत’ हें बोलणे सवाई रावसाहेब यांस उद्देशून. २ बहुधा या ११३ सदरांत वर्णिलेला प्रसग स. १७७६ मध्ये घडलेला असावा. ज्या अर्थी याच वर्षाच्या सप्तंबर महिन्याच्या प्रारभी दाजी वारले, त्या अर्थी त्यांच्या वयास अठेचाळीस वर्षे पुरी होण्याचे आधी ते वारले हे स्पष्ट आहे. कारण त्यांचा जन्म स. १७२९त झाल्याचे मागें त्यांच्याच तोंडच्या एका वाक्यावरून सिद्ध केलें आहे. हें सर्व पाहता बखरीत अठेचाळीस वर्षे झाली, असे लिहिले आहे तेथें ‘अठेचाळिसावे वर्ष लागले’ असें पाहिजे हें उघड आहे. आपल्या वयाविषयी बोलतांना जें वर्ष सुरू असेल तें पुरें समजून संख्या सांगण्याची ही चूक पुष्कळ लोक करितात.

आपले घरास गेले. नाना फडणीस बाहेर आले. येऊन दाजीस ' नमस्कार ' असें बोलले. तों दाजींनीं त्यांस उत्तर केलें कीं, तुम्ही कारभारीच आहां ! आज ते बोलले, उद्यां तुम्ही बोलणार ! त्यास मी असें बोलून घ्यावयाचा गृहस्थ नव्हे. मी श्रीमंतांचा निरोप घेऊन घरास जाणार. मला घर सोडून फार दिवस जाहले. असें ह्मणतांच नाना बोलले कीं, ठीक आहे. एकूण श्रीमंतांचा निरोप घेऊन तुम्ही जाणार, त्यास श्रीमंत निरोप द्यावयाजोगे जाहले म्हणजे निरोप देतील ! नंतर आपण जावें. दाजी बोलले कीं, आम्हीं पायांवर डोई ठेविली ह्मणजे तोच आमचा निरोप. नाना फडणीस बोलले जे, असें नाहीं. आपण काय बोललां जे, श्रीमंतांचा निरोप घेऊन जाणार, तेच खरें. आतां दुसरें बोलूं नये. श्रीमंतांनीं निरोप दिला तर जावें ! याप्रमाणें बोलून नंतर हात धरून श्रीमंत बाईसाहेबांकडे घेऊन गेले. बाईसाहेब यानींही याच रीतीनें सांगून मोठ्या आग्रहानें ठेऊन घेतले. याप्रमाणें कारभारी यांस भर कचेरींत ' पुरुषोत्तमराव पारिपत्य करील ' असें बोलणार श्रीमंतांचे दरबारीं कोण होते ? पुरुषोत्तमरावदाजीप्रमाणें पराक्रम व बोलणें कोणासच नाहीं ! नाना फडणीस किती आर्जवानें बोलून मर्जी रक्षण करीत येविशीं कोणास असत्य वाटेल, परतु जे खानदानी पुरुष आहेत त्यास असत्य वाटणार नाहीं. जे अज्ञानी आहेत त्यांनीं असत्य मानल्यास दस्ताऐवजी पुरवणी करून देऊं कीं, नाना फडणीस किती आर्जवानें बोलत. त्यावरून दाजीचे सामर्थ्य लक्षात येईल.

११४. आणि पुरुषोत्तमरावदाजी गरीबांवर कृपा किती करीत आणि त्यांचा बहुमान किती राखीत, येविशीं एक कथा सांगतों. बापूजी नाईक भोसेकर[1] ह्मणोन मंगळवेढ्यांत सराफ होते. ते पुरंदरास आपले कामाकरितां आले. तेव्हां दाजी त्यांस बोलले जे, अहो बापूजी नाईक, तुह्मांस नानांची भेट करवितों. असें म्हणून त्यांस घेऊन नानांचे वाड्यांत चालले. पुरुषोत्तमरावदाजी पुढें, पाठीमागे तात्या[2], त्यांचे पाठीमागे बापूजी नाईक, याप्रमाणें चालले तों नानांचे वाड्यांत परकी माणूस कोणी जावयाचा सांप्रदाय नाहीं, म्हणून चौकीदार यांनीं बापूजी नाईक याचा हात धरिला. तेव्हां बापूजी नाईक बोलले जे, तात्या, मला चौकीदार येऊं देत नाहींत. तात्यांनीं दाजीस सांगितलें कीं, बापूजी नाईक यास येऊं देत नाहींत. असे ऐकतांच लागलीच दाजीनीं मागें फिरून 'कोण ××× येऊं देत नाहीं ?' असें म्हणतांच चौकीदार यांनीं हात सोडिला ! पुरंदरचीं घरें लहान, सबब यांचा शब्द ऐकून नाना बोलले, पुरुषोत्तमराव, काय जाहलें ? तेव्हां हे नानास बोलले जे, कसला तुमच्या घरचा कारभार××××! आह्मी मातब्बर मनुष्य आपले भेटीस आणीत असतां पायचीं माणसें[3]-×××××

---

१ या भोसकराचा उल्लेख मागें आला आहे. २ बखर लिहिणारचे वडील हरिहररावतात्या. हे तेव्हां तेरा चवदा वर्षांचे होते. ३ ' पायची माणसे ' ह्मणजे पायदळाचे लोक यास शिलेदार त्या काळीं अगदी तुच्छ लेखीत । पण अठराव्या शतकाच्या अखेरीपासून पायदळ पलटणांनी आपलें सामर्थ्य प्रकट केलें तेव्हा युरोपांतल्या व इकडच्या घोडेस्वाराचीही घमेंड आतां मात्र पार नाहीशी झाली आहे

नीं हात धरिला ! असें म्हणतांच नानांनीं लागलीच त्या जमातीस निरोप दिला. तेव्हां दाजी बोलले कीं, नाना, आह्मी आपले भेटीस भलतेंच माणूस आणूं कीं काय ? जीं विश्वासूक खातरजमेचीं माणसें असतील त्यांसच घेऊन येऊं. असें म्हणून नानास बोलले जे, नाना बापूजी नाईक यांस भेटावें. मग नाना उठून उभे राहून बापूजी नाईक यांस भेटले. नंतर दाजीनीं नानास सांगितलें जे, हे मंगळवेढ्यांतील सावकार मोठे मातबर, कांहीं कामाकरितां येथें आले होते. सहज आपली भेट घेऊन जावें ह्मणून आले. असें सांगून पानसुपारी वगैरे देववून निरोप घेऊन घरास आले. मग बापूजी नाईक बोलले जे, आमची सावकारी नानाजवळ कशास सांगितली ? तेव्हां दाजी बोलले कीं, तुम्ही सावकारच आहां. याप्रमाणें दाजी गरीबांचें भूषण राखीत.

११५. आणि एके दिवशीं नानांचे बोलावणे आलें. दाजींचा सांप्रदाय बोलाविल्याशिवाय कारभारी वगैरे यांचे घरी जावयाचे नाहीं. सरकारवाड्यांत मात्र हरवक्त जावयाचें. तेथेंच कारभारी यांचा नमस्कार व्हावयाचा तेव्हां बोलावणें आलें सबब तात्यास समागमें घेऊन गेले. नाना यांचे वाड्यात गेले. जोतें जो चढतात तों नाना कोणी गृहस्थ होते त्यांजबरोबर खलबत करीत होते. तों दाजी येतांच गोपाळजी गुंड—नानांचा खिसमतगार—यानें कळविले कीं, दाजी आले. तेव्हा नानानी सांगितलें जे, गोपाळजी, तूं जाऊन युक्तीनें सांग, ' आपण अंमळ बसावें, नाना आता येतात. ' असे म्हणतांच गोपाळजी दाजीजवळ येऊन बोलला. हे जोत्यावर उभे होते तो नानानीं सांगितलेप्रमाणें गोपाळजी बोलला जे, 'आपण अमळ बाहेर बसावें ' असे बोलताच दाजी बोलले कीं, अरे, मी कोणा-×××चे दारात आजपर्यंत बसलों नाहीं ! असे म्हणून माघारे फिरले, आणि जोडा आण म्हणोन खिसमतगाराकडून जोडा आणवन जोडा घालून चौकांत आले. तो नाना फडणीस तसेच बाहेर येऊन चौकांत आडवे जाहले, आणि हात धरून दाजींस माघारे नेले. तेव्हां दाजी बोलले कीं, नाना, माझा सांप्रदाय आपणास माहीत असान असे करतां हें काय ? मी दारोदार बसावयाचा गृहस्थ नव्हे ! मी श्रीमंतांचे दारीं देखील बसलों नाहीं, याप्रमाणें श्रीमंत नानासाहेब यांजपासून तीन पिढ्या जाहल्या, चालले आतां लोकांचे घरीं बसावयास मला फार दिवस कांहीं राचावयाचे नाहीं ! आपणास कामें असल्यास मला बोलावणें पाठवीत जाऊं नये असे म्हणताच नाना कांहीं बोलले नाहीत. मग इकडील तिकडील कांहीं गोष्टी काढून नंतर नानानी सांगितले कीं, भोजनास यावें. तेव्हां दाजी बोलले कीं, मी कांहीं येत नाही. मुलास ठेऊन जातों. नाना बोलले कीं, नाहीं, मुलासुद्धा आपण यावें

१ ह्मणजे बदली केला. बडतर्फ केलें असा नेहमीचा अर्थ नव्हे. निरोप दिला या अर्थी रजा दिली असेंही म्हणण्याचा प्रघात होता. पण रजा शब्दाचे दोन अर्थ होते. एक रजा ह्मणजे बडतर्फी व दुसरा रजा ह्मणजे बिन पगारी रजा. भरपगारी रजेस ' फरूदर्गा ' असा निराळा शब्द होता. बिनपगारी वगैरे रजा तेव्हां मुळीच नव्हती !

व आपले शिष्यास बोलावणें पाठवावें. तेव्हां दाजींनी तात्यांसच सांगितलें कीं, घरीं जाऊन आम्ही भोजनास येत नाही म्हणून सागावे व शिष्यास सोवळी भांडी घेऊन येणें ह्मणून सांगणें. असें म्हणतांच नाना बोलले कीं, त्यास कशास पाठवितां ? आणखी कोणी जाईल. दाजी बोलले कीं, तोच कां जाईना ! कांहीं चिंता नाहीं. असें ह्मणून तात्यासच पाठविलें. नंतर नानाचे घरीं भोजन करून आले. याप्रमाणें कथा वडिलांनी प्रत्यक्ष पाहिलेली सांगितली ती लिहिली असे.

११६. एके दिवशीं दाजी नानाकडे गेले. जाऊन वर बसले तों नानानीं विड्याचें तबक पुढें ठेविलें. दाजींनीं विडा नानास देऊन आपण घेतला. उभयतांनींही विडे घेतले. तों नाना थुंकावयासाठी पिकदाणी इकडे तिकडे पाहूं लागले. दाजींदेखत ‘ पिकदाणी आण ’ असें कसें ह्मणावें असें त्यांस वाटलें. तें दाजीस समजून दाजी बोलले कीं, गोपाळजी, गोपाळजी, पिकदाणी घे तेव्हां नाना समजले कीं, दाजीस पाहिजे. ह्मणून नाना बोलले की, दाजी, आपणास पिकदाणी पाहिजे कीं काय ? तेव्हां दाजी बोलले कीं, मला कांहीं नको. मी कांहीं विडा थुंकीत नसतो आपणासाठीं मीं आणविली. असें ह्मणतांच नाना बोलले कीं, गोपाळजी, खालीं दाजीकडील माणूस असेल त्यास दाजींचा जोडा आणावयास सांग ! तेव्हां दाजी ह्मणाले कीं, हे काय ? तेव्हां नाना बोलले कीं, आपण माझी पिकदाणी घ्यावी, मी आपला जोडा घेतों ! असें ह्मणतांच दाजी हंसों लागले. याप्रमाणें नानांचा पूर्ण लोभ.

११७. आणखी दाजी यांची आर्जव करण्याची एक गोष्ट सांगतों. हरिपंत कानिटकर हे दाजी यांचे मेहुणे. ते धोडपेस फडणिशीचे कामावर पेठे यांजकडून होते. त्यांनीं तेथून धोतरजोडा रेशिमकांठी किंमत वीस रुपयेपर्यंत, चार बोटें रेशिमकांठ, लांबरुंद, बारीक, चांगला काढवून दाजीस नेसावयास ह्मणून पाठविला. तो धोतरजोडा धुवून आणविला, तेव्हां कांठ फार; दाजींचा सांप्रदाय दोन बोटें कांठाचा धोतरजोडा नेसावयाचा आणि याचा चार बोटें कांठ, हा धोतरजोडा नाना फडणिसांस द्यावा, असें मनांत आणून नानास भोजनास बोलाविलें. नानाचा सांप्रदाय भोजनास गेले तर आपला आचारी स्वयंपाकास पाठवावयाचा, परंतु दाजीचे घरीं आचारी कांहीं पाठवावयाचा नाहीं. नाना भोजनास आले. यांचे घरीं येऊन स्नान केलें. तो दाजींनीं धोतरजोडा सोंवळ्यांत वाळत घालून चुन्या करून आपले हातांत घेऊन नाना अंग पुसून धोतरें नेसावयाचे वेळेस आपण धोतरें घेऊन पुढें गेले. यांचे हातांत धोतरें पाहून नाना समजले कीं, आमचे शिष्याजवळचीं धोतरें घेतलीं, ह्मणोन शिष्याकडे पाहिलें; तों शिष्या बेताप्रमाणें धोतरें घेऊन उभा होता. तों दाजी बोलले कीं, हा धोतरजोडा हरिपंत कानिटकर आमचे मेहुणे धोडपेस असतात त्यांनीं पाठविला. तो उंच फार, येवढा मी कांहीं नेसत नाहीं, आपणास नेसावयास चांगला आहे, सबब आणिला आहे. तेव्हां नाना बोलले, हें सारें खरें, परंतु

तुम्हीं हातांत काय ह्मणून घेतला ? नंतर दाजी बोलले कीं, कांहीं चिंता नाहीं. असें ह्मणोन बळानें हातांत दिला मग नाना नेसले आणि भोजनास बसले. तेव्हां पटवर्धन यांचे घरीं बायकांनीं वाढावयाचें. तेव्हां नाना बोलले जे, दाजी, ही तुमची कसली वेडी चाल बायकांनी वाढावयाची ! दाजी बोलले की, आमच्या शिलेदारांच्या बायका सारीं कामें करितात ! तेव्हां नाना हसूं लागले आणि जेवतांना बोलले—दाजीस मुलें, चार मुलगे व दोन मुली. तेव्हां नानांचे मनांत तात्या व नाना हे पहिल्या कुटुंबाचे, व बाकी ही या कुटुंबाचीं—याजवरून विचारिलें जे, या कुटुंबाची ममता यां दोघांवर आहे कीं नाहीं ? कसें काय ? तेव्हां दाजी बोलले की, नसावयास काय जाहले ? नाना बोलले की, सापत्न, सबब. तेव्हां दाजी हंसोन बोलले की, ही सारी मुले हिचीच. पहिले कुटुंबाची एक मुलगी मात्र आहे ती रास्त्यांचे घरीं दिली आहे. असे ह्मणताच नाना बोलले की, हे मला अगदीं ठाऊक नाहीं. माझी समजूत हीं दोन मुले पहिले कुटुंबाचीं याप्रमाणें बोलून नंतर भोजने जाहलीं. विडे घेऊन आपले घरास गेले.

११८. पुढें त्रिंबकचा किल्ला बदलला तेव्हां त्याचे पारिपत्यास पुरुषोत्तमरावदाजींस पाठविलें होते.[२] दाजींनी जाऊन त्रिंबकचे किल्ल्याचा बंदोबस्त करून नाशकास श्रीमंत गोपिकाबाईसाहेब होत्या त्याणी ठेवून घेतले ते कांही दिवस तेथेच होते. मातुश्रींची मर्जी यांजवर बहुत. चिरंजीव ह्मणत. पत्रे बाईसाहेब याचीं 'चिरंजीव राजश्री' म्हणून मायन्याची नाशकास होते त्या प्रकरणी बहुत आहेत, त्याजवरून समजेल. तेथील बंदोबस्त करून पुरंदरास आले.

११९ पुरंदर मुक्कामी असता चिरंजीव मनाबाई म्हणून कन्या तिचें लग्न केलें तें सासवडास केले. बावधनकर सोनी यांचे घरीं दिली. तो समारंभ चांगला जाहला.

१२०. नंतर पंढरीनाथतात्यांचे चिरंजीव हरिहरराव ह्मणून होते त्यांचे लग्न सासवडासच झालें ते पुरुषोत्तमरावदाजी यांनीच केले.[६] पंढरीनाथतात्या यानी मिरजेहून दाजीस लिहून पाठविलें जे, आपण वडील आहां. त्यास समारंभ चांगला करावा. नाना व सखारामबापू यांस व श्रीमंतांसही विनंति करून समारंभास आणावे. याप्रमाणे त्यांनी पत्र पाठविलें. नंतर समारंभास नाना फडणीस आले व सखारामबापूंचे चिरंजीव आले. श्रीमंतांस येण्याविषयी विनंति केली, परतु किल्ल्यावरून खालीं यावयाचे यामुळें मानसिक केले. मिरजेहून गंगाधररावें आले होते. त्यांस बाळासाहेब म्हणत. याप्रमाणे मोठा समारंभ जाहला.

---

१ कृष्णराव नाना. हे दाजींनी आपल्या भावजयांच्या ( नारायणराव कृष्ण याच्या स्त्रीच्या ) मांडीवर दत्तक दिले होते. २ 'पुढें' हा शब्द येथे चुकला आहे. कारण ११७ सदरांतला मजकूर घडण्यापूर्वीच ह्मणजे सवाईमाधवराव जन्मास आले त्या सुमारास दाजींनी त्रिंबकच्या किल्ल्यावरचा फितूर मोडिला पुढे पुष्कळ दिवसांनी दाजींनी मंगळवेढ्याहून पुरंदरास कुटुंब नेलें. त्यानंतर घडलेली हकीकत ११७ सदरांत आहे. ३ पहा ऐ. ले. स. न. १३६४ चे पत्र. ४ पहा ऐ. ले. स न १८०८. ५ पांडुरंगराव गोविंद. ६ या लग्नसमारंभाचें वर्णन ऐ. ले. स न. १७६४ मध्ये आहे. ७. गंगाधरराव गोविंद.

१२१. नानास मेजवानी जाहली ते दिवशीं दाजी यांनीं आचारी यांस सांगून तिखटाचें सार करविले. शुद्ध भगवतीची पूड वस्त्रगाळ करून तिचें तें सार रुप्याच्या पातेल्यांत घालून चमच्यानें वाढावयास आणिलें. सर्वांस वाढवून नानास वाढविलें. आचारी यांस सांगितलें जे, वरकड मंडळीस थोडें थोडें घालून नानाचे वाटींत मात्र अंमळ अधिक घालावें. याप्रमाणें सांगितले होतें. त्याप्रमाणें आचारी यांनीं सार वाढावयास आणिलें. सर्वांस वाढून नानास वाढिलें. नाना यांचे मनांत द्राक्षांचें सार असेल, म्हणून पाची बोटें बुडवून तोंडांत घातलीं तों एकच आग जाहली. तोंड तसेंच पसरलें आणि बोलले कीं, दाजी, तिखट लागलें! असें म्हणतांच हे आचारी यांस शिव्या देऊं लागले जे, हे × × × × × दररोज आम्हांस असेंच तिखट घालतात! हे वडिलोपार्जित आहेत, यांस निरोपही देतां येत नाहीं! असें म्हणतांच नाना म्हणाले जे, त्या गरीबांस शिव्या कशास देतां? आपण तिखट लोकांस घालवीत असतां म्हणून ऐकलें होतें तें प्रत्यक्ष आजच पाहिले! आतां लोणी दहीं आणवा. नतर लोणी दहीं आणविलें. मग तिखट थोडें शांत जाहलें. त्यांस जन्मात तिखटाचा संस्कार नाहीं. त्यांची फारच आग जाहली! भोजनें होत आलीं तों रामाजी नाईक गोखले म्हणून होते त्यांचा गळा फार मोठा व सुस्वर. त्यांस दाजीनी सांगून ठेविलें होतें कीं, तुम्ही माझे पाठीमागें उभें असावें. मी सूचना करीन त्याबरोबर सारगांत एक असा कडकडावून श्लोक म्हणावा जे, सारी पंगत दचकावी! याप्रमाणे सूचना केली होती, तों त्यांस डोळा घातला. त्याबरोबर त्यांनीं जों श्लोक म्हटला तो नाना दचकून मागें पाहूं लागले! मग दाजीनीं सांगितलें कीं, हे रामाजी नाईक गोखले आमचे पदरींच असतात. असें म्हणतांच नाना बोलले कीं, सारें खरे, परंतु हा मांडव उडाला! आतां धर्मास दुसरा श्लोक म्हणवूं नका! याप्रमाणें हंसूं लागले. नंतर भोजनें जाहली. कचेरीस येऊन विडे घेतले. नानाचा सांप्रदाय कोठें मेजवानीस गेले असतां कोणी अहेर केल्यास तें पागोटें बांधून घालावें. त्यांचे पगडबंद भिकंभट म्हणून होते त्यांनीं दाजीस सूचना केली कीं, पागोटें बांधावयास द्यावें. तेव्हां दाजीनीं सांगितलें कीं, आमचा सांप्रदाय पागोटें बांधून अहेर करावयाचा नाहीं. तेव्हां गंगाधररावकाका बोलले कीं, आपण असें कशास करतां? बांधूनच अहेर करावा. त्यास दाजीनीं उत्तर केलें की, कांही चिंता नाही. तसाच अहेर करूं. नंतर कचेरींत सर्वांस अहेर केले तों नानाचे अहेराचा सरपोस सोडून गंगाधररावकाकानीं पुढें ठेविला. दाजीनीं पागोट्याचा पदर चुणून हातांत घेतला. तों नानानीं मोकळें पागोटें पाहून मनांत समजले कीं, आतां ही परीक्षा दिसती! यास कांहीं बहाणा योजावा. असें मनांत आणून बोलले कीं,

१ ही भारी आचरट व थट्टेखोर व्यक्ति होती. नोतयाची धामधूम सुरू असतां तो पकडला जाईल तर आपण श्रीविष्णूपुढे नग्न होऊन नृत्य करू असा याने नवस केला होता !!!

दाजी, आपणास समजलें ? पूर्वी गोविंदपंतनाना पुण्यांत होते त्या वेळेस आमचे बाबांचा व त्यांचा अत्यंत स्नेह. रात्रीं फराळ करावयाचा जाहल्यास एकमेकांस सोडून करीत नव्हते. केवळ एकोदर बंधुच कीं काय, अशा लोभानें वागत होते. त्यापेक्षां आपले घरीं आम्हांस वस्त्रें घ्यावयाचीं नाहींत. असे म्हणतांच दाजी बोलले कीं, नाना, ठीक योजिलें ! मिरजेहून पंढरीनाथतात्यानीं आम्हांस लिहून पाठविलें कीं, आपण वडील तेथें आहां. बाळास पाठविलें आहे, त्यास कोणे गोष्टीची न्यूनता न पडतां समारंभ चांगला करावा. श्रीमंतांस व नानास सर्वांस लग्नास बोलावून आणवावें. मेजवानी, वस्त्रें, सारा मजकूर लिहिला. त्याप्रमाणें आपण आलां, समारंभ चांगला केला, आणि वस्त्रें न घेतां गेलां म्हणजे आमची येथें दरबारांत किती प्रतिष्ठा आहे याची परीक्षा जाहली ! आणि लौकिकांत ही गोष्ट फार योग्य दिसेल ! त्यास आम्ही अहेर केल्याखेरीज आपणास जाऊं देतों कीं काय ? असें म्हणून हातांत पागोट्याचा पदर दिला. तेव्हां नानानीं पागोटें बांधिलें तें जशीं लहान मुले गुंडाळतात त्याप्रमाणें गुंडाळलें ! शेला घालून नमस्कार होईपर्यंत मोठी पराकाष्ठा जाहली ! नंतर चांगलें बांधलेले पागोटें दुसरें घातलें. नंतर निरोप घेऊन निघाले. ते वेळेस नाना गोविंदभटजी निजसुरे, त्यांचे उपाध्ये, यांस बोलले जे, गोविंदभटजी, दाजीनीं आमची परीक्षा पाहिली ! आम्हांस तिखट घातलें, श्लोक म्हणविला आणि मला पागोटें बांधावयास येतें किंवा नाहीं हें कोणास ठाऊक नव्हतें तीही परीक्षा पाहिली ! असें बोलून पालखींत बसून पुरंदरास गेले. याप्रमाणें दाजी यानीं नाना फडर्णास यांची परीक्षा पाहिली.

---

१ हे निजसुरे उपाध्ये नेहमी नानाजवळ असत व दरबारात कोणाची कामें करून देऊन कांही पैकाही मिळवीत बजाबा बावळे म्हणून नानाच्या मर्जीतले एक कारकून होते त्याजकडे नाना किरकोळ न्यायमनसुबीची कामे कधीमधी सोंपवीत असत. हरिपंत फडके हेही मूळचे फडणिशीकडचे कारकून असून केवढ्या योग्यतेस चढले होते हें प्रसिद्धच आहे. नानाजवळ राजहंस आडनावाचा कोणी कारकून होता त्यास बढती मिळण्याचा योग येईना. बिचारा पुष्कळ वर्षे वाट पाहून पाहून थकला. शेवटी त्यानें खाली लिहिलेला श्लोक चिठ्ठीवर लिहून नानाकडे पाठविला–

**भानूदयीं निजसुरा भट होय जागा ॥**
**तो बावळा असुनि न्याय करी बजा गा ॥**
**पीतांबरासमहि त्या फडक्यास मान ॥**
**मी राजहंस फुटक्या कवडी समान ! ॥ १ ॥**

यांत भानु, निजसुरा, बावळा, पीतांबर, फडका या शब्दांत श्लेष आहे हें श्लोक वाचताच ध्यानांत येण्याजोगे आहे. २ पूर्वीच्या काळांत सर्वच लोक पागोटी घालीत असत यामुळे ज्याचें त्यास पागोटें बांधता येणें जरूरच होते. मग तो किती का श्रीमंत असेना ! नानास पागोटें बांधता येत नव्हते हा त्याचा उणेपणा दाजींनी उघडकीस आणिला ! त्या काळची पागोटी लहान असून बांधणी अगदी साधी असे. चक्रीदार पागोट्याची तऱ्हा पेशवाई गेल्यानंतर निघालेली असून ती पुण्यांत प्रथम मोघे आडनांवाच्या कोणी पगडबंदाने काढिली असे सांगतात.

१२२. पुरुषोत्तमरावदाजी एके दिवशीं आपले इनामगांवी मौजे आंबें परगणे मंगळवेढें येथे ठाण्यांचें काम चालत होतें तें पहावयास आले. चार दिवस होते. मौजे चळें परगणे मजकूर येथें निरंजनअय्या ह्मणून जंगम होता तो आंब्यास आला होता. तों दाजी आले त्यांजपाशीं येऊन फारच आर्जवाने पुढें पुढें बोलूं लागला. हे गंगेस[२] स्नानास गेले तेथें समागमे आपण जाऊन त्याजवळ रुद्राक्षांची माळ सोन्यांत गांठविलेली होती ती पाण्यांत भिजवून दाजीजवळ ठेविली, आणि जगम बोलला जे, ही माळ आपण घ्यावी. तेव्हा हे जप करीत होते, कांहीं बोलले नाहींत. माघारे येते वेळेस सांगितलें कीं, आम्हांस कांहीं ही माळ नको. असे म्हणून ठाण्यात आले. भोजन जाहलेनंतर मंगळवेढ्यास जातेसमयी गावांतून जयराम पाटील यास बोलावून आणवून ताकीद केली जे, हा जंगम जर पुन्हां गांवांत आला तर तुझे डोचके फोडीन ! हा चोर आहे. असे सागून मंगळवेढ्यास गेले. पुढें आठपंधरा दिवशी पंढरपुरीं दरवडा पडला त्या दरवड्यांत हा जगम सांपडला. त्यास बेडी घालून मिरजेस बंदींत पाडिला. याप्रमाणें दाजी यांची मनुष्य–परीक्षा होती कोण मनुष्यें कशी हें त्यांचे तोडावरून ओळखीत होते. ही कथा पुरंदरास रहावयाचे पूर्वीची.

१२३. दाजी यांनी पंढरीस मंगळमूर्तिबावा महान साधु होते त्यांस पालखींत बसवून आंब्यास आणिलें. त्यानी आंब्यास येऊन आंत किल्ल्यांत श्रीउत्तरेश्वर शिवालय आहे,तेथें रात्रीं निद्रा केली. दुसरे दिवशी प्रातःकाळीं उठून दाजीस बोलले कीं, अरे पुरुषोत्तम, तुला नाना पेशवे यांनी हे स्थळ दिलें आहे हे तुझे वंशपरंपरेनें चालेल. कांहीं चिता नाहीं. असें म्हणतांच दाजीनीं पायांवर डोई ठेविली. बावानी मस्तकीं हात ठेविला. याप्रमाणें दाजी यांजवर भगवद्भक्तही कृपा करीत.

१२४. एके दिवशीं पुरंदरीं दाजीचे चिरंजीव तात्या श्रीमंत बाईसाहेबांकडे दर्शनास गेले तों बाईसाहेब बिछान्यावर बसल्या होत्या. त्यांचे बंधु महिपतराव बापू साठे आले ते बिछान्यावर बसले. तों तात्या गेले. तात्यानीं नमस्कार करून खालीं जाजम होतें त्यावर बसूं लागले. तो बाईसाहेब बोलल्या जे, अरे तात्या, वर बैस. तुला काय, जसा माझा बापू तसा तूं. असे ह्मणतांच हे तसेच बसले. तों बाईसाहेब पुढें वांकून हातास धरून ओढून आपले बिछान्यावर बसविलें. याप्रमाणें बाईसाहेबांचा पूर्ण लोभ. केवळ आपले मुलाप्रमाणें मानीत

१२५. एके दिवशीं पुरुषोत्तमरावदाजी आपले घरीं भोजन करून विडे खात बसले. बसावयाचा पांढरा बुर्णूस होता तो फाटका होता. तों अकस्मात् नाना फडणीस बातमी राखून आले ते फाटक्या बुरणुसावर बसले. दाजी बोलले, ' नाना, हें काय ! अरे,

१ किल्ला बाधण्याचें. २ भीमेस.

गालिचा आणा, ' म्हणून सांगतात, तों नाना बोलले कशास गालिचा ! हा बुरणूस बरा आहे. दाजी, बुरणूस धड नाहीं कीं काय ? तेव्हां दाजी नानास बोलले, नाना, आमचें शिलेदाराचें काय, मिशीवर तांदूळ ठेऊन संसार करावयाचा ! असें म्हणतांच नाना हंसूं लागले.

१२६. आणखी एके दिवशीं दाजी दरबारास गेले तों श्रीमंत भवानराव प्रतिनिधि यांची स्वारी आली ती अगोदर दाजीचे घरीं आली पालखींतून उतरले आणि आंत आले. तों तात्या व नाना आंत लिहीत होते. जवळ चिंतोपंत घारपुरे कारकून होते. चिंतोपंत यांनीं उभयतांस घेऊन जाऊन नमस्कार करविला. तेव्हां पंत बोलले कीं, दाजी कोठें आहेत ? चिंतोपंत बोलले कीं वाड्यांत गेले आहेत. नंतर बोलले कीं, वहिनी कोठें आहेत ? असें ह्मणून तसेच आंत गेले तों मातोश्री आई वाती करीत होत्या तेथें आले; आणि वहिनी, नमस्कार करितो, ह्मणून भुईस हात लावून नमस्कार केला. तेव्हां चिंतोपंतानीं विनंति केली कीं, महाराज, आपण यजमान. हे काय ! मग पंत बोलले कीं, दाजीचे घरीं तसे ह्मणावयाचें नाहीं. मी दाजीचा धांकटा बंधु असें बोलले.[2] नंतर वाड्यांत गेले. याप्रमाणें पंतांचा पूर्ण लोभ.

१२७. पंतानीं वरचेवर सांगावयाचें कीं, दाजी, एक वेळ कऱ्हाडास यावे, असें सांगत. तेव्हां एकदां चिचणेरास कानिटकर दाजींचे श्वशुर होते तेथें हे गेले होते. तेथून पुण्यास जावयाचें तें कऱ्हाडास सांगून पाठविलें कीं, मी आपल्यास भेटून पुण्यास जाईन, अशी सूचना केली होती. दाजी चिंचणेराहून निघाले ते कऱ्हाडास गेले. अगोदर श्रीगंगेस स्नानास उतरले. समागमें तात्यास घेतले होतें. पालखी, दहा पांच घोडीं, याप्रमाणें गेले. गंगेवर आले ह्मणून पंतांस बातमी लागली आणि पंत लवाजमा, पालखी, हत्ती स्वार घेऊन आपण पायानें सामोरे आले. तों घोडी माणसें पाहून दाजी बोलले कीं, काय करावें ! किंवडा सामोरा आला ! पंतांस ऐकूं येत नव्हतें. लढाईत गुरघुंसाची जखम लागून कान गेले होते. जखम डोकींत लागली होती. यांनीं संध्या आटोपून शेला पागोटें घालून तयारी करितात तों पंत जवळ आले. हे दहापांच पावलें आडवे जाऊन वांकून नमस्कार केला. पंत भेटले. दाजी बोलले कीं, हें काय केलें ! आपण आडवे कशास्तव आलां ! आह्मी सेवक आपले. असें म्हणतांच पंत बोलले कीं, आपण वडील बंधु म्हणून आलो ! दाजीनीं विनंति केली कीं, आतां पालखींत बसावें. पंत म्हणाले कीं, कशास पाहिजे ? असें ह्मणून तसाच हात धरून चालत वाड्यांत गेले. जाऊन श्रीदेवीचें दर्शन करविलें. नंतर मागील चौकांत गेले तों पंतांच्या उभयतां स्त्रिया होत्या व मावशी होती त्यांस पंत बोलले कीं, मा-

१ सन १७७५ च्या फेब्रुवारांत भवानराव प्रतिनिधि पुरंदरास होते. पहा ऐ. ले. स. न. १४४०.
२ यावरून भवानराव पुरुषोत्तमरावापेक्षां वयाने लहान होते हें सिद्ध झालेंच. अर्थात् ते स. १७७७ त वारले तेव्हां त्यांच्या वयास अठ्ठेचाळीस वर्षे झाली नव्हती. ३ गुरघूस हें गदेसारखें एक हत्यार आहे.

वशी, त्यांस नमस्कार करावयास सांगा असें म्हणतांच त्यांनी येऊन दाजीस नमस्कार केला. दाजी बोलले कीं पंत, हें काय? असे म्हणून पुन्हां दाजीनी उभयतां बाईसाहेबांस नमस्कार केला. नंतर माजघरांत आले. मग आंबे पिकले आणविले. तऱ्हेतऱ्हेचे आंबे आणून पाट व ताटें मांडिलीं. तेव्हां तात्यानी शेला पागोटें काढून पाय धुवून पाटावर बसले. दाजी तसेच बसले. मग आंबे चिरून काप वरचेवर ता त घालीत. पंत आंब्याचीं नांवें सांगत. हा अमका आंबा, हा अमका आबा इत्यादि. पत बोलले की दाजी, तुमचे चिरंजीव अंगरखा पागोटें काढून आंबे खावयास बसले, आणि आ पण तसेच बसला? असें ह्मणतांच दाजी बोलले कीं, त्यास काय टाऊक? आंबे खावयास पागोटे काढल्यावर मग जेवावयास काय करावें? नंतर पंत हंसों लागले. मग भोजनें झाली. आठ दिवस ठेऊन घेतले आपले प्रपंचाची सारी शिस्त दाखविली. खर्च काय, आदा काय, हे सारें दाखवून मग पंतांचा आग्रह पडला जे, दाजी, तुह्मीं माझेजवळ रहावें. तुम्ही जितकें पाणी प्यावयास सांगाल तितकें पाणी पिऊन राहीन! दाजी बोलले की, मी एकाचा चाकर आहेंच, आणि आपलेजवळ कसा राहूं? त्यांजपाशी मागून घ्यावे. त्यांनीं निरोप दिला तर येईन.

१२८. याप्रमाणें पंत अगदीं दाजींचे अर्धे वचनांत इतका लोभ पडावयास कारण असें कीं पूर्वीं दादासाहेब यांचे बंदींत पंत होते तेव्हां पंतांस काढून द्यावे अशी मसलत पटवर्धनानीं ठरविली. तेव्हां दाजी यांनी पुराणिकाचा वेष घेतला. बरोबर एक शिष्या, त्याचेजवळ पुस्तक, याप्रमाणे प्रहर रात्रीं आवशीचे गेले. तो चौकीदार यांनी विचारिलें, कोण आहे? यांनी सांगितले कीं, मी पंतांचा पुराणिक आहें. पुराण सांगावयास जात असतों. तेव्हां भटभिक्षुक यांस नेहमीं चौकीदार सोडीत, त्यामुळे हे आंत गेले. तों पंतानी ओळखिले. क्षणभर दाजी तेथें बसले. नंतर पंतांस सूचना केली की, आतां निघावें. तेव्हां पंत बोलले कीं, दाजी, हे काय करतां? सापडल्यास उभयताची अब्रु जाईल! हे बोलले कीं, आपणास काय, आपण निघावें. ही माझी पोथी काखेत घ्या. असें म्हणून पोथी काखेंत दिली. प्रथम शिष्या आणिला होता तो शूद्रच होता. त्यास ब्राह्मणाचा वेष दिला होता. तो शूद्र पुढें, त्याचे पाठीमागे दाजी, त्याचे पाठीमागे भवानराव प्रतिनिधि, याप्रमाणें निघाले तों चौकीदार यांनी विचारिलें, कोण आहे? तेव्हां दाजी बोलले कीं, पुराणिक आहे. पुराण जाहले, आतां माघारे जातों. चौकीदार बोलले की हा तिसरा कोण आहे? तेव्हां दाजी बोलले कीं, पंतांनीं पोहचवावयास माणूस दिला आहे असें म्हणून गोटाचे बाहेर आले. तेथे सरंजाम यांजकडील तयारच होता. निघून पार जाहले. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं समजलें की प्रतिनिधि पळाले[1]! त्या दिवसापासून दाजींवर पंतांचा पूर्ण विश्वास. जे दाजी सांगतील तें प्रमाण.

---

१ भवानराव प्रतिनिधीस दादासाहेबानी प्रतिबंधात ठेवण्याचा प्रसंग स. १७६३ साली घडलेला असावा.

१२९. भवानराव व भगवंतराव या उभयतांचा कज्जा होता. तेव्हां भगवंतराव यांजकडील हणमंतभट म्हणून होते, परंतु शिपाई मोठे मर्द माणूस होते[1]. तेव्हां हणमंतभट हे विटें खानापुरांत होते तेथें भवानराव ठाणीं घालावयास आले असतां हणमंतभट यानीं गोळी वाजविली. खानापूर लढों लागले. तेव्हां भवानराव यांचें पत्र दाजीस आलें जे आपण यावें. आणि हणमंतभट यांचेंही पत्र दाजीस आले जे, आपण यावें, आणि पंतांचा व माझा सल्ला करून द्यावा. तेव्हां दाजी पुरंदराहून श्रीमंतांचा निरोप घेऊन खानापुरास गेले. जाऊन हणमंतभटास बोलावणें पाठविले जे, भेटीस येणें. बाहेर पंतांचे मोर्चे बसलेले. दाजींचें बोलावणे जातांच हणमंतभट त्या वेळेसच बाहेर पडून पुरुषोत्तमरावदाजीचे राहुटीस आले. दाजीनीं त्यास विचारिले जे, तुह्मी लढाई किंनिमित्त करितां ? तुम्हांस उभयतां यजमान सारखेच. तेव्हां हणमंतभट बोलले जे, जसा आपण माझा बंदोबस्त कराल तो मला शिरसावंद्य आहे. असें म्हणतांच दाजी बोलले की अगोदर पंतांचे भेटीस चला. तेव्हां हणमंतभट बोलले जे, आपण पंतांचे कानावर मजकूर घातला नाही आणि कसे घेऊन जातां ? दाजी बोलले की, तें तुम्हांस काय, तुमच्या केसास धक्का तो माझ्या प्राणास. असें म्हणून हणमंतभटास घेऊन निघाले ते पंताचे लष्करांत आले. तेव्हां लष्करचे लोकांनीं हणमंतभटास पाहून आश्चर्य करूं लागले. तेव्हां दाजी पंतांचे राहुटीजवळ गेले. बाहेर हणमंतभटास बसवून आपण आंत गेले. पंतांनीं दाजी येतांच उठोन उभे राहून भेटले. आणि बोलले जे, आपण आलां, ठीक जाहले. असे म्हणतांच दाजी बोलले की, हणमंतभट आपले पदरचा असे असून त्यांसीं लढाई करण्याचें काय प्रयोजन ? पंत बोलले जे, तोच किल्ला लढवीत आहे. तेव्हां दाजी बोलले कीं, मी त्यास भेटीस आणवितों. पंत बोलले कीं, तो येणार नाही. असे ह्मणतांच दाजीनीं हणमंतभटास हांक मारिली. हांक मारितांच ते आंत आले. दाजी बोलले कीं, पंत, हणमंतभटास भेटावें. असें म्हणून उभयतांची भेट करविली. नंतर तेथेंच बसून हणमंतभटाकडून किल्ल्याची सोडचिठ्ठी देवविली. पंताचे निशाण वर चढविलें व भगवतराव यांचे वेळेस हणमंतभटाचा जसा बंदोबस्त होता त्याप्रमाणें पंतांकडून करवून देऊन त्यास त्याचे गांवास जरा बाजरा सुद्धां पोहोचवून देऊन पंतांचा निरोप घेऊन आपले घरास आले. याप्रमाणें पंत अगदी अर्धे वचनांत होते. पंत यांचा आपलेजवळ राहणेचा फारच आग्रह पडला, मुलास तरी ठेवा म्हणों लागले, तेव्हां बळवंतरावकाका यांचे नांवची असामी करून घेतली. याप्रमाणें कथा वडिलानी सांगितली ती लिहिली असे[2].

---

१ हणमतभटाचे नाव ऐ. ले. स न. १८२४।१८२५ मध्ये आले आहे २ हीं १२९ सदरामधील गोष्ट स. १७७६ च्या एप्रिलात घडली असावी. कारण त्या वेळी पुरदराहून पुरुषोत्तमरावदाजी भवानरावाच्या लष्करात आले होते. पहा ऐ. ले. स. न. १८३५.

१३०. पुरंदरास दाजीनीं श्रीमंतांजवळ मुखत्यारी केली. वाड्यांत दरोबस्त हुकूम पुरुषोत्तमरावदाजी यांचा. वाड्यांतील हुजूरचे कामगार यांस नाना यांनीं हें असें कां केलें म्हणोन विचारलेवर त्यांनी सांगावें जे, दाजी यांनीं सांगितले म्हणून केले. मग नानानीं कांहीं बोलूं नये.

१३१. नाशकाकडे त्रिंबकचे किल्ल्याचे बंदोबस्तास दाजी गेले होते[1]. तेव्हां रघुनाथरावदादा कुरुंदवाडकर बरोबर होते. त्यांनीं वडिलांजवळ दाजींची गोष्ट सांगितली ती लिहितों. तिकडे गेले होते तेव्हां वेरुळास गेले. पूर्वी वेरूळची पाटीलकी त्रिंबकपंतआपानीं खरेदी घेतली होती. तेव्हा हे पाटील आपल्या गांवीं आले म्हणून गांवकरी यांचे भेटीस आले. तेव्हां दाजी यांनी एक काळी घोंगडी व एक काठी आणविली आणि ती रघुनाथरावदादा यांचे खांद्यावर काळी घोंगडी व हातांत काठी देऊन त्यांस त्या गांवकऱ्यांत नेऊन उभें केले आणि भेट आणविली ती दादांकडून आपलेपुढें ठेवविली; आणि त्या कुणब्यांत दादांस बसविलें ! ही कथा दादानी आपले मुखे वडिलांजवळ सांगितली की, मला असें जाहले जे, या कुणबटांतून दाजी केव्हां ऊठ म्हणतील ! नंतर मग गांवकरी यांस निरोप दिला मग दादानीं घोंगडी काठी फेंकून दिली ! याप्रमाणें विनोद, मस्करी करण्याचा सांप्रदाय दाजींपासून पटवर्धन यांचे घरीं प्रसिद्ध जाहला.

१३२. पुरंदरास असतां परशुरामभाऊची पत्नी[4] गर्भिणी जाहली हे वर्तमान दाजीस समजलें. मग डोहाळ्याचा जिन्नस तेथून रवाना केला तो तासगांवास आला. तीं पत्र परशुरामभाऊनी वाचून पाहिली त्यांत जिनसाचें पत्र व त्याबरोबर तो बस्ता कापडानें बांधिला होता. तेव्हां भाऊ म्हणाले जे, ही कांहीं मस्करी दाजीनीं केली असेल. जिन्नस तिकडे घरांत नेऊन सोडा ! असें सांगून राधाबाई ताईकडे जिन्नस रवाना केला. कारकुनानीं पत्र वाचून दाखविलें आणि तो बस्ता सोडावयास लागले. प्रथम पांढरें कापड सोडलें तों आंत खारवा निघाला. त्याचे आंत गजनी; त्याचे आंत हंबरू, किनखाब वगैरे असे सात तट होते. आंत रुप्याचा डबा पाहिला. तो जों उघडतात तो आंत मोठा थोरला खेंकडा पाहिला ! तों सारे हंसूं लागले. हें वर्तमान परशुरामभाऊस समजलें. मातुश्री आईसही[5] समजलें. सारे हंसूं लागले. याप्रमाणें विनोद करण्याचा सांप्रदाय होता.

---

१ दाजी त्रिंबकच्या किल्ल्याचा बंदोबस्त करण्याकरिता गेले ते स. १७७४ च्या एप्रिल महिन्याच्या दुसऱ्या पंधरवड्यात. ते गंगापुरास गोपिकाबाईजवळ राहिले असता त्यास भेटण्याकरिता रघुनाथराव लष्करातून आले होते. पहा ऐ. ले. स न. १३६४. २ हे वेरूळ कोणते ? लेण्याचें वेरूळ तर खचित नव्हे. की गावाचे नाव लिहिण्यात काही चूक आहे ? त्रिंबकपंत आप्पा हे रघुनाथराव कुरुंदवाडकर यांचे आजे. ३ पाटील कोणते हे गांवकऱ्यास माहीत नसल्यामुळे दाजी आपण पाटील बनले व खरोखरीचे पाटील यास गांवकऱ्यात कुणब्याचे सोंग देऊन उभे करून त्याजकडून आपणापुढे भेट ठेवविली ! ४ परशुरामभाऊची स्त्री. ५ भाऊची आई जानकीबाई.

१३३. दाजीनीं लष्करांत देखील मस्करी करावी. एके दिवशीं थोरले श्रीमंत माधवरावसाहेब असतां लष्करांत दाजीनीं एक घूस धरून आणिली आणि तिच्या शेंपटास पलिते गुंडाळून शेंपूट पेटवून रात्री सोडून दिली. ती गोटोगोट हिंडूं लागली. तों छापा आला ह्मणून सारे लष्करांत गलबल जाहली! तों ती घूस पेटलेलें शेंपूट घेऊन श्रीमंतांचे लष्करांत खासा वाडाचे आंत गेली. तेव्हां तेथेंही गलबल जाहली. मग हवया पेटवून पाहतात तों घूस ह्मणून समजलें! नंतर चौकशी केली जे, ही आली कोठून? तों पटवर्धन यांचे गोटांतून आली असें समजलें. तेव्हां श्रीमंत बोलले कीं, ते पुरुषोत्तमराव याचें काम! दुसरे दिवशीं श्रीमंतानीं विचारिलें आणि बोलले जे, असें करूं नका. खरें किंवा लटकें कांहींच न समजतां एखादे वेळेस तुह्मांस कठिण जाईल! श्रीमंतांचा राग मोठा, परंतु पुरुषोत्तमराव यांजवर पूर्ण कृपा, यामुळें ती गोष्ट खपली[1]! याप्रमाणें मस्करी करावयाचा दाजींचा सांप्रदाय होता.

१३४. पुरंदरास असतांना हरिपंततात्यानीं येऊन सांगितलें कीं, आज दादासाहेब यांजकडील मंडळी[2] वगैरे श्रीमंतांच्या भेटीस येणार ते आपलेकडे येणार आहेत. त्यास आह्मी गोष्ट दादासाहेब यांची काढितो. नंतर आपण मोघम त्या मंडळीस शिव्या द्याव्या! असें सांगून ठेविलें. नंतर ती मडळी किल्ल्यावर आली. येऊन दाजीकडे आले तों हरिपंततात्या व लक्ष्मणपंत देशमूख हे प्रथम येऊन बसलेच होते. त्यांनीं गोष्ट काढिली जे, दादासाहेब केवळ सांब अवतार असें असतां ही गोष्ट जाहली हें फार वाईट जाहले! असें बोलतांच दाजी बोलले की, दादासाहेब भोळे, त्यांजकडे काय! परंतु जवळ चार लुच्चे होते त्यांनीं नासलें! ती मंडळी ह्मणूं लागली जे, दाजी, मी त्यांत नाही. दुसरे ह्मणूं लागले जे, मी त्यांत नाहीं. 'जवळचेच ××××× ! दादासाहेबांकडे कांहीं नाहीं' असें दाजी पुनः पुनः बोलते. तेव्हां ते ह्मणूं लागले, आपण आमची पूजा केली! कोणीं केलें तरी सर्वांवर येणार. असें बोलून नंतर ते आलेले गृहस्थ निरोप घेऊन गेले.

१३५. सरकारांतून दाजीस दौलताबादेस तोतयाचे चौकशीस पाठविलें तेव्हां ते दुसरा मातबर मनुष्य समागमें मागून घेऊन गेले. तेथें जाऊन तोतयाकडे चार वेळ गेले ते सरकारचे कारकुनाखेरीज गेले नाहींत. त्यास विचारिलें जे, भाऊसाहेब यांच्या व आमच्या बहुत वेळ गांठी पडोन बोलणी जाहलीं आहेत. त्यांतील खुणेची गोष्ट एक सांगा. असें म्हणतांच तो बोलला त्यांतील कांहीं एक गोष्ट पटली नाही. तेव्हां त्याचे तोंडावर दाजी बोलले जे, तूं ××× लबाड आहेस. थोराचे नांवास बट्टा लावावयास आलास! याप्रमाणें साफ उत्तर सांगून निघून आले.

१ या गोष्टीत काही अतिशयोक्ति आहे. २ पुरंदरचा तह ठरल्यावर दादासाहेबास मात्र इंग्रजांनी सुरतेंत राहूं दिले व बरोबर सरदार व कारकून वगैरे होते त्यास काढून लाविले. ते लोक हरिपंततात्याकडे आले तेव्हां त्यांस बरोबर घेऊन तात्या फौजेसह परत पुण्यास आले. त्यानंतरची ही १३४ सदरांतली गोष्ट.

१३६. पुढें तोतया मिरजेस आणून ठेविला. सखारामबापूचे वांकुडपणामुळें बुद्ध्या मिरजेचे किल्ल्यांत कैदेंत ठेविला. नंतर पांडुरंगरावतात्या यांनीं वरचेवर दाजीस पत्रें पाठविलीं जे, तोतया येथून काढून आणखी कोठें ठेवावा. येथील मंडळी त्याजकडे येतात संवरतात. सरकारी एकादा पेंच येईल. असें लिहिलेवर दाजीनीं सरकारांत विनंति करून कोंकणांत रत्नागिरीस किल्ला आहे तेथें पाठविला.

१३७. तो किल्ला रामचंद्र नाईक परांजपे यांजकडे होता. तेथें त्यांची स्त्री अन्नपूर्णाबाई ह्मणून होती, ती फितून तोतयानें तो किल्ला बळकावून दरोबस्त कोंकणपट्टींत ठाणी घातली व कोंकणपट्टीतील किल्ले सारे घेतले. तों एके दिवशीं पुरंदरास पत्र आलें त्यांत लिहिलें होतें कीं, सुवर्णदुर्ग किल्ला तोतयानें घेतला. तो किल्ला हरिपंत फडके यांजकडे होता. तेथे हरिपंत यांचे पुतणे होते. तेव्हां लक्ष्मणपंत देशमुख दाजीकडे येऊन सांगूं लागले कीं, आज सुवर्णदुर्ग किल्ला तोतयानें घेतला अशीं सरकारांत पत्रें आलीं. तो किल्ला हरिपंत फडके यांजकडे होता. त्यास मी आज जेवतांना गोष्ट काढतों. आपण हरिपंत यांस पुष्पें समर्पण करावीं ! असे सांगून गेले. दाजी राहिले होते त्याच घरांत दप्तरचे कारकून जेवीत माजघरांत निम्मे कुड घालून निम्मेंत दप्तरचे कारकून जेवीत आणि निम्मे घरांत दाजी रहात. तों तिकडे कारकून मंडळी भोजनास बसली त्यांतच हरिपंत जेवीत. इकडेही दाजी भोजनास बसले भोजन करतांना दाजीनी विचारिलें जे, देशमुख, आज सरकारांत तोतयाचें वर्तमान काय आहे ? तेव्हां देशमुख बोलले जे, सुवर्णदुर्ग किल्ला तोतयानें घेतला ह्मणून पत्रें आली. तेव्हां दाजीनीं विचारले जे, तो किल्ला कोणाकडे होता ? तेव्हां देशमुख बोलले कीं, हरिपंतांकडे होता. मग दाजी बोलले कीं, अहो, हे ××× असेच किल्ले गमावतील ! आम्हाकडे किल्ला कोणी देईना ! कसा तोतया घेतो पाहीन ! असें ह्मणतांच हरिपततात्या बोलले जे, दाजी, मी समजलों. आमची पूजा आपण केली ! दाजी बोलले कीं, तात्या, आपणास मी कांही ह्मटलें नाहीं. बरें, मला एखादा किल्ला देऊन पहावयाचा होता कसा तोतया घेतो तो ! तात्या बोलले कीं, त्या पोरानें दाजी, माझे तोंडास काळोखी आणिली. याप्रमाणे भोजन करतांना बोलले. भोजनें जाहलियावर हरिपंततात्या दाजीकडे आले. नतर सारे वर्तमान सांगितले. चार घटका बसून इकडील तिकडील वर्तमान सांगून निघून गेले. याप्रमाणे पुरंदर मुक्कामीं दाजी यांनीं सरकार चाकरी एकनिष्ठपणें करून लौकिक संपादन केला.

१३८. आतां मूळपुरुषापासून वंशावळ लिहितों. मूळपुरुष हरभट. त्यास तीन पुत्र जाहले. प्रथम बाळंभट. दुसरे कृष्णंभट. तिसरे रघुनाथभट.

१३९. त्यांत वडील बाळंभट यांस तीन पुत्र जाहले. पहिले हरभटबावा ब्रह्मीभूत. केशवभट दुसरे. विठ्ठलभट तिसरे.

१४०. हरभटबावा ब्रह्मीभूत यांचा वंश त्यांस पुत्र सात, कन्या एक. त्यांचीं नांवें:– वडील कृष्णंभट बापाजी. बाळभटअण्णा दुसरे. त्रिंबकपंतआप्पा तिसरे. गोविंदपंतनाना चवथे, महादेव पांचवे. रामचंद्रपंतआप्पा सहावे. भास्करपंतआप्पा सातवे. ताराबाई कन्या आठवी, वैशंपायन यांचे घरी दिली.

१४१. कृष्णंभट बापाजी वडील पुत्र त्यांचा वंशविस्तार– त्यांस स्त्रिया दोघी. प्रथम राधाबाई, माणकापुरकर लेले यांची कन्या. दुसरी दुर्गाबाई, भिडे यांची कन्या. प्रथम स्त्रीस सहा पुत्र व दोघी कन्या वडील वेणूबाई, जोशी यांचे घरी दिली. दुसरी भीमाबाई, काळे यांचे घरीं दिली. नारायणरावनाना तिसरे. पुरुषोत्तमरावदाजी चवथे पुत्र. मेघश्यामरावबापू पांचवे. जनार्दनराव सहावे. महादेवरावअण्णा सातवे. बळवंतराव-काका आठवे.

१४२. नारायणरावनाना वडील पुत्र यांच्या स्त्रिया दोघी. रखमाबाई व वाराणसी-बाई. त्यांस पुत्र नाहीं, सबब पुरुषोत्तमरावदाजी यांचे पुत्र दत्तक घेतले. प्रथम कृष्णराव दत्तक दिले. त्यांस पत्नी म्हैसकर याची कन्या केली. तिचे नाव गोपिकाबाई. ते कृष्णराव अल्प वयांतच देवाधीन जाहले. त्यास वंश नाहीं. नंतर दाजींचे दुसरे पुत्र सदाशिवराव दत्तक दिले त्यांचा वंश. त्यांस स्त्रिया दोघी तेही पराक्रमी त्यास स्वर्‍यांचे स्वारीस भाल्याची जखम लागली, तेव्हा सरकारातून शिरपेंच देऊन वस्त्रें दिली. त्यांस प्रथम स्त्री पार्वतीबाई, काळे यांची कन्या. दुसरी स्त्री भार्गीरथीबाई. पाटणकर यांची कन्या. प्रथम स्त्रीस संतति पुत्र नारायणराव व कन्या रखमाई. दुसरी स्त्री भागीरथीबाई तिजला संतति कन्या प्रथम शिऊबाई दुसरी कन्या दुर्गाबाई, गाडगीळ यांचे घरीं दिली. तिसरे पुत्र पांडुरंगराव. चौथे रामचंद्र. पांचवे नारायण. सहावी कन्या योगा. सातवे जनार्दन. याप्रमाणे कृष्णंभट बापाजी यांचे प्रथम पुत्र नारायणराव कृष्ण यांचा वंश लिहिला.

१४३. आतां दुसरे पुत्र पुरुषोत्तमरावदाजी यांचा वंश लिहितो. त्यांस स्त्रिया दोघी. प्रथम गोपिकाबाई. दुसरी कृष्णाबाई, चिचणेरचे कानिटकर यांची कन्या प्रथम स्त्रीस एक कन्या जिऊबाई जाहली ती रास्ते यांचे घरी दिली. दुसरी कृष्णाबाई तीस संतति प्रथम पुत्र हरिहररावतात्या. दुसरे पुत्र कृष्णरावनाना दत्तक दिले. तिसरी कन्या मनाबाई, सोनी यांचे घरीं दिली. चवथे पुत्र विठ्ठलराव बापाजी. पांचवी साळूबाई[1] जुळी. सहावे[1] रामराव जुळे, सातवे सदाशिव हे नारायणराव यांस दत्तक दिले. आठवी यमुनाबाई कन्या.

१४४. आतां कृष्णाबाई आई यांच्या पुण्यरूप कीर्तीचें वर्णन करितों. ती पुरुषोत्तम-रावदाजी यांचे पश्चात् मंगळवेढ्याहून इनामगांव आंबें येथें येऊन राहिली. निरंतर पुराण-

१ साळूबाई व रामराव हीं जुळी भावंडें.

श्रवणस्नानदानादि कृत्यें करून सत्काल घालविला. मुलें लहान, वडील पुत्र हरिहरराव हे बारा वर्षांचे होते. सर्वांच्या मुंजी व लग्नें करून पुत्रांचे पुत्र, कन्या, त्यांची लग्नें मुंजी वगैरे कामीं लक्ष रुपये खर्च केले. धर्मकृत्य अहकुरुन [illegible] केली पचवीस हजार रुपये खर्चून घर बांधिलें. गांवांत पेठ वसविली. मळे, तळे, [illegible] केले. विहिरी व तळीं बांधिलीं व ओढे फिरविले.

१४५ हरिहरराव तात्या हे प्रथम पुत्र [illegible] परम मातृभक्त, आमरणात् मातुश्रीची आज्ञा उल्लंघन केली व नाही. पंचावन्न वर्षांचे [illegible] होते तोपावेतो मातुश्रीचे आज्ञेंत वागून मातुश्रीचें सार्थक केलें. त्यांनींही दाजीचे पाठीमागें इनामगांव मौजे ओझेवाडी परगणे ब्रह्मपुरी हा गांव सरकारांतून इनाम करून घेतला. दाजींचे पाठीमागें पुण्यांत श्रीमंत सवाई रावसाहेब राजपदीं होते. श्रीमंतांची कृपा पूर्ण होती. नाना फडणीसही कृपा करीत.

१४६. श्रीमंतांचे लग्नांत वर-प्रस्थानाचे दिवशी नानानी आप्पा बळवंत यांस सांगितलें जे, अंबारींत बसावयाच्या मंडळीची यादी लिहिली आहे, ही घेऊन जाऊन त्याप्रमाणें सर्वांस सांगावें. नंतर आप्पा बळवंत याद घेऊन परशुरामभाऊकडे आले[४] आणि सांगितले की, आपणास नानांनी अंबारींत बसावयास सांगितले आहे. नंतर रामचंद्रपंतआप्पास सांगितलें. तेथेंच हरिहररावतात्या बसले होते त्यांस सांगितलें जे, हरिहरराव, तुह्मी व विठ्ठल रावजी गोळे उभयता एक्या अंबारींत बसावें. असें सांगतांच तात्या समजले जे, रामचंद्रपंतआप्पास सांगितले, मी [illegible] बसतों, सबब उगेच भिडेस्तव मला सांगतात, असे समजून आप्पा बळवंत यास बोलले जे, आप्पा, माझी [५]घोडी तयार आहे. मी घोडीवर बसतों. असें ह्मणताच आप्पा बोलले जे, नाना रागें भरतील. घोडीवर बसूं नका. असे सांगून आप्पा गेले, तो श्रीमंतांची तयारी झाली, श्रीमंत अंबारींत बसले. श्रीमंतांचे पाठीमागे दोन दोन अंबाऱ्या जोडून एक्या अंबारींत भाऊ व एक्या अंबारींत नाना अशा दोनी अंबाऱ्या श्रीमंतांचे पाठीमागें. त्यांचे पाठीमागें दोन दोन अंबाऱ्या अशा पांचपन्नास अंबाऱ्या जोडून स्वारी तयार जाहली. हजारों वाद्यें वाजवीत. ती शोभा केवळ स्वयंवराची पूर्वी पुराणांतरीं वर्णन केली त्याप्रमाणें! नंतर नानानी पाठीमागें पाहिलें तों विठ्ठल रावजी गोळे अंबारींत एकटे पाहिले. नंतर आप्पा बळवंत श्रीमंतांचे पाठीमागे [illegible] होते त्यास विचारिलें जे,

---

१ हरिहररावतात्यांचे [illegible] अधिक [illegible] तेव्हांच तात्यास चवदावें वर्ष होतें. २ यावरून कृष्णाबाई [illegible] ३ सवाई माधवराव यांचें पाहिलें लग्न ता. १० फेब्रुवारी १७८३ रोजी झालें. ४ परशुरामभाऊचे [illegible] पुत्र. ५ घोड्यापेक्षा घोडी अधिक चपळ असल्यामुळे बसावयास चांगली, सबब नेहमी घोड्यावर बसणारे पुष्कळ लोक घोड्याच बाळगीत. त्या काळी चागल्या घोडीस कमीत कमी सात आठशें रुपये पडत.

हरिहरराव अंबारींत नाहींत तेव्हां आप्पा बोलले जे, मी त्यास सांगितलें होतें. ते म्हणाले जे, माझी घोडी आहे. मी घोडीवर बसतों. ते घोडीवर बसले असतील. असें ह्मणतांच हरिहरराव यांस बोलावा असें नाना बोलले, तेव्हां भालदार बोलवावयास आले. नंतर हरिहरराव नानाचे अबारीजवळ घोड्यावर बसोन आले. नाना अंबारींतून खाली वांकून बोलले जे, अहो, तुह्मांस आप्पानीं अंबारींत बसावयास सांगितलें कीं नाहीं ? हे बोलले जे, सांगितलें होतें, परंतु माझी घोडी तयार होती ह्मणून घोडीवर बसलों. तेव्हां नाना बोलले जे, उतरा घोडीवरून ! असें ह्मणून यांस घोडीवरून उतरवून विठल रावजी गोळे यांचा हत्ती बसवून त्या अंबारींत यांस बसविलें. नंतर श्रीमंतांचे अंबारीचा हत्ती चालावयास लागला. तोपर्यंत सारी फौज उभी. याप्रमाणें नानांचें लक्ष ! सर्व राज्याचा कारभार करीत, परंतु लक्ष असें होतें. कारभारी श्रीमंतांचे घरापासून गोरगरिबांचे देखील घरीं जाहले. परंतु नानाफडणिसांप्रमाणें कारभारी जाहले नाहींत. आणि जें कृत्य हाती धरिलें त्यांत यश येऊन शेवटास गेलें असें नानाचें मात्र ! नानाप्रमाणे पुरुष मागेही झाला नाहीं व पुढेंही होणार नाही. तेव्हां हरिहररावतात्या व विठलराव गोळे एक्या अंबारीत बसले. श्रीमत वरप्रस्थानास निघाले. त्या वेळेस असें वाटलें की, हे इंद्रभुवन की इद्राची संपत्ति यापुढ तुच्छ, असे वाटून हरिहरराव यांनी विठलरावजीस विचारिलें जे, रावजी, आपण वडील आपण श्रीमंत नानासाहेब यांचे वेळेपासून पाहिले. परंतु माझे बुद्धीस असे येते जे, ही शोभा पूर्वी कांहीं नसेल, आणि पुढेंही होणार नाही ! अशी शोभासंपत्ति ! केवळ इंद्रभुवन असें वाटतें ! तेव्हां विठलरावजी बोलले कीं, "हरिहरराव, आपण बोलतां हें खरे. ही शोभा कांही नानासाहेब यांचे वेळेस नव्हती. हा पुरुष[१] दैववान् विशेष आहे याचे दैवाप्रमाणे श्रीमंतांचे घरच्या पुरुषांत कोणी जाहला नाहीं." त्या लग्नांत बेत तर ऋद्धि सिद्धि ज्यांचे घरीं असे सरदार जेथें पाणी वहाणार[२] तेथें न्यून काय पडणार आहे ! ते वर्णन करावयासही सामर्थ्य कोणास आहे ? हरिहररावतात्या यांस श्रीमंतांचे घरीं असें मानीत पुरुषोत्तमरावदाजी यांचे पराक्रमावर सर्व पदरची मंडळी कृपा करीत.

१४७. दाजींचे वेळेस आंब्यांचीं इनामपत्रे जाहली नव्हतीं, तेव्हां तें तात्यानीं सरकारचे कानावर घातलें. तेन्हां सखारामबाप बोलले जे, श्रीमंत नानासाहेब यांची चिठी आंब्यांचे इनामाविशीं तुम्हाजवळ आहे ती चिठी आणिली ह्मणजे इनामपत्र करून देऊं. ती चिठी कासेगांवावर लढाई होऊन त्रिंबकरावमामा धरले, त्या लढाईंत गेली. ती चिठी कलमदानांतच होती. मोड जाहला ते वेळेस कलमदान गेलें त्याबरोबर ती चिठीही गेली. तेव्हां तात्यानीं चिठी गेली म्हणून सांगितले. मग बापू बोलले कीं, इनामपत्रें व्हावयाचीं

१ सवाई माधवराव. २ पेशव्याच्या घरी लग्नकार्यांत पाणी भरण्याचे काम पटवर्धन सरदाराकडे होते ! पहा काव्येतिहाससंग्रह पत्रें, यादी वगैरे ले० ३३१ सदर ६.

नाहींत ! तेव्हां हरिपंततात्यांचे कानावर मजकूर घातला. तेव्हां तात्यानीं मजकूर ऐकून घेऊन बोलले की, बापू, हें काय बोलता ? चिठी गमाविली म्हणून इनाम खोटें जाहलें कीं काय ? दाजीचा कारभार भोळा. इनामपत्रादाखल चिठी. ती स्वारींत बरोबर कलमदानांत कोणी बाळगील कीं काय ? आणिक सरकारचे कामावर लढाई होऊन कलमदान गेलें, असें असतां चिठीचा आक्षेप घेणे हें काय ? त्यास दाजी असते आणि चिठीचा आक्षेप घेता म्हणजे त्याचें उत्तर दाजी करिते. तुम्हांस आता असे करतां नये. नंतर ते हरिहररावतात्यांच्या कारकुनास म्हणाले की, हे सर्व मी नानाचे कानावर घालून तुमचें काम करून देतों. दाजीचा माझा स्नेह, त्यापेक्षा तुमचे कामास दुसरं काही बोलावयाचें नाहीं. असे म्हणून सांगितले की, मी तिसरे प्रहरी नानाकडे जाऊं लागलो म्हणजे मला सूचना करणें. याप्रमाणे चितोपंत घारपुरे, हरिहरराव याजकडील कारकून, त्यास सांगितलें होतें. तिसरे प्रहरीं हरिपंततात्या नानाकडे जाऊं लागले, तेव्हां घारपुरे यांनीं सूचना केली. नंतर तात्या वर गेले तों उभयतां कारभारी बसले होते. तेव्हां हरिपंततात्यानी गोष्ट काढिली जे, मंगळवेढे परगणेत मौजे आबे हा गांव नारायणराव व पुरुषोत्तमरावदाजी यांस इनाम श्रीमत नानासाहेब यांनी दिला, त्याची इनामपत्रे जाहली नाहींत. हल्लीं त्यांचे चिरंजीव हरिहरराव यांनी विनंति करण्याविषयी सांगितले आहे. त्यास इनामपत्रे करून देण्याची आज्ञा व्हावी. असे म्हणतांच सखारामबापू बोलले जे, अहो, श्रीमंत नानासाहेब यांची चिठी त्याजवळ आहे ती चिठी आणून द्यावी, नतर इनामपत्रे करून देऊं. तेव्हां हरिपंत बोलले की, चिठी होती खरी, परतु कासेगांवावर लढाई जाहली तेव्हां मोड जाहला, ते समयीं लुटींत कलमदान गेलें त्यात चिठी होती ती चिठी गमावली. दाजीचा कारभार भोळसर. कलमदानांत कोणी चिठी ठेवील काय ! तेव्हां बापू बोलले कीं, चिठी गमाविली असलियास इनामपत्रें व्हावयाचीं नाहींत. तेव्हां हरिपंत बोलले की, बापू, हीं अक्षरं आपण दाजींस बोलावयाचीं आणि त्यांचे उत्तर दाजीच देते. हल्ली त्यांचीं मुलें लहान. त्यांस ही सबब लावून इनामपत्रें न द्यावयाचीं कीं काय ? प्रत्यक्ष सरकारचे ताळेबंदास आज पन्नास[1] वर्षे इनामखर्च साल दरसाल पडतो. असें असता चिठी गमावली ह्मणून इनाम खोटे जाहले कीं काय ? त्यांतून चिठी काही त्यांचे घरी गळबटली नाही. तुमचे सरकारकामावर चाकरीवर असतां ही चिठी गळबटली. आणखी दाजी येथें तुमचेच कामावर असतां वारले. त्यांचे मनांत बहुत उमेद होती, परंतु आयुष्य सरलें ! उपाय नाहीं. त्यांचे मुलास हेच बक्षीस द्यावयाचे की काय ? असें हरिपंत बोलतांच सखारामबापू अक्षर बोलले नाहींत. नाना ह्मणाले जे, हरिपंत, तुह्मी ह्मणता ते खरे, चिठी गमावली ह्मणोन

१ पन्नास काही नाहीत, फार झालें तर सव्वीस वर्षें. कारण की आबे हा गावच मुळी स. १७५० पूर्वी पेशव्याकडे नव्हता. ही इनामपत्राची भानगड स. १७७७ च्या पहिल्या तीन महिन्यात किंवा ७६ च्या अखेरच्या दोन महिन्यांत पडलेली आहे.

काय जाहले ! तेव्हां हरिपत बोलले की, इनामपत्रे व्हावयाची परवानगी सांगतो. नाना बोलले कीं ' सांगणे. ' तेव्हां हरिपंत खाली येऊन हरे म्हणून कारकून सरकारचे, त्यांस सांगितलें कीं, हरिहरराव पटवर्धन यांस इनामगांव मौजे आर्वे परगणे मंगळवेढे हा गांव पेशजी श्रीमंत नानासाहेब यांनी नारायणराव व पुरुषोत्तमराव यास दिला, त्याची शिरस्त्या-प्रमाणें इनामपत्रे लिहावयाची आज्ञा जाहली आहे, त्यास इनामपत्रे लिहिणे, म्हणून सांगून हरिपंततात्या निघून गेले. नंतर त्यानी दप्तरचा दाखला पाहून चार पत्रे लिहून तयार करून हरिपंत यांचे हवाली केली हरिपंत यांनी नानाकडे नेवून शिक्के करून घारपुरे यांचे हवाली पत्रे करून सांगितले कीं, या कामास तुम्ही सहज हजार पांचशें रुपये देतां, परंतु दाजींचे कामांत मला अक्षर बोलावयाचें नाही त्यास हीं इनामपत्रे ज्यांनी लिहिलीं त्यांस मात्र शंभर रुपये देणें. मग त्यास शंभर रुपये दिले आणि इनामपत्रे घेतली. याप्रमाणें हरिपंततात्यांस पूर्ण अभिमान होता

१४८. कृष्णरावनाना यास वस्त्रे व्हावयाची त्या वेळेस परशुरामपंतभाऊसाहेब पुण्यास गेले होते. हरिहरराव पांडुरंग यांस वस्त्रे दिली ते वेळी कृष्णरावनानास वस्त्रे दिलीं. तेव्हां कचेरीत नानानीं भाऊस विचारिले जे, हा मूल ( दत्तक ) दिला तेव्हा दाजी होते किंवा नाहीं ? तेव्हां भाऊनी सांगितले की. दाजी होते दाजी असतांना या मुलाकडून नारायणराव यांचे श्राद्ध व पक्ष करवीत होते. असे सांगतांच नाना बोलले की, तर मग काय विचारावयाचें ! वस्त्रे आणवा. असे म्हणून वस्त्रे आणवून वस्त्रे दिली. कृष्णराव नारायण म्हणून बेहेडयास नाव लागले. भाऊबंद यानी अडथळा केला होता आणि दाजी वारलेवर मूल दिला असे नानास समजाविले होते सबब नानानी कचेरीत भाऊकडून बोलविले जे, दाजी असतांना मूल दिला. याप्रमाणे दाजींनी जे केलें तें श्रीमंतांचे घरीं देखील मान्य. वरकड ठिकाणी मान्य करितील याचें आश्चर्य काय ! याप्र-माणें पुरुषोत्तमरावदाजी यांची योग्यता

१४९. भाऊबंदानीं नानाजवळ समजाविले की, दाजी तोतयाचे प्रकरणांत होते. ती गोष्ट नानानीं भाऊजवळ काढिली. तेव्हा भाऊ हरिहररावतात्या यांचे घरी आले आणि विचारिलें जे,—पुरंदरास भाऊ आले म्हणजे दाजीकडे उतरत. सारी फौज खाली

१ एक खुद्द हरिहररावास, दुसरें आणि हा गांव ज्या परगण्यांत होता त्या परगण्याच्या मामलेदारास, तिसरें परगण्याच्या देशमुखदेशपांड्यांस, आणि चौथें मोकदमानी मौजे आर्वे यास म्हणजे आर्व्याच्या पाटील-कुळकर्ण्यांस. सरकारांतून इनाम जमीन कोणास दिली म्हणजे असलीं हीं चार पत्रें लिहिलीं गेलींच पा-हिजेत असा नियम असे. २ दाजींनी कृष्णराव नामें नारायणराव यांचे नांवें मांडीवर दत्तक दिले होते, सबब नारायणराव याची सालीना चार हजार रुपयांची नेमणूक कृष्णराव याचे नांवें सरकारांतून करार झा-ल्याची वस्त्रे. ३ बेहडा–सरजामाच्या नेमणुकीची सनद. ४ भाऊबंद कोणी दूरचे नव्हते. दाजीचे धाकटे बंधु बळवंतराव हेच विरुद्ध झाले होते.

ठेऊन वरते आपण सडे असत – तेव्हा जेवतांना विचारले जे, तात्या, आज नानानी गोष्ट काढिली जे, दाजी तोतयाचे प्रकरणात होते, त्यातील मजकूर तुला माहीत आहे की काय? कारे चितोबा, तुला माहीत आहे का काय? तेव्हां तात्या बोलले कीं, आह्मास त्याचे कामकारनाराची काही माहिती नाही. परंतु जेवताना गोष्टी बोलत ती मात्र माहिती आहे. काय ह्मणत जे, "तोतया प्रथम दौलताबादेस होता, तेव्हा कारभारी यांनी मला परीक्षेस पाठविले. तेव्हा मी सांगितले जे, माझे समागमे कोणी विश्वासूक कारकून द्यावा. तेव्हां बाजीपतअण्णास बरोबर दिले नतर दौलताबादेस गेलो. तेथें त्याची चार वेळ गाठ घेतली, ती बाजीपतास बरोबर घेऊन घेतली. त्यास विचारले जे, श्रीमंत भाऊसाहेब याची व आमची बहुत वेळ गाठ पडून बोलणी चालणी खुणेच्या गोष्टी पुष्कळ जाहल्या आहेत, त्यातून एक गोष्ट तुह्मी सागा ह्मणजे खरे. असें ह्मणतांच तो बोलला त्यातील काहीएक गोष्ट खरी जाहली नाही. तेव्हा मी त्याचे तोंडावर बोललो जे, तू × × × लबाड आहेस थोराचे नावास बट्टा लावावयास आलास! असे ह्मणून निघून आलो. पुढें तोतया मिरजेस ठेविला तेथून रत्नागिरीस होता. तेथून रामचंद्र नाईक परांजपे याची स्त्री अन्नपूर्णाबाई हिची पत्रे मला येत की, तुह्मीं येथपर्यत येऊन जावे धर्मास मी गेलो नाही म्हणून बरे जाहले! मी त्याचे तोंडावर तू लबाड आहेस असे म्हणतो व तो चढून मला बेडी घालता! माझी अब्रु देवाने राखिली. अन्नपूर्णाबाईची पत्रे मला जी आली ती मी नानास दाखवून फाडून टाकिलीं." याप्रमाणें भोजन करताना बोलत. ते आह्मी ऐकले आहे असे सांगताच भाऊ म्हणाले की, याप्रमाणें नानाजवळ मजकूर बोल. असे सांगून तिसरे प्रहरीं नानाकडे तात्यास घेऊन गेले. जाऊन नानास बोलले की, आपण तोतयाप्रकरणी मजकूर बोलला, त्यास दाजींचे मुलास विचारिलें त्याने दाजी जेवताना बोलत तो मजकूर सागितला. तात्या, तो मजकूर सांग. असे म्हणताच तात्यानी सदरी मजकूर जो सागितला तो सारा पाढा बोलतांच भाऊ बोलले जे, नाना, अन्नपूर्णाबाईच्या चिठ्या आल्या त्या आपणास दाखवून आपल्यासमक्ष दाजींनीं फाडून टाकल्या की नाहीत? नाना बोलले जे, फाडून टाकिल्या हें खरें आहे. तेव्हां भाऊ बोलले की, मग काय विचारिता? तेव्हा नाना बोलले की, असे बळवंतराव सांगतात. भाऊ बोलले की, बळवंतराव 'महाराज'[२] आहेत, त्याचे बुद्धीचे प्रकाश आपल्यास समजतील! या मुलाचे पाय भुईस लागावयाचे त्याचे मनांत कोठें आहे? याप्रमाणें रागानें बोलताच नाना उगच राहिले.

१५०. आणखी बळवतरावकाकानी कसरीचा मजकूर सरकारांत समजाविला जे,

---

१ चितोपत घारपुरे हा पुरुषोत्तमराव दाजींचा कारकून २ 'महाराज' शब्दाची योजना अर्थात् उपरोधिक.

शिबंदींत यांस कसर राहती; परतु पुरुषोत्तमरावदाजी यांस दुखणें आलें तेव्हां पुरंदरची हवा सोसेना, सबब पुण्यास गेले. तेथें नाना फडणीस समाचारास आले त्या वेळेस दाजी बोलले कीं, नाना, मी आपले तोंडानें आपला पराक्रम काय वर्णन करूं ? परंतु माझे मनांत असें होतें जे, हा धनी थोर व्हावा आणि आमचे शत्रु मोगल वगैरे आहेत त्यांशीं युद्ध-प्रसंगास लाख फौज उभी असावी आणि भर लढाईमध्यें आमचे तुकडे होऊन जावे, असें मनांत होतें. परंतु हें दुर्मरण मला आले असें दिसतें ! तेव्हां नाना बोलले जे, तुम्ही वांचाल आणि तसेच मराल ! दाजी बोलले जे, या दुखण्यांतून वांचावयाचे कठिण. असें म्हणून आणखी सांगितलें जे, मी येथें कुटुंबसह आलो. मला आपण तैनातेखेरीज पैसा देत नाहीं. माझें सारे कुटुंब मंगळवेढ्यास आहे तेथे खर्च सारा आहे, त्यास चारशें प्यादे आपण करून दिले, त्यास रोजमुरा सरकारांतून अकरमाही[2] येतो, पण मी दसमाही देतों. एक महिना काटून घेतो. पुढें सरकारांत कोणी समजावून मुलांचे घर बुडवितील यास्तव विनंति केली आहे. मी खर्चासाठीं घेतो. असें म्हणून तात्याचा हात घेऊन नानाचे हातांत घातला. याप्रमाणे केले. असे असताही पुढें कसर समजवावी म्हणून सरकारांतून निकड लाविली. रोजमुरा देईनात, आणि ह्मणूं लागले जे, दाजीनी कांहीं कसर समजाविली होती. त्यास तुम्हीं समजवावी असे म्हणूं लागले. तेव्हा हरिपंततात्या यांचे कानावर घातलें. तात्या म्हणों लागले जे, काय करावें ! तुमचे चुलत्यानीं तुह्मांवर शस्त्र धरिलें आहे ! बरें, आतां एक करा. एकंदर कसरीचा ऐवज अजमासें[3]वार जमा धरून खालीं त्यास खर्च लावा. उगेच गोळा बेरीज खर्च लिहा. पागा, भोजनखर्च, जासूद, प्यादे, शिबंदी, ढालाईत, दरबार खर्च, कापड, वगैरे खर्च लिहून खालीं दोन अडीच हजार रुपये सुमारे शिल्लक काढून अशी यादी करून आणावी. असे सांगितलेवरून त्याप्रमाणें याद केली आणि नेऊन दिली. ती हरिपंत घेऊन नानाकडे गेले आणि बोलले की, हरिहरराव पटवर्धन यांस कसरजमा समजवावी म्हणून आज्ञा जाहली, सबब त्यांनी याद करून आणून दिली आहे. त्यांस पैसा देखील उरत नाहीं. त्यांचा सारा खर्चच येथे आहे. ही याद पहा. असें ह्मणून याद पुढें ठेविली. नानानीं पाहून हरिपंत यांचे अंगावर टाकिली. तेव्हां हरिपंत बोलले जे, मखलासी करितों. ही शिल्लक त्यांस बक्षीस करावी. असे ह्मणताच नाना बोलले जे, तुमचे मनास

१ जो इतरांस शाप तो वीरास आशीर्वाद ! ! ! २ पायदळाच्या लोकाकडून बारमहा चाकरी घेऊन अकरा महिन्याचा पगार देण्याचा प्रघात सार्वत्रिक होता. कोठे बारा महिने अकरा दिवसांची चाकरी घेऊन अकरमाहीचा एक महिना व ' सुरनिशीचे ' ह्मणून अकरा दिवस कापून घेत. क्वचित् वर्षांतून दोन महिन्यांचा पगार कापून घेत. दाजी याचप्रमाणें दसमाही पगार देत. शिवाय चाकरीवर रुजू होते वेळी जमातीच्या कारकुनास चेहरेपट्टी लिहिण्याबद्दल दर शिपायास एक रुपया द्यावा लागे चेहरेपट्टीत जात, वय, वर्ण, वतन ( मूळ ठिकाण ), हत्यार, तैनातीची रक्कम व बटवड्याचा रिवाज ही सर्व लिहिलेली असत. जसें—महमदखान वलद नूरखान, पठाण, उमर वर्षे ३०, वर्ण गोरा, वतन पिशोर (पेशावर), बदूक, तैनात साडेदहा रु० दीडमाही, इ०. ३ बजेटाप्रमाणें. अजमास ह्मणजे बजेट.

येईल तसें करावें ! तेव्हां हरीपंततात्यांनीं मखलासी केली आणि बोलले जे, सरकारचे मर्जी-पुढें उपाय नाहीं. हा ऐवज फुकट त्यांचे अंगावर ! त्यांनीं उगाच अजमास लिहून आणिला. कच्चा हिशेब पाहिल्यास इतकी देखील शिल्लक नाहीं. असें म्हणून मखलासी केली जे, निम्मे साडेबाराशें[1] रुपये सरकारांत यावयाचे. बाकी साडेबारारशें रुपये हरि पुरुषोत्तम यांस बक्षिस-अशी मखलासी करून नानापुढें ठेविली. नानानीं तेरीख[2] घालून याद संपवून हरीपंत यांचे अंगावर टाकून दिली. नानाचा अंतर्यामीं लोभ[3], परंतु हें सरकार काम, सबब बाह्य प्रकारें बोललें जे, 'हरीपंत, तुह्मी सरकारचा ऐवज बुडविला !' असें बोलले. हरीपंत याद घेऊन खालीं आले आणि चिंतोपंत घारपुरे, पटवर्धनांकडील कारकून, याचे हवालीं याद करून बोलले जे, साडेबाराशें रुपये तुमचे[4] चुलत्यानें तुमचे अंगावर पाडिले; हे देशमुखांकडे देऊन पावती घेणें; असें सांगितलें. नंतर साडेबाराशें रुपये देशमुखांकडे देऊन पावती घेतली. त्या यादीची नक्कल आहे त्यावरून पहावें. याप्रमाणें मजकूर वडिलांनीं सांगितला तो लिहिला आहे.

१५१. पुढें बळवंतराव काका यानीं फितूर प्रकरण केलें तेव्हां त्यांस सरकारानीं कैद केलें. ते समयीं परशुरामभाऊ यानीं सोडाविलें. तळेगांवचे[5] स्वारीस सरकारचें बोलावणें भाऊस आलें तेव्हां भाऊनी सांगितलें जे, आमचे पायांत बेडी आहे. तेव्हां बेडी असोन घोड्यावर बसावयास कसें येईल ? बेडी तोडल्यावर येऊं ! तेव्हां बळवंतराव काका यांची बेडी तोडून मिरजेस पाठवून दिलें. नंतर तळेगांवची स्वारी जाहली, तेथें इंग्रजासीं मातबर लढाई होऊन श्रीमंतांस यश आलें. याप्रमाणें परशुरामभाऊ भाऊबंदांचा अभिमान धरीत.

१५२. भाऊंप्रमाणें भाऊबंदांचा अभिमानी, पूर्वस्मरणाविशीं दक्ष व उपकार जाणणारा असा दुसरा मनुष्य कोणी जाहला नाहीं. येविशीं कथा सांगतों. पंढरपूरकर बडवे यांची मुलगी पंढरपुरचे गवंड्यानें ठार मारिली. तेथें लिमये[6] यांचा अंमल होता, त्यांनीं तो मजकूर मनास आणिला आणि मध्येंच दाबून टाकिला ! नंतर बडवे यांनीं येऊन अंब्यांस मातुश्री कृष्णाबाईजवळ फिर्याद केली. तेव्हा बाईनीं शिबंदी कारकून स्वार पाठवून गंवडी यास चीजबस्त सुद्धां कैद करून धरून अंब्यांस आणिलें तेव्हां त्या मुलीचे दागिने त्याचे घरीं निघाले. नंतर जबान्या वगैरे घेऊन तो खून केलेला मजकूर त्याचे अंगीं लागू जाहला,

१ हें उदासीनपणाचें बोलणें. २ फडणिशीकडच्या कागदावर शेवटीं तारीख घातलेली असते तीच तेरीख. ती नानाफडनवीस सर्व कागद वाचून त्यांत दुरुस्ती करून नतर स्वतः घालीत. मग तो कागद पुरा झाला. ज्यावर फडणिसाची तेरीख नाहीं तो हिशेबी कागद सरकारात मजूर झाला नाहीं असें समजावें. ३ दाजीच्या मुलावर प्रेम. ४ ह्मणजे तुमचे यजमान हरिहररावतात्या याचे. ५ हे चुकलें. 'तळेगांवच्या स्वारीस ' या ऐवजी ' जनरल गाडर्ड याशीं बोरघांटांत लढाया झाल्या तेव्हां ' असें पाहिजे. ६ पंढरपुरास परशुरामभाऊचा अमल होता. चिंतोपत लिमये हे तेथे त्यानी कमाविसदार नेमिलेले होते.

तदोत्तर कृष्णाजी महादेव यांजसमागमें *गवंडी × × ×× × × × × आडवे जाहले. जागेच होते.भोंवताली सारी मंडळी बसली होती. चिंतोपंत लिमयेही बसले होते. तों लिमये यांनीं गोष्ट काढिली जे, तुह्मी स्वारी करून गवंडी धरून आणण्याचें प्रयोजन काय ? चोरून येऊन तुम्ही गवंडी धरून नेला, असें चोरीचें कसब करणें चांगलें कीं काय ? असें म्हणतांच हरिहररावतात्या बोलले कीं, चोरीचें कसब आमच्या वडिलांनीं केलें नाहीं व आह्मांसही ठाऊक नाहीं.आतां करावयाचें जाहल्यास तुम्हांजवळ शिकावें लागेल ! असें म्हणतांच भाऊसाहेब यांनीं तोंडावरून पांघरूण काढून चिंतोपंत याजकडे पाहून बोलले कीं, अहो चिंतोपंत, कृष्णाबाई वहिनी कोण समजतां हो ? ती प्रत्यक्ष धनी. तासगांवास कोणी अन्याय जर केला आणि त्यांस समजलें तर येथून मुसक्या बांधून नेतील. तेथें तुमची कथा काय ? तीं धनी आहेत. आह्मी गैर गोष्ट केली तर त्यांस चौकशी करण्यास अधिकार आहे. असें रागानें बोलतांच कृष्णाजी महादेव यांनीं तशांत विनंती केली जे, महाराज, मामलेदार यांचे स्वाधीन चीजबस्त करून पावती घेणे ह्मणून आज्ञा जाहली, परंतु आठ दिवस यांच्या पाठीस लागलों तरी स्वाधीन करून घेत नाहींत. नानाप्रकारचें बोलतात. असें सांगतांच भाऊसाहेब यांनी आज्ञा केली कीं, गोपाळपंत सोनी यांजकडे चीजबस्त देऊन पावती घेणें, आणि तुह्मीं जाणें. कृष्णाबाई वहिनीस सांगावें जे, तुह्मी केलें ते ठीक केलें. याप्रमाणें सांगावें. असें सांगतांच चिंतोपंत लिमये मुकाट्यानी उठून गेले. याप्रकारें भाऊसाहेब कृष्णाबाई यांस मानीत. कां जे, पुरुषोत्तमराव दाजी यांनीं आपणावर उपकार केले; सबब तोंडानें ह्मणत जे, आह्मी आपले अंगाचें कातडें काढून जोडे करून दाजींच्या मुलाचे पायांत घातले तरी दाजींचे उपकार फिटावयाचे नाहींत. याप्रमाणेंच बाळासाहेबही नारायणराव व पुरुषोत्तमराव यांचे वंशास अधिक मानीत. त्यांनीं तशींच महत्वाचीं कार्यें केलीं सबब मानीत.

१५३ बाळासाहेब यांची थोरपणाची गोष्ट सांगतों व चातुर्याची कथा सांगतों. नाना फडणीस यांची स्वारी मिरजेस आली तेव्हां नानास मेजवानी केली होती. तेथें बेत असा केला होता कीं, कोठें व्यंग अगदीं नाही. कोठें कोंठ अगदीं न चुकतां तयारी यथास्थित केली. तेव्हां भोजनें जाहल्यानंतर कचेरीत विडे घ्यावयास बसले. भाऊ-

* येथें फुल्या दिलेल्या जागी बखरीचा अर्धा बंद फाटून मजकूर गेला आहे, तो मजकूर–" बाईनीं तो गवंडी चीजबस्तसुद्धां कृष्णाजी महादेव व हरिहररावतात्या यांस बरोबर देऊन तासगांवास पाठविला. तों चितोपंत लिमये ही बाईची कागाळी घेऊन तासगांवास आले. परशुरामभाऊ व सारी मंडळी बसली होती, बोलणी चालली होती तों भाऊंस झोंप येऊं लागल्यामुळे ते अमळ आडवे जाहले " याप्रमाणे असावा.

१ या सदर १५२ मध्ये आलेल्या गोष्टीत बाळासाहेबांच्या थोरपणाचें वर्णन कांहीं दिसत नाहीं. एक प्रकारच्या चातुर्याचें मात्र आहे खरें. २ म. १७८६ च्या जून महिन्यांत नानाफडनवीस बदामीहून परत येत असतां कुरुंदवाड, मिरज व तासगाव या तिन्ही ठिकाणी मेजवान्या घेऊन पुण्यास आले.

साहेब तासगांवाहून मेजवानीकरितां मिरजेस आले होते. सारी मंडळी कचेरीस बसली होती. तेथें रुजाम्यावर महमुदी चादरा घातल्या होत्या. त्यास एके स्थळीं किंचित् माशीचे पंखाइतका डाग पडला होता. तों पहातां पहातां नानाची त्या डागावर नजर गेली, आणि त्याकडे पाहूं लागले. भाऊसाहेब यांसीं बोलतां बोलतां तिकडे पहात तें बाळासाहेब यांनीं लक्षांत ठेविलें. तो डाग जो होता तो बाळासाहेब यांचे लगतच होता. तों बाळासाहेबानीं अकस्मात् नानाची नजर चुकावून चुनपट्टी जवळ होती ती त्या डागास पुसली. त्यानें डाग दिसेनासा झाला. तों नाना आणखी पाहूं लागले, तो तेथें डाग नाहीं. चहूंकडे पाहिलें परंतु डाग कांहीं दिसेना. वरचेवर पहात, परंतु त्या कचेरींत डाग कांहीं कोठें नाहीं. नंतर वस्त्रें वगैरे देऊन निरोप दिला. नाना उठले ते भाऊंचा हात धरून निघाले आणि बोलले कीं, भाऊ, गंगाधरराव श्रीमंतांजवळ रहावयास योग्य आहेत! याप्रमाणें बोलले. तात्पर्य बाळासाहेबांचें चातुर्य व लक्ष असे होते

१५४. वंशावळीचा विस्तार लिहितां मध्ये कथा आली ती लिहिली. आता पुरुषोत्तमरावदाजीच्या वंशाचा विस्तार लिहितो त्यास पुत्र दोन. हरिहरराव व विठ्ठलराव. हरिहररावास पुत्र विश्वासराव, बाळकृष्णराव[1] अण्णा, विनायकराव व भास्करराव आपा असे चार. विठ्ठलरावांस पुत्र केशवराव, पुरुषोत्तमराव, व दामोदरराव असे तीन.

१५५. कृष्णभटजींचे तृतीय पुत्र मेघश्यामराव यांस पुत्र झाले त्यांचीं नांवें—वासुदेवराव, चिंतामणराव, शिवराव, जनोबाभाऊ[2], जगन्नाथ, कृष्णराव, रामचंद्र, विनायक, गोविंदराव, व्यंकटराव, नरसिंगराव व धोंडोबा मिळून बारा.

१५६. कृष्णंभटजींचे चौथे पुत्र माधवराव यास पुत्र दामोदरराव. तो मयत झाल्यावर दत्तक घेतला तो गोपाळराव

१५७. कृष्णंभटजींचे पांचवे पुत्र बळवंतराव यांस पुत्र विष्णुपंत, गणपतराव, विश्वनाथ, गोपाळराव व नारायणराव असे पांच. पैकीं गोपाळराव दत्तक दिला.

याप्रमाणे हरभटजीबावा यांचे वडील पुत्र कृष्णंभट यांची संतति लिहिली.

१५८. हरभटजीबावांचे दुसरे पुत्र बाळंभट यांस पुत्र मोरोबाआबा[4]. मोरो बल्लाळ यांस पुत्र श्रीपतराव.

---

१ बाळकृष्णरावअण्णा यानीच ही हरिवंशाची बखर लिहिली. २ जनार्दन मेघश्याम हे धारवाडच्या लढाईंत पडले. ३ मेघश्यामरावबापू यान्या एकीमागून एक अशा तीन स्त्रिया झाल्या. पैकी पहिलीस एक कन्या व सहा पुत्र, दुसरीस चार पुत्र, तिसरीस पाच पुत्र व दोन कन्या. पधरा पुत्रांपैकी अल्पवयात वारलेले तीन वजा करून बाकीच्या बारांची नावे वर दिली आहेत. स १७६३ त मेघश्यामराव यांचा व हैदरअलीचा सरदार मीरफेजुल्ला याची लढाइ होऊन हे शत्रूकडे पाडाव सांपडले ते दोन वर्षांनी निकडून सुटून आले. स. १७८० त जनरल गाडर्ड याच्या फौजेशी बोरघाटाखाली परशुरामभाऊनी निकराच्या लढाया केल्या त्यांत एका टोळीवर हे मुख्य सरदार होते. ४ हे चतुर मुत्सद्दी होते. गोपाळरावाचे प्रथम कारभारी नारायणराव कृष्ण होते. ते स. १७६५ त वारल्यावर हे मोरोबाआबा कारभारी झाले. त्यांच्या चातुर्याबद्दल ऐ. ले. संग्रहांतील शेंकडों पत्रें साक्ष देत आहेत.

१५९. हरभटजीबावांचे तृतीय पुत्र त्रिंबकपंतआपा कुरुंदवाडकर. त्यांस पुत्र नीलकंठराव व कोन्हेरराव. नीलकंठरावांस पुत्र रघुनाथराव[1] व शिवराव[2]. कोन्हेररावांस पुत्र गणपतराव[3].

१६०. हरभटजीबावांचे चतुर्थ पुत्र गोविंदपंतनाना मिरजकर, त्यांस गोपाळराव, वामनराव, पांडुरंगराव व गंगाधरराव असे चार पुत्र. पैकीं पहिले दोघे निपुत्रिक वारले. पांडुरंगराव यांस हरिहरराव[4], चिंतामणराव[5] व विठलराव असे तीन पुत्र. पैकीं पहिला व तिसरा यांची संतति नाहीं. गंगाधरराव यांस केशवराव, नारायणराव, माधवराव, गोविंदराव व गोपाळराव असे पांच पुत्र. नारायणराव यांस पुत्र गणपतराव. गोविंदराव यांस पुत्र कृष्णराव.

१६१. हरभटजीबावांचे पांचवे पुत्र रामचंद्रपंत. त्यास पुत्र परशुरामभाऊ. परशुरामभाऊंस पुत्र रामचंद्रपंतआपा, हरिपंतबाबा, माधवराव, विनायकराव व गणपतराव असे पांच. रामचंद्र परशुराम यांस पुत्र गोपाळराव.

---

१ रघुनाथरावदादा हे परशुरामभाऊबरोबर प्रत्येक स्वारीत हजर होते. यास अनेक वेळा जखमाही लागल्या होत्या. रघुनाथरावास पुत्र त्रिंबकराव. त्रिंबकरावास पुत्र केशवराव केशवरावास रघुनाथराव, हरिहरराव, विनायकराव व त्रिंबकराव असे चार पुत्र. पैकीं रघुनाथरावाच्या वाटणीस संस्थान कुरुंदवाड थोरलें घराणें व बाकी तिघांच्या वाटणीस संस्थान कुरुंदवाड धाकटें घराणे ह्मणतात. २ यांस कुरुंदवाड सरंजामाची वांटणी मिळाली नाही. पण स. १७९१ त जुन्या सरंजामापैकी निर्वाहापुरती खेडी मिळाली. हे कुरुंदवाड सोडून जवळच्या एका वाडीत राहू लागले, सबब याच्या घराण्यास वाडीकर ह्मणतात. ३ गणपतरावांस बाजीरावसाहेबांनी कुरुंदवाड सरंजामापैकी वाटणी देवविली ती घेऊन ते शेडबाळ येथें राहूं लागले. त्यांच्या संस्थानास संस्थान शेडबाळ अथवा संस्थान कागवाड ह्मणतात. तें आता खालसा झालें आहे. ४ हरिहरराव यांस सरदारीचीं वस्त्रें मिळाली होती. ते वीस बेवीस वर्षांचे होऊन वारले. त्यास संतति नाहीं. त्यांचे धाकटे बंधु विठ्ठलराव हे अल्पवयात वारले. ५ यास बाजीरावसाहेबानी स. १८०८ त मिरज सरंजामाची वांटणी दिली ती घेऊन ते सांगली येथे राहू लागले. याच्या वांटणीस सं० सांगली म्हणतात. हे शूर शिपाई होते व धोंडजी वाघाशी याची लढाई झाली तीत यास तोंडावर जखम लागली होती. त्या काळच्या इतर बहुतेक धामधुमीत हे प्रमुख होते. ६ स. १८२२ त ब्रिटिश सरकारानें पुनः मिरज सरंजामाच्या चार वांटण्या करून त्या गणपतराव नारायण, माधवराव गंगाधर, कृष्णराव गोविंद व गोपाळराव गंगाधर यांस दिल्या. त्यापैकीं गणपतरावांच्या वाटणीस संस्थान मिरज व माधवरावांच्या वांटणीस संस्थान मिरजमळा असें ह्मणतात. कृष्णरावांची वाटणी संस्थान सोनी व गोपाळरावांची वांटणी संस्थान बुधगांव या आतां खालसा झाल्या आहेत. ७ परशुरामभाऊच्या पुत्रांपैकी रामचंद्रपंतआपा व हरिपंतबाबा हे त्या काळचे नांवाजलेले मर्द शिपाई होते. खर्ड्याच्या लढाईत लालखानास हरिपंतबाबांनी मारिले तो पराक्रम प्रसिद्धच आहे. हरिपंतांनी सरंजामाची वांटणी घेतली नाही. त्यांनी पुष्कळ दानधर्म केला. त्यांनी काशीयात्रा केली, तेव्हां त्यांबरोबर लक्षावधि माणूस गेलें होतें असें सांगतात. ते निपुत्रिक वारले. त्यांच्या बंधूपैकीं विनायकराव हे अल्पवयांत वारले. बाकीचे तिघे बंधु रामचंद्रपंत, गणपतराव व माधवराव यांच्या वांटण्यांस अनुक्रमें संस्थान जमखिंडी, तासगांव व चिंचणी असें ह्मणतात. त्यांपैकी तासगांव व चिंचणी हीं संस्थानें आतां खालसा झाली आहेत.

१६२. हरभटजीबावांचे सहावे पुत्र भास्करपंतआपा यांची संतति. यांस धोंडोबादादा, विनोबा आबा, हरबा अण्णा, सदोबा भाऊ, वासुदेवराव दाजी व रामचंद्रपंत असे सहा पुत्र झाले. धोंडो भास्कर यांस विठ्ठलरावबाबा व यशवंतराव असे दोन पुत्र होते. विठ्ठल धोंडदेव हे खड्याच्या लढाईंत तमंचाची गोळी लागून ठार झाले. त्यांची स्त्री रखमाबाई सती गेली. विनायकराव भास्कर यांस नारायणराव, गणपतराव, कृष्णराव, व पुरुषोत्तमराव असे चार पुत्र झाले. हरि भास्कर यांस नीलकंठराव, गोविंदराव, विश्वासराव आणि शंकरराव असे चार पुत्र झाले. सदाशिव भास्कर यांस खंडेराव, माधवराव आणि चिंतामणराव असे तीन पुत्र. वासुदेव भास्कर यांस दत्तक पुत्र माधवराव. रामचंद्र भास्कर यांस दत्तक पुत्र गोपाळराव.

याप्रमाणें हरभटबावा ब्रह्मीभूतें यांचा वंश लिहिला.

१६३. आतां मूळपुरुष हरभट यांचे वडील पुत्र बाळंभट.त्याचे प्रथम पुत्र हरभट. दुसरे पुत्र केशवभट यांचा वंश लिहितों. त्यांची स्त्री गंगाबाई. प्रथम कन्या १ बयाबाई जोशी

---

१ भास्कर हरीच्या पुत्रात धोंडोबादादा, विनोबा आबा, हरबा अण्णा व रामचद्रपत हे शौर्याविषयी फार प्रसिद्ध आहेत. त्यात विनोबा आबा व धोंडोबादादा हे माधवराव पेशव्यानी केलेल्या सर्व मोहिमांत हजर होते व सवाई माधवराव जन्मास आले तेव्हा तेथील बदोबस्ताकरितां काही महिने यांची नेमणूक झाली होती. हरबाअण्णानी मोतीतलावाच्या लढाईंत मोठा पराक्रम केला. हे तोतयाकडे गेल्यामुळें कांही दिवस पुणें दरबारची यावर अवकृपा होती. विनोबा आबा व हरबा अण्णा उभयतांही पटणकुडीच्या लढाईंत जखमी झाले होते. रामचंद्र भास्कर हे सन १७९१ त परशुरामभाऊनीं धारवाड काबीज करून श्रीरगपट्टणावर चाल केली तेव्हा आघाडीच्या फौजेंत एका टोळीवर मुख्य सरदार होते. २ या सतीच्या सहगमनाची हकीकत फार चमत्कारिक आहे. ती आतांच्या काळात कोणास खरी वाटणार नाही ! तथापि पूर्वींची माणसें ती जशी सांगत आली आहेत तशीच ती येथें देतों. खड्यांच्या लढाईंत विठ्ठलराव पडले तेव्हां ही बाई मिरजेस घरी तुळसीला पाणी घालीत होती. पूजा करितां करिता ती अकस्मात् आक्रोश करू लागली व घरांतील माणसांस सागू लागली कीं, या क्षणी माझा भ्रतार लढाईत पडला. त्याचे पागोटें घरांत आहे त्याबरोबर मी सती जाणार.मला परवानगी द्या व माझी तयारी करून द्या ! खड्यांस लढाई होत असल्याचें कोणास अर्थातच ठाऊक नव्हते व लढाई कोणाशी कोठे झाली हे रखमाबाईस कांही सांगता येईना. मात्र तिने सती जाण्याचा आग्रह धरिला व त्या वेळेपासून अन्नपाणी वर्ज्य केले त्या वेळी तिला कोण सती जाऊं देणार ! तिला वेड लागलें असेंच लोक समजले. खड्यांहून पांचवे दिवशी मिरजेस लढाईची बातमी आली तेव्हां रखमाबाईच्या अंतर्ज्ञानाविषयी सर्वांस परम विस्मय वाटला ! नतर ती मोठ्या समारभानें सती गेली. ३ पटणकुडीच्या लढाईंत जखमांनीं घायाळ झालेले गणपतराव समरभूमीपासून कांहीं अतरावर येऊन मूर्च्छित होत्साते घोड्यावरून पडले ते कांही वेळ तसेच पडले होते. मागून त्या काळचे प्रसिद्ध शिलेदार शितोळे लढाईतून परत येत होते त्यानी काळोखात यांस पाहिलें व घोड्यावरून उतरून यांचे अग चांचपून पाहिले तों यांचे कमरेस देवांचें संपुष्ट होते तें खडबड वाजले. त्यावरून हा ब्राह्मण आहे, व यास येथेंच टाकून गेलों तर फुकट मरून जाईल, असें जाणून त्यांस त्यानी भाल्याचे झोळीत घालून मिरजेस पोंचवून दिलें ४ हरभटजीबावा हे संन्यास घेऊन समाधिस्थ झाले होते ह्मणून त्यांस 'ब्रह्मीभूत' ह्मटलें आहे. ५ केशवभट श० १६८३ च्या शुद्ध पक्षांत गणेशवाडी येथें वारले. त्यांचे धाकटे पुत्र शिउबा आपाही याच सुमारास वारलेले आहेत. थोरले पुत्र विश्वनाथभट हे हरभटजीनीं इचलकरंजीकर घोरपड्यांच्या घरीं आपले तर्फेनें उपाध्येपणावर ठेविले होते ते श० १६८६ त तें काम सोडून भिलवडीस येऊन राहिले; ह्मणून त्याच्या वंशजांस भिलवडीकर ह्मणतात.

हिपरगीरकर, २ वेणूबाई. नंतर पुत्र १ विश्वनाथभट काका २ शंकरभट ३ शिउबा आप्पा हे धाकटे.

१६४. शिउबा आपा यांनीं पराक्रम फार केला. त्यांची किंचित् कथा वर्णन करितों. हे कुरुंदवाडास होते. सारी मंडळी एकत्र होती. ते समयीं त्रिंबकपंतआप्पा यांची पालखी होती. कोणे एके दिवशीं कृष्णास्नानास त्रिंबकपंतआप्पा यांची पत्नी पार्वतीबाई निघाली. तेव्हां बसून जावयास पालखी आणविली. तेव्हां शिउबाआपा हे बळेंच त्या पालखींत बसून भोयांस रागें भरून आपण स्नानास गेले. स्नान करून आलेवर पार्वतीबाई बोलली कीं, भावोजी, तुह्मांस आयते पालखींत बसावयास लाज कशी वाटली नाहीं ? याप्रमाणें बोलली. ती गोष्ट लागून उत्तर कांहीं न देतां तसेच उगे राहिले नंतर मध्यरात्रीं उठून कोणास न विचारितां आपला बसावयाचा एक घोडा घेऊन त्याजवर बसून निघाले ते उजाडावयास दहा कोस गेले. दुसरे दिवशीं प्रहर दिवसास समजलें कीं, शिउबाआपा कोठे नाहीत. गांवांत वगैरे शोध केला व आसपासही कोठे कोठें शोध केला, परंतु पत्ता लागला नाहीं. तेव्हां त्रिंबकपंतआप्पा बोलले की, छांदस पोर ! कोठें उठून गेलें असेल ! इकडे हे जे गेले ते नागपुरास गेले. तेथें जाऊन भोंसले याची भेट घेतली. त्यांनीं विचारले जे, तुह्मी कोण आहां ? यांनीं सांगितलें कीं, आह्मी शिलेदार शिपाई उमेदवार आहोत. चाकरीस रहावयास आलों. तुमचे येथें उमेदवारी असल्यास सांगा. नाहीं पेक्षा पुढें जाऊं. असें म्हणतांच त्याणीं विचारिलें कीं, तुमची तैनात काय ? यांनीं सांगितलें जे, चाकरी करून दाखवूं—जी लढाई बिघडली ती सुधरून देऊं—ते दिवशीं चाकरीवर रुजू जाहले दिवसापासून दरसाल पांच हजार रुपयेप्रमाणें तैनातीचा फडशा करून घेऊं. तोपर्यंत घोड्याचे पोटास व आमचे पोटास व चिरगूट पांघरूण याप्रमाणें खर्चास दररोज तीन रुपयेप्रमाणें घेऊं. असें म्हणतांच भोंसले यांस आश्चर्य वाटलें व शिपाई उमेदवार चांगले दिसलेवरून कबूल करून ठेविलें. ते पांचं वर्षे याप्रमाणें होते. इकडे अगदीं पत्ता नाहीं. तो श्रीमंतांची स्वारी भोंसले यांजवर जाहली. तिकडून भोंसले फौजेसुद्धां आले. इकडून श्रीमंतांची फौज गेली. उभयतां फौजेची लढाई लागली तों शिउबाआपा हातांत तलवार घेऊन एके बाजूस घोड्यावर बसून उभे होते. श्रीमंतांचे फौजेंत पटवर्धन मंडळी, त्रिंबकपंतआपा व रामचंद्रआप्पा व भास्करपं-

१ आपले पराक्रमावर सरकारातून पालखीचा बहुमान मिळवावा, नंतर पालखींत बसावे. दुसऱ्याने मिळविलेल्या पालखींत बसण्यात काय भूषण आहे ? असा बाईच्या बोलण्याचा अभिप्राय. २ वस्तुतः फार झालें तर दोन अडीच वर्षे असतील. भोसल्यांना पेशव्याच्या फौजेचा मोड पहिले बाजीराव याच्या कारकीर्दीत केलेला असा एकदांच, आणि तोही स० १७३९ च्या फेब्रुवारीत पेशव्याच्या सैन्याची अघाडीची टोळी आवजी कवडे याच्या हाताखाली वऱ्हाडात लूट करीत होती तिचा. शिउबा आपा कुरुंदवाडाहून नागपुरास गेले होते व खुद्द कुरुंदवाड गांवच मुळी पटवर्धनांस स. १७३६ त मिळाला आहे. शिवाय बखरींतल्या सहाव्या सदरांत शिउबा आपास शाहुमहाराजांचें दर्शन वगैरे झाल्याचे लिहिलें आहे ती गोष्ट स. १७३५ तली आहे.

तआपा होते. त्या वेळेस थोरले बाजीरावसाहेब व चिमाजीआपा होते. उभयतां बंधु खासे स्वारीस आले होते. आणि लढाई लागली तों भोंसले यांची फौज कचकरली आणि पळ काढिला. खासे भोंसले अंबारींतून उतरून घोड्यावर बसले आणि घोड्याचे तोंड माघारें काढिलें. इतक्यांत शिउबाआपा यांनीं आडवें घोडें घालून कराचलीचे पाठीकडून भोंसले यांचे पाठीवर मारून बोलले जे, अरे मराठ्याच्या पोरा, आतां माझा तमाशा पहा ! पळूं नको. उभा रहा. असें म्हणतांच राजे यानीं लगामास हात घातला आणि तोंड माघारें फिरवून उभे राहिले. तों शिउबाआपा पुढे वाढून गेले आणि अघाडीचे पांच स्वार ठार केले. मग श्रीमंतांकडील फौज किंचित् हटली तों भास्कर हरीची गांठ पडली. त्यांस शिउबाआपा यांनीं ओळखून त्यांस सोडून पुढें दुसऱ्यावर गेले. तेव्हां भास्करपंतआपा बोलले जे, अरे शिपाया, तोंड कां चुकवितोस ? समोर येणे. असें ह्मणतांच शिउबाआपा बोलले जे, जा वेड्या, तुझ्यावर काय यावयाचे आहे ! तों भास्करपंतआपाजवळ गडी होता त्यानें ओळखिलें आणि आपास बोलला जे, आपा, आमच्या शिउबासारखा हा शिलेदार दिसतो. इतकें गडी बोलला. इकडे भोसले यांची फौज पळत होती ती सारी जमून एकवट जाहली. तिकडे श्रीमंतांची फौज दूर अंतरावर पुनः जमून उभी राहिली. याप्रमाणें दोहींकडील फौजा आपले जागां उभ्या राहिल्या. भोसले यांचे फौजेचा मोड जाहला होता तों भोंसले यांस जयं येऊन शिउबाआपास अंबारींतून बसवून शहाजानें वाजवीत भोंसले आपले गोटास आले. शिउबाआपा यांस जखमा लागल्या होत्या. तेव्हां खासे भोंसले जातीनिशीं येऊन शिउबाआपा यांच्या जखमा शिववून बरदास्त करून आपले राहुटीस शिउबाअपा यांचा पराक्रम वर्णन करीत गेले जे, बोलल्याप्रमाणें यानें कर्म केलें. असें म्हणत आपले राहुटीस गेले. इकडे भास्करपंत आपा यांजबरोबर खिजमतगार होता तो ह्मणाला जे, मी शिउबाआपा ओळखला; त्यास मला आज्ञा व्हावी, मी पक्का शोध करून येतों. असें ह्मणतांच भास्करपंतआपा यांनीं आज्ञा दिली. त्या माणसानें शिउबाआपा यांस ओळखिलें होतें, म्हणून तो माणूस किडबिड्या जोश्याचें सोंग घेऊन भोंसले यांचे लष्करांत गेला. सारें लष्कर फिरला. कोण जखमी कोठें आहेत याचा शोध करीत शिउबाआपा यांचे राहुटीस आला, आणि बाहेर जोशीपणाची भाषणे करीत उभा राहिला तो शिऊबाआपा यांनीं पाहिला; आणि आपले माणसास सांगितलें कीं, त्या किडबिड्या जोश्यास आंत बोलावून आण-

---

१ या वर्णनावरून कांहीं मोठीशी लढाई झाल्याचें दिसत नाहीं. सामान्य प्रकारची थोडीशी झटापट झाली तींत प्रथम भोसल्यांचा मोड झाला तो शिउबाआपाच्या पराक्रमामुळें पेशव्यांच्या फौजेची पुढची रांग क्षणभर धिजल्यासारखी झाली इतक्यांत भोसल्याच्या फौजेनें सांवर खाऊन शत्रूस लढाईच्या जाग्यावरून पिटून लाविलें. जय झाला ह्मणण्यास इतकें झालें तरी पुरे. एक शिउबाआपास धरून बसल्यामळें बखर लिहिणाऱ्यानें लढाईचें बाकीचें वर्णन गाळलें असेल तर मात्र गोष्ट निराळी तसेंही असण्याचा संभव आहे.

वणें. असें ह्मणून त्यास आंत आणविलें. तो माणूस आंत येतांच ' अरे शिउबा ' ह्मणून गळ्यास मिठी मारून रडूं लागला. तेव्हां शिउबाआपा यांचेही डोळ्यास पाणी आलें. नंतर शिउबाआपा ह्मणाले कीं, तूं आतां कोठें बोलूं नको. मी खुशाल आहें. थोडके दिवसांतच आपले देशास येईन. तूं जा. असें म्हणून त्या माणसास कांहीं खर्चास दिलें आणि लावून दिला. त्यानें येऊन त्रिवर्ग बंधु त्रिंबक हरि, रामचंद्र हरि व भास्कर हरि यांस सांगितलें. तेव्हां ते बोलले, आतां बोभाट न करणें. श्रीमंतांस कळेल. असें ह्मणून उगेच राहिले. नंतर नागपूरकरांजवळ खंडणी ठरावून श्रीमंतांची स्वारी पुण्यास आली. आलेवर श्रीमंतांस वर्तमान समजलें कीं, नागपूरकरांची लढाई बिघडलेली ज्यानें सुधरली तो स्वार शिउबाआपा पटवर्धन. असें समजल्यावर श्रीमंतांनीं पटवर्धन यांस आज्ञा केली कीं, तुह्मीं आपला भाऊ आणवणें. नाहींपेक्षां तुम्हांस सरंजाम चालणार नाहीं ! नंतर यांनीं शिउबाआपास पत्रें नानाप्रकारचीं शपथा घालून "भेटावयास येणें" म्हणून पाठविलीं. नंतर शिउबाआपा यांनीं भोंसले यांजपाशीं निरोप मागितला जे, फार दिवस जाहाले. सर्वत्रांस भेटून लागलाच माघारा येतों. भोंसले म्हणाले जे, तुम्ही आपले देशास गेल्यावर पुन्हा येणार नाहीं. तुमची भाऊबंद मंडळी फार. ते तुह्मास येऊं देणार नाहींत. त्यास तुह्मीं याल याबद्दल आह्मास प्रमाण काय ? हे बोलले कीं, बेलभंडार घेणें. असें ह्मणून बेलभंडार देऊन त्यांचा निरोप घेऊन बरोबर सरंजाम हत्ती, पालखी, स्वार लवाजमा सारा घेऊन प्रथम कुरुंदवाडास येऊन पार्वतीबाईस नमस्कार करून त्यांस पालखींत बसवून कृष्णाबाईस स्नानास घेऊन गेले. नंतर श्रीमंतांस समजलें कीं, नागपुराहून शिवाजी केशव पटवर्धन आले. मग श्रीमंतांनीं बोलावणें पाठवून पुण्यास घेऊन गेले. नंतर श्रीमंतांचा मोठा आग्रह पडला जे, तुह्मीं येथें चाकरी करावी. तुमची सारी मंडळी आमचे पदरीं आणि तुह्मी तिकडे जातां ही गोष्ट काय ? असा श्रीमंतांचा व सर्व भावाबंदांचा आग्रह पडून ठेवून घेतले[3]; आणि जमखिंडी परगणा सरंजामांत दिला. याप्रमाणें शिउबाआपा यांचा पराक्रम. त्यांस संतति कन्या धोंडूबाई भावे. त्यांची पत्नी गोदूकाकी ती जमखिंडी परगण्यांत कृष्णातीरीं कंकणवाडी ह्मणून गांव आहे तेथें राहिली. तिला श्रीमंतांनीं बाराशें

---

१ वस्तुतः खंडणी वगैरे कांही एक ठरलें नाही. नादिरशहानें दिल्लीवर स्वारी केल्यामुळे पेशवे व भोंसले यांचा तंटा तितकाच राहिला. २ त्या वेळीं पटवर्धनापैकी कोणासच सरजामाचे मुलूख मिळाले नव्हते. येथें ' सरंजाम ' याचा अर्थ ' तैनाता ' असा घेतला पाहिजे ! ३ भोसल्यांच्या संमतीनेंच ठेऊन घेतलें असा अर्थ घेतला पाहिजे. कारण शिउबानी भोंसल्यास आगाऊ बेलभंडार दिला होता. ४ शिवाजी केशव यांनीं जमखिडी परगण्यात गांव उत्पन्नें वगैरे तेथील देसायावर स्वारी करून बळजबरीनें मिळविली असें ऐकिवांत आहे व तेंच सयुक्तिक दिसते. स. १७४० त पेशव्यांचा अंमल जमखिडी परगण्यावर होतासे वाटत नाहीं

रुपये तैनात बाळपरवेशी म्हणून करून दिली. ती अद्यापि त्यांचे वंशास चालत आहे. शिऊबाआपाचे वडील बंधु विश्वनाथभट यांस पुत्र गणपतराव[2].

१६५. बाळंभट यांचे तिसरे पुत्र विठलभट यांस पुत्र अंताजीपंततात्या. हे शूर शिपाई असून अनेक लढायांत जखमी झाले[3]. अंताजी पंतांस बळवंतराव[4], जनोबा सुभेदार[5], विष्णुपंत, यादवराव व विठलराव[6] असे पांच पुत्र होते.

१६६. आतां मूळपुरुष हरभट यांचे पुत्र त्रिवर्ग. त्यांत वडील पुत्र बाळंभट यांचा वंश येथपर्यंत लिहिला. दुसरे पुत्र कृष्णंभट यांस चांदूबाई कन्या होती तिचा वंश जोशी सखदेवमंडळी. तिसरे पुत्र रघुनाथभट यांस पुत्र धोंडभट[7], धोंडभटास पुत्र बाळंभट, महादेवभट व वासुदेवपंत[8].

१६७. याप्रमाणें हरिवंशाचा विस्तार व कीर्तीचें वर्णन यथामति लेखन केलें असे. श्रमेंकरून वाचिल्यास मनोरथ पूर्ण होतील व वंशवृद्धि होईल. याची फलश्रुति हीच. हरिवंशाचे कीर्तीचें वर्णन करील व हरिवंश वाचील त्याचे वंशाची वृद्धि होईल. या वंशाची प्रत लिहून जो आपले गृहाचे ठायीं संरक्षण करील त्यास दुःख, दारिद्र्य प्राप्त होणार नाही. याप्रमाणें फलश्रुति असे. शके १७६४ शुभकृन्नामसंवत्सरे. वैशाख शु. ५ इंदुवारीं हा ग्रंथ लिहिला असे. मु० आंबेंनजीक श्रीक्षेत्र पंढरपूर. श्रीभीमातीर. श्रीउत्तरेश्वरसंनिध.

---

१ गोदूबाईची नैनात वेहडयात गणपतराव याचे नांवें पेशव्यांनी करून दिली ती त्यांच्या वशाकडे अद्यापि चालत आहे. गणपतराव हे पटवर्धनाच्या फौजेंत पचवीस स्वारांनिशी चाकरी करीत. २ यांच्या घराण्यास यादवाडकर ह्मणतात. ३ पटवर्धनाचा उदय होऊं लागल्यापासून ह्मणजे सुमारें शके १६५० पासून पुढे पन्नासपंचावन वर्षेपर्यंत झालेल्या बहुतेक मोहिमांत यांचें नाव आलेले दृष्टीस पडतें. ४ हे महापराक्रमी व स्नानसंध्याशील होते इग्रजांशीं तळेगाव येथें व बोरघाटाखाली लढाया झाल्या त्यांत यांस जखमा लागल्या होत्या, व परशुरामभाऊ याच्या हाताखाली एका टोळीवर हे मुख्य सरदार होते. नंतर यांनीं लष्करी पेशा सोडून अग्निहोत्र घेतले व पचवीस हजार रुपये खर्चून काशीयात्रा केली व आसगी हा गांव नूतन वसवून वेणुगोपाळाची तेथें स्थापना करून तो गाव देवास इनाम करून दिला. यांस ‘दीक्षित’ ह्मणत असत ५ नापार येथें कर्नल कीटिंग याच्या फौजेशी झालेल्या लढाईत जनोबा सुभेदार यांस संगिनीची जखम लागली होती व इतर अनेक लढायांत यास जखमा लागल्या होत्या. ६ विठ्ठलराव हेही मोठे शूर व अनेक लढायात कामकाज केलेले असे होते. खर्ड्याच्या लढाईत यास भाल्याची जखम लागली होती. ७ यांच्या घराण्यास शीळकर ह्मणतात. ८ ऐ. ले. संग्रहांत यांचा उल्लेख ‘वासुदेवकाका’ व ‘वासुदेव धोंडदेव’ या नांवानी शेंकडो वेळा आलेला आहे. हे पटवर्धनांच्या प्रत्येक मोहिमेंत हजर असून सांवशीच्या लढाईत हैदरअलीकडे पाडाव सांपडले होते.

